A

COURSE

OF

# MATHEMATICS

IN THE

# MARAT'HA LANGUAGE,

VOL: I

CONSISTING OF

**ARITHMETIC**

AND

**BOOK-KEEPING**

BY

SINGLE AND DOUBLE ENTRY,

WITH AN ASSAY TABLE &c.

TRANSLATED

*from the works of*

**DR. CHARLES HUTTON, AND MR. BONNYCASTLE,**

BY

CAPTAIN GEORGE RITSO JERVIS,

*Bombay Engeneers.*




LITHOGRAPHED IN BOMBAY,

BY

F. D. RAMOS.

1828.



शिक्षा माला

महाराष्ट्र भाषेंत

प्रथम पुस्तक

जांत

गणित

वहीवाटबहि

आणि

नाण्याचे तपासणीचें वर्तमान

यांचीं मूळ पुस्तकें इंग्रेजी भाषेंत आहेत त्यांचे कवी

डांकतर चार्ल्स हट्टन आणि बाणि कांस्टेल साहेब

त्यापुस्तकांचें भाषांतर
क्यापटन जार्ज जार्विस साहेब
इंजनेर
यांणी महाराष्ट्र भाषेंत केलें



दगडावर छापलें
मुंबई
१८२८






TO

**HIM,**

WHOSE POWERFUL AND HIGHLY CULTIVATED MIND, JUSTLY ESTIMATING THE ADVANTAGES OF LITERARY IMPROVEMENT, HAS WITH SUCH LIBERALITY ORIGINATED

*THE MEANS OF INSTRUCTION*

**FOR THE NATIVE SUBJECTS**

PLACED UNDER HIS GOVERNMENT,

**THE HON. MOUNTSTUART ELPHINSTONE,**

THIS

**COURSE OF MATHEMATICS**

IN THE

**MARAT'HA LANGUAGE,**

Undertaken in furtherance of his benevolent and enlightened Plans,

*IS RESPECTFULLY INSCRIBED*

BY HIS DEVOTED

AND

OBLIGED HUMBLE SERVANT,

GEORGE RITSO JERVIS,

*Captain of Engineers.*

BOMBAY,
17th August, 1827.

जांणी आपल्ये समर्थ अति शिक्षित मनीं
शुध्य रीतीनें विद्याभ्यासापासून लाभ कल्पून
एतद्देशीय लोक जे त्यांचे अमला खालीं आहेत
त्यांसाठीं
ह्मोटये औदार्यानें शिकविण्याचा विषय आरंभिला
असेजे

हनराबल मौंटष्टुआर्ट एलफिनस्तन साहेब,
यांस

ही शिक्षा माला
जी महाराष्ट्र भाषेंत,
केली आहे ती त्यांचे परोपकारि कार्य साहाय्यार्थ
त्यांचे आज्ञाधारक सेवक
जार्ज रिटसो जारविस साहेब,
यांणी
ह्मोटये आदरानें
नजर केली

मुंबई,
१७ आगष्ट १८२७

CONTENTS

OF

## VOLUME I.

CONTENTS *continued.*

## प्रथम पुस्तकाची अनुक्रमणिका

# शिक्षामाला

## सामान्य गुण.

१ अवयवित्व, अथवा महत्व, कोणत्याही पदार्थी आहे जो अधिक किंवा उणा करितां येईल; अथवा जो कोणत्येही रीतीनें गणनीय अथवा परिमेय आहे; असें संख्या, रेषा, अवकाश, काळ, गमन, वजन, इत्यादि.

२ कोणत्येही जातीच्या गणनीय अथवा परिमेय जो अवयवी तद्विषयक जी विद्या तीस शिक्षा ह्मणतात; तीचा जो गणना विषयक भाग आहे त्यास गणित ह्मणतात; आणि जो मान विषयक अथवा आकार परिमेयता विषयक भाग आहे त्यास भूमिति ह्मणतात. हे दोन भाग आणखी बीज गणित आणि गतिमान हे भाग जे संख्या, महत्व, आकार, आणि गमन, एतद्विषयक आहेत, आणि जे सर्व दुसऱ्यें भागांस आश्रय आहेत त्यांस शुद्ध अथवा साधारण शिक्षा ह्मणतात; कारण, ते सर्व जातीच्या साधारण संख्या आणि महत्वें यांचे गुण शोधितात, आणि त्यांचें प्रतिपादन करितात. आणि हे भाग जेव्हां कोणत्येही विशेष लक्ष्यावर योजिले तेव्हां यांस मिश्र शिक्षा ह्मणतात.

शुद्ध

शुद्ध शिक्षेचे मुख्य चार भागांत जीं लक्ष्यें शोधायाचीं आहेत तीं चार शब्दांनीं प्रकट होतात; ह्मणजे संख्येनें गणित, आकारानें भूमिति, समानतेनें बीज, गमनानें गतिमान.

३ शिक्षेमध्यें कित्येक सामान्य नामें अथवा गुण आहेत; जसें, व्याख्या, प्रत्यक्षें, प्रतिज्ञा, सिद्धांत, कृत्यें, (लेंमा), आर्थिकार्थ, पूर्वदीप, इत्यादि.

४ व्याख्या ह्मणजे कोणत्येही विद्येंत नामें किंवा शब्द जे येतात त्यांचा अर्थ विस्तार दाखविणारीं वाक्यें. त्या प्रत्येक व्याख्या स्पष्ट असाव्या, आणि त्यांत जे शब्द येतात ते प्रसिद्ध असावे; असे कीं, समजोन लवकर येतील.

५ प्रतिज्ञा ह्मणजे जें कांहीं प्रतिपादावयास इछिलें आहे अथवा करावयास इछिलें आहें; याजकरितां ती सिद्धांत प्रतिज्ञा किंवा कृत्यप्रतिज्ञा असेल.

६ सिद्धांत ह्मणजे प्रतिपाद्य प्रतिज्ञा आहे; ज्यांत कांहीं गुणनिगमन केलें आहे, असें कि ज्याची सत्यता सिद्ध करावयाची आहे. जसें, जेव्हां ह्मटलें आहे कीं, सरळ रेघ त्रिकोणाचे तीन कोनांची बेरीज दोन काटकोनांचे बरोबर आहे, तेव्हां हा सिद्धांत आहे, ज्याची सत्यता भूमितीनें करून प्रतिपादिली जात्ये. — अशा सिद्धांताचे समुदायास सिद्धांतगण ह्मणतात.

७ कृत्य ह्मणजे कर्त्तव्य प्रतिज्ञा अथवा कर्तव्य प्रश्न आहे; ह्मणजे

जे काहीं सत्यता अथवा गुण शोधायाचा अथवा काहीं कृत्य करायाचें जसें कोणत्येही सरळ रेघ त्रिकोणाचे तीन कोनांचीं बेरीज शोधायाची अथवा एक रेघ दुसर्‍यें रेघेवर लंब करायाची· — लब्ध कृत्य तेंच आहे ज्याचें उत्तर अथवा पृथक्करण एकच आहे· अनंत कृत्य तेंच आहे ज्याचीं उत्तरें अगणनीय आहेत· आणि सांतकृत्य तेंच आहे ज्याचे उत्तरांचे संख्येचा निश्चय आहे·

८ कृत्याचें पृथक्करण तेंच आहे जें त्याचे विस्तारापासून उत्तर निघतें गणित पृथक्करण ह्मणजे उत्तर आहे जें संख्येंत निघतें· भूमितिपृथक्करण ह्मणजे उत्तर आहे जें भूमितीचे गुणांपासून उत्पन्न होतें· आणि शिल्पपृथक्करण ह्मणजे तें उत्तर आहे जें यत्नयुक्तीं करून सिद्ध होतें·

९ (लेंमा) तेंच आहे जें मुख्यप्रतिज्ञेचा प्रतिपादनसंक्षेपार्थ घेतलेलें प्रतिज्ञांतर आहे·

१० आर्थिकार्थ तोच आहे जो अर्थ काहीं प्रतिज्ञेचे प्रतिपादनापासून साहजिक उत्पन्न जाला·

११ पूर्वटीप तीच आहे जी पूर्वीं गेलेल्ये प्रतिज्ञेवरील टीप आहे·

१२ प्रत्यक्ष ह्मणजे प्रतिज्ञा आहे आपल्ये आपणच प्रकट होत्ये, जीची सत्यता सिद्ध करायास प्रतिपादन करावें लागत नाहीं; आणि सांगतांच जी मान्यतेस येत्ये· जसें किं, कोणत्येही वस्तूची समग्रता त्या वस्तूचे खंडापेक्षां ह्मोटी आहे; अथवा समग्रता आपल्ये सर्व भागांचे

गांचे बेरिजेचे बरोबर आहे; अथवा दोन अवयवी पदार्थ जे प्रत्येकीं तिसर्‍ये एक पदार्थाचे बरोबर आहेत ते परस्पर बरोबर आहेत.

१३ प्रश्न तोच आहे जें कांहीं करायास इच्छिलें, आणखी तें प्रकट आणि सुगम आहे, असेंकिं, त्यास कोणही अमान्य नकरील.

१४ तर्क ह्मणजे कांहीं एक विचार आहे ज्याची सत्यता मानितात. अशा करितां किं त्यापासून कारण निघावयासाठीं अथवा त्याचे आश्रयानें कोणत्येंही प्रतिज्ञेचें प्रतिपादन सिद्ध करायासाठीं.

१५ प्रतिपादन ह्मणजे वेगळालीं कारणें आणि सत्यता यांस एकत्र करून व्यवस्थेचें अनुक्रमें ठेवणें आहे अशाकरितां किं जी प्रतिज्ञा वर सांगीतली तीची सत्यता दाखवावया साठीं.

१६ विधिमुखाचें प्रतिपादन तेंच होय जें प्रतिज्ञेस सरळ निश्चयरूपानें संपवितें.

१७ निषेधमुखाचें प्रतिपादन तेंच आहे जें अन्य सत्यतेचे अशक्यत्व रूपानें प्रतिज्ञेची सत्यता दाखवितें.

१८ क्रम ह्मणजे विद्या आहे जी कारण समुदायांतून कारणें काढून त्याचे त्याचे स्थळीं वेगळालीं ठेवायाचीं, अशाकरितां किं, प्रतिज्ञेची सत्यता अथवा असत्यता शोधावयासाठीं. अथवा शोधिल्यानंतर दुसर्‍यास प्रतिपत्ति व्हावयासाठीं. — क्रमाचे प्रकार दोन आहेत, एक उपसंहार आणि दुसरा उपक्रम.

१९ उपसंहार ह्मणजे, युक्ति अथवा रीति आहे कोणत्येही प्रतिज्ञेची

सत्यता

सत्यता काढायाची, अशानेंकिं, कार्य जालें आहे असें आरंभीं मानून त्यापासून मागें हटून हटून कारणांचा शोध करावा, जों पर्यंत एक प्रसिद्ध सत्यता मिळेल.— या उपसंहारास शोधणें आणि पृथक्करणें यांची रीतीही ह्मणतात; आणि यास बीजगणितांत सामान्यतः कामांत घेतात.

२० उपक्रम ह्मणजे सत्यतेचें शोधणें आहे, अशानेंकिं, काहीं सरळ आणि सुगम असा गुण असेल तो आरंभीं घेउन त्यापासून उत्तरोत्तर जीं कारणें उत्पन्न होत जातात त्यांचे आधारानें शेवट होई पर्यंत जावें.— यास युक्तीकरणरीतीही ह्मणतात; आणि हा उपक्रम उपसंहाराचे उलटा आहे, कारण, हा काहीं व्यक्त गुणापासून अव्यक्त शेवटापर्यंत जातो; आणि दुसरा उलटये रीतीनें चालतो, असा किं, इछिली वस्तु सत्य मानून उफराटा काहीं व्यक्त गुणापर्यंत येतो. याजकरितां जेव्हां कोणतीही सत्यता उपसंहारानें सिद्ध केली तरी तीचें प्रतिपादन याचे उलट उपक्रमानेंही होतें; आणि भूमिति प्रतिज्ञांचें पृथक्करण करित्ये समयीं फार उपयोगी आहे किं, पृथक्करणाची सत्यता या दोन क्रमांनीं पुनः पुनः पाहावी.

# गणित



गणित ह्मणजे गणायाची विद्या आहे; आणि शिक्षेचा तो भाग आहे कि, जांत संख्यांचा जाती व गुण दाखविले आहेत, जांत पूर्णांकांचा विषय आहे त्यास पूर्णांक गणित ह्मणतात, आणि जांत पूर्णांकांचे अंशांचा विषय आहे त्यास अपूर्णांक गणित ह्मणतात.

एक ह्मणजे सर्व वस्तूस एकत्वें करून आणवितो; आणि संख्येचा आदि; जसें, एक मनुष्य, एक गोळा, एक तोफ.

संख्या केवळ एक आहे अथवा कित्येक एकांचा योग आहे. जसें, एक मनुष्य, तीन मनुष्यें, दाहा मनुष्यें.

पूर्णांक संख्या ह्मणजे बरोबर एक किंवा बरोबर कित्येक एकांचा योग आहे. जसें, एक, तीन, दाहा, अपूर्णांक संख्येहून वेगळें जाणावया करितां यास पूर्णांक संख्या ह्मणतात. अपूर्णांक संख्या ह्मणजे एकाचीं अनेक खंडें. जसें, एक पाव, एक अर्धा, दोन तृतीयांश, तीन चतुर्थांश.

मुख्य अंक संख्या तीच आहे जीस १ या अंका वांचून दुसरा कोणताही अंक भाजक होत नाहीं; जसें, २, ३, ५, ७, १७, १९ इत्यादि

इत्यादि.

युक्त अंक संख्या तीच आहे जी दोन अथवा याहून अधिक संख्येचा गुणाकार आहे; जसें, ४ . ६ , ८ , ९ , २८, इत्यादि.

## संख्या वाचन लेखन

संख्या वाचन लेखन ह्मणजे भलती अंकांची संख्या शब्देंकरून कशी बोलावी, अथवा खुणेनें कशी आणावी किंवा कशी लिहावी तें सांगतो.

### अंक सगळे नउ त्यांचीं नावें.

| वाचक शब्द | अंक |
|---|---|
| एक. | १ |
| दोन. | २ |
| तीन. | ३ |
| चार. | ४ |
| पांच. | ५ |
| साहा. | ६ |
| सात. | ७ |
| आठ. | ८ |
| नउ. | ९ |

आणखी

| | |
|---|---|
| शून्य. | ० |

हे

हे नउ अंक आपआपला अर्थ वेगळाला दाखवितात; एकल्ये पूज्यांत कांहीं अर्थ नाहीं.

अंकाचा भाव वर लिहिला आहे, त्याशिवाय दुसराही भाव हो तो, तो त्या अंकाचे स्थान भेदानें आणण्यांत येतो; असें या पुढील कोष्टकांत सांगीतलें आहे.

| अर्बुदें. | कोटि. | प्रयुतें. | लक्ष·लाख. | अयुतें. | सहस्र·हजार | शतें·शें. | दशक. | एकं अंक आहे तेथें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ९ | ८ | ७ | ६ | ५ | ४ | ३ | २ | १ |
| | ९ | ८ | ७ | ६ | ५ | ४ | ३ | २ |
| | | ९ | ८ | ७ | ६ | ५ | ४ | ३ |
| | | | ९ | ८ | ७ | ६ | ५ | ४ |
| | | | | ९ | ८ | ७ | ६ | ५ |
| | | | | | ९ | ८ | ७ | ६ |
| | | | | | | ९ | ८ | ७ |
| | | | | | | | ९ | ८ |
| | | | | | | | | ०. |

वर लिहिले अंक यांस उजवेकडोन डावेकडे मोजितां पहिल्ये स्थळींचा अंक आपला शुद्ध सरळ भाव दाखवितो; परंतु दुसर्ये स्थळीं

चा

च्या अंक आपला शुद्धसरळओ भाव आहे त्याचे दशगुण आपला भाव दाखवितो; तिसर्ये स्थळींचा अंक आपला शुद्ध सरळ जो भाव आहे त्याचे शतगुण आपला भाव दाखवितो. याचप्रकारें पुढेंही; कोणताही डाव्येकडील अंक जवळ उजव्येकडील अंकापेक्षां आपला शुद्ध सरळ भाव आहे त्याहून दशगुण अधिक पावतो.

## उदाहरण.

जसें १७९६ या अंकामध्यें पहिल्ये आगेवरचे ६ ते केवळ एक साहाच आहेत; दुसर्ये आगेवरचे ९ ते नउ दशक अथवा नव्वद होतात; तिसर्ये आगेवरचे ७ ते सातशें होतात; चवथ्ये आगेवरचा १ तो एक हजार होतो. ह्मणजे सर्व मिळोन ही संख्या याप्रमाणें उच्चारितात, एक हजार सातशें शाहांणव.

एकल्ये पूज्यांत काहीं अर्थ नाहीं परंतु तें अंकाचे उजवेकडे योजिलें असतां त्या अंकाचें शुद्ध सरळ भावापेक्षां दशगुण अधिक भाव होतो; जसें एकल्ये पांचांचा अंक ५ पांचच एक आहेत, परंतु, त्याचे अंकावर एक पूज्य दिल्हें असतां ५० पांच दशक अथवा पंनास होतात; आणि त्या पंनासांचे अंकावर पूज्य दिल्हें असतां ५०० पांचशें होतात, याप्रमाणें पुढेंही.

१ परार्ध·
२ मध्य·
३ अंत्य·
४ जलधि·
५ शंकु·
६ महापद्में·
७ निखर्व·
८ खर्व·
९ अब्ज·
९ अर्बुदें·
८ कोटी·
७ प्रयुतें·
६ लक्ष·
५ अयुतें·
४ सहस्र·
३ शतें·
२ दशक·
१ एक·

संख्यावाचन ह्मणजे कोणत्येही संख्येचें शब्देंकरून उच्चारण करणें आहे जी संख्या अंकांनीं लिहिली आहे·

मागील

मागील कोष्टकांत अंकाचे स्थल भेदेंकरून भावाचा भेद लिहिला आहे त्याजवर लक्ष्य ठेवून डाव्येकडून आरंभ करून संख्या शब्देंकरून वाचाव्या·

## उदाहरणें

या पुढील संख्या शब्दानीं सांग·

| | | |
|---|---|---|
| ३४ | १५०८० | १३४०५६७० |
| ९६ | ७२००३ | ४७०५००२३ |
| ३८० | १०९०२६ | ३०९०२५६०० |
| ७०४ | ४८३५०० | ४७२३५०७६८९ |
| ६१३४ | २५००६३९ | २७४८५६३९०००० |

९०२८,७५२३०००,६५७८६००३०७०२४

संख्यालेखन म्हणजे कोणतीही संख्या शब्देंकरून सांगीतली ती अंकांनीं लिहिणें आहे·

## उदाहरणें

या पुढील संख्या अंकानीं लिहि·

सत्तावन·

दोनशें शायशी·

नौ हजार दोनशें दाहा·

सत्तावीस हजार पांचशें चौर्याण्णव·

साहा लक्ष चाळीस हजार चारशें एक्यायशी·

बत्तीस

बत्तीस लक्ष साठ हजार एकशें साहा.

चाळीस कोटि ब्यायशी लक्ष पंचावंन हजार एकशें ब्याण्णव.

सत्तावीस अब्जें ऐशी लक्ष शाण्णव हजार दोनशें चार.

दोन खर्व चौपंन कोटि एकलक्ष दाहा हजार सोळा.

एक शंकु एक महापद्म एक्यायशी कोटि चौसष्ट हजार एकशें पंनास.

---

## कार्यप्रकाशकचिन्हें.

गणित आणि बीजगणित यांमध्यें कित्येक कामांचीं प्रकाशक म्हणजे दाखविणारीं चिन्हें आहेत तीं लिहितो.

\+ हें चिन्ह अधिक करण्याचें म्हणजे मेळविण्याचें हें धन चिन्ह.

— हें उणें करण्याचें म्हणजे वजा करण्याचें हें ऋण चिन्ह.

× हें गुणण्याचें.

÷ हें भागण्याचें.

: : : : हें राशिगणित करण्याचें.

= हें म्हणजे शब्दाचें किंवा बराबर.

√ हें वर्गमूळ करण्याचें.

∛ हें घनमूळ करण्याचें.

## यांचीं उपयोग स्थळें ·

५ + ३ यांत ५ आणि ३ यांची मेळवणी करावी · असें मध्यचिन्ह दारववितें ·

६ — २ यांत ६ तून २ उणे करावे · ह्मणजे साहांत दोन वजा करावे ·

७ × ३ यांत सातांनी तीन गुणावे · हें मध्यचिन्ह दारववितें ·

८ ÷ ४ यांत आठ चोहोंनीं भागावे · असें मध्यचिन्ह दारववितें ·

२ : ३ :: ४ : ६ यांत जसे दोन तिहींस · तसे चार साहांस ·

$७^{२}$ यांत सातांच्या वर्ग करावा · हें तो वरच्या लाहान अंक दारववितो ·

$८^{३}$ यांत आठांच्या घन करावा · हे तो वरच्या लाहान अंक दारववितो ·

$\sqrt{३}$ किंवा $३^{\frac{१}{२}}$ यांत तिहींचें वर्गमूळ करावें ·

$\sqrt[३]{५}$ किंवा $५^{\frac{१}{३}}$ यांत पाचांचें घनमूळ करावें ·

## मिळवणी ·

मिळवणी ह्मणजे वेगळाल्ये संख्यांचें एकत्र करणें आहे

अशाकरितां

अशाकरितां किं, त्यांची बेरीज कळेल. तीचा प्रकार सांगतो.

वेगळाल्या संख्या एकीखालीं दुसरी अशा लिहाव्या, अशा रीतीनें किं, त्यांतील अंक जे एक भावाचे आहेत ते एक ओळींत येतील; जसें, एकंमखालीं एकंम, दशाका खालीं दशक, शतां खालीं शतें, इत्यादि, नंतर शेवटील संख्येचे खालीं एक रेघ काढ, नंतर उजव्येकडून खालचे संख्येपासून सर्व संख्यांचे खालीं एकं या प्रथम स्थळांचे जे अंक आहेत. ते एकत्र करून जी संख्या होईल त्यांतील दशक असतील ते हातीं ठेविले समजोन बाकी राहील तीं अंक त्या रेघेखालीं लिहि; बराबरच दशक आले तर, त्या स्थळीं शून्य लिहि, नंतर हातचे दशकांच्या अंक घेउन त्यासुद्धां सर्व संख्यांचे दशक स्थानींचे अंक एकत्र मेळाव; त्यांतील दशक पूर्ववत् हातीं ठेउन राहील तो अंक डावेकडे दुसरे जागेवर मांड, याप्रमाणें मेळवितां शेवटील अंक येईल तो तसाच लिहि ह्मणजे एकंदर बेरीज जाहाली.

---

## बेरजेच्या ताळा पाहाण्याच्या मार्ग.

प्रथम रीति, पूर्वीं जसे खालोन वर अंक मेळवीत गेलास, त्याचप्रमाणें वरोन खालीं मेळवीत ये, तीच बेरीज आली ह्मणजे बेरीज हिशोब खरा. या रीतीच्या ताळा काही मदाने दोन वेळ काम

केल्या

केल्यापासून ह्मणजे पूर्वींचे उलटें.

दुसरी रीति, वरचे संख्येचे खालीं रेघ देउन ती संख्या नाहीं असें मानून बाकी संख्यांची बेरीज घे, नंतर ती बेरीज सोडून दिल्लेल्ये संख्येशीं मेळीव पूर्वी प्रमाणें बेरीज आली ह्मणजे खरी. या रीतीस आश्रय हें प्रत्यक्ष आहे कि समग्रता तीचे अवयांचे बेरजेचे बरोबर आहे.

तिसरी रीति,–वरचे संख्येंतील अंकांची बेरीज घे; आणि त्या बेरिजेंत नव किती आहेत ते शोध– नंतर ते नव टाकून जें बाकी राहील तें त्याच संख्येचे उजव्येकडे लिहि, जसें एथें लिहिलें आहे, नंतर त्याच प्रमाणें सर्व संख्यांस करून जी बाकी राहील ती त्या त्या ओळी समोर लिहावी; जसें एथें ५, ५, ६. तेव्हां या बाक्यांचे बेरिजेंतून नव टाकून जी बाकी

उदाहरण.

| | | |
|---|---|---|
| ३४९७ | नव टाकून बाकी | ५ |
| ६५१२ | | ५ |
| ८२९५ | | ६ |
| १८३०४ | | ७ |

राहील ती उदाहरणाचे बेरिजेचे अंकांचे बेरिजेंतून नव टाकून जी बाकी राहील तीचे बरोबर आली ह्मणजे बेरीज खरी. जसें उजव्येकडील बाक्या. ५, ५, ६. यांची बेरीज १६ त्यांतून नव टाकून बाकी ७ आहे. आणि उदाहरणाची बेरीज १८३०४ यांतील अंकांची बेरीज १६ त्यांतून नव टाकून बाकी ७ राहिले ते पूर्व

बाकीचे

बाकीचे बरोबर* आहेत ·

---

* ताळ्याची ही रीति ९ या अंकाचे गुणांचे आश्रयानें आहे · हा गुण ९ आणि ३ या अंकावाचून दुसर्‍ये कोणत्येही अंकास लागत नाहीं; ह्मणजे कोणतीही संख्या ९ याणीं भागून जी बाकी राहील ती त्याच संख्येतील वेगळाल्ये अंकांची बेरीज ९ याणीं भागून जी बाकी राहील तीचे बरोबर होईल: त्याचें प्रतिपादन या रीतीनें होतें ·

प्रतिपादन; कोणतीही संख्येची प्रतिज्ञा असावी, जसें ४६५८ या संख्येचे अवयवाचें पृथक्करण हें होतें · ४०००+६००+५०+८ परंतु ४००० = ४×१००० = ४×(९९९+१)=(४×९९९)+४, तसें ६००=(६×९९)+६; आणि ५०=(५×९)+५ याजकरितां सांगीतली संख्या ४६५८ =(४×९९९)+४+(६×९९)+६+(५×९)+५+८= (४×९९९)+(६×९९)+(५×९)+४+६+५+८ · आणि ४६५८ ÷ ९=(४×९९९+६×९९+५+९+४+६+५+८)÷९ · परंतु (४×९९९)+(६×९९)+(५×९) स्पष्ट आहे किं हे ९ याणी निःशेष भागिले जातात; याजकरितां जर सांगीतली संख्या ४६५८ ही ९ याणीं भागिली तर त्यांतून जी बाकी राहील ती ४+६+५+८ ही बेरीज ९ याणीं भागून राहिल्ये बाकीचे बरोबर होईल · या पासून स्पष्ट दिसतें किं ही युक्ती दुसर्‍ये कोणत्येही संख्येवर लागेल ·

अशाच रीतीनें दाखविलें जातें किं हा ९ या अंकाचा गुण ३ या अंकावरही लागतो; परंतु, बहुतकरून नवच कामावर घेतात, कारण सुगम आहे ·

आतां, वरचे प्रतिपादनापासून, रीतीचें कारणही स्पष्ट होतें: ह्मणजे दोन किंवा अधिक संख्या वेगळाल्या घेउन त्या प्रत्येकांतून नव टाकून जा वेगळाल्या बाक्या राहिल्या त्यांचा बेरीज घेउन त्यांतून पुनः नव टाकून जी बाकी राहील ती त्या संख्यांचे बेरिजेंतून जातील तितके नव टाकून जी बाकी राहील तीचे बरोबर आहे ·

उदाहरण

## दुसरीं उदाहरणें.

| प्रथम. | दुसरें. | तिसरें. |
|---:|---:|---:|
| १२३४५ | १२३४५ | १२३४५ |
| ६७८९० | ६७८९० | ८७६ |
| ९८७६५ | ९८७६ | ९०८७ |
| ४३२१० | ५४३ | ५६ |
| १२३४५ | २१ | २३४ |
| ६७८९० | ९ | १०१२ |
| ——— | ——— | ——— |
| ३०२४४५ | ९०६८४ | २३६१० |
| २९०१०० | ७८३३९ | ११२६५ |
| ३०२४४५ | ९०६८४ | २३६१० |

चवथें, ३४२६ ; ९०२४ ; ५१०६ ; ८८९० ; १२०४ ; या संख्या मिळवोन बेरीज सांग.

उत्तर २७६५०

पांचवें, ५०९२६७ ; २३५८०९ ; ७२९२० ; ८३९२ ; ४२० ; २१ ; ९ ; या संख्या मिळवोन बेरीज सांग.

उत्तर ८२६८३८

साहावें

साहावें, २; १९; ८१७; ४२९८; ५०९१६; ७३०२०५; ९१८०६३४; या संख्या मिळवोन बेरीज सांग·

उत्तर ९९६६८९१

※ सातवें, विलायती रीती प्रमाणें बारा महिन्यांचे किती दिवस होतात ते सांग·

उत्तर ३६५

आठवें,

| ※ महिने | दिवस |
|---|---|
| जानेवारी | ३१ |
| फेब्रुआरी | २८×१ |
| मार्च | ३१×२ |
| एप्रिल | ३० |
| मे | ३१ |
| जुन | ३० |
| जुलै | ३१ |
| आगष्ट | ३१ |
| सेप्तेंबर | ३०×३ |
| आकटोंबर | ३१ |
| नोवेंबर | ३० |
| डिसेंबर | ३१ |

×१ तीन वर्षेंपर्यंत फेब्रुआरी महिन्याचे २८ दिवस असतात, आणि चौथ्यें वर्षी २९ दिवस होतात, तेव्हां त्या वर्षाचे ३६६ दिवस होतात; आणि अशा वर्षास एकाहाधिक असें विशेषण देतात, म्हणजे त्यास एकाहाधिक वर्ष म्हणतात·

सूर्यानें राशिचक्राचे अतिक्रमणास ज्या बिंदूपासून आरंभ केला त्या बिंदूवर पुनः त्याचे येण्यास ३६५ दिवस, आणि ६ अवरां जवळ जवळ काळ लागतो, म्हणोन ते अधिक अवर साधायाकरितां चौथ्ये वर्षी एक दिवस अधिक गणितात·

या रीती वरून व्यवहारांत कांहीं संदेह पडल्यास हा वाढविलेला दिवस आणि याचे पूर्वीचा दिवस मिळोन एक दिवसा सारिखे मोजितात·

इसवी सनांत सांगितलें वर्ष कोणतें आहे हें जाणायाचें असेल तर त्या वर्षापर्यंत सनाचीं वर्षें चोहोनीं भागावीं, बाकी ० शून्य येईल तर तें एकाहाधिक वर्ष जाणावें, बाकी १ राहिल्यास एकाहाधिकवर्षापासून प्रथम वर्ष, बाकी २ राहिल्यास दुसरें वर्ष, बाकी ३ राहिल्यास तिसरें वर्ष आणावें·

परंतु सन १५८२ वर्षी विलायतेंतील ज्योतिषी यांस कळलेंकिं, सूर्यास राशिचक्रातिक्रमण करायास ३६५ दिवस, ५ अवर, आणि ४९ मिन्युट, लागतात· आणि चोथ्ये वर्षी एकदिवस अधिक गणितात, तेव्हां ४ वर्षांत ४४ मिन्युट अधिक काळ होतो, अशारीतीनें गणितां १३३ वर्षांनीं १ दिवस, आणि २३ मिन्युट अधिक काळ जातो, तेव्हां त्यांचा निश्चय जालाकिं ४०० वर्षांचे समयांत ३ वर्षे एकाहाधिक नकरावीं, म्हणजे १६०० आणि २००० हीं एकाहाधिक वर्षें आहेत, परंतु १७००, १८०० आणि १९०० हीं तीन वर्षें पूर्वकाळींचे रीतीनें एकाहाधिक होतात, परंतु एकाहाधिक नाहींत, कारण, यांणीं असाअर्थ ठरविलाकिं, जा पूर्णशतांचे शतक चोहोंनीं निःशेष भागिले जातात त्या पूर्ण शतांचें वर्ष एकाहाधिक होतें, आणि ज्यांचे शतक चोहोंनीं निःशेष भागिले जात नाहींत त्या पूर्ण शतांचीं वर्षें एकाहाधिक होत नाहींत·

आठवें, एप्रील महिन्याचे पंधराव्ये तारिखेपासून नोवेंबर महि-न्याचे चोविसाव्ये तारिखेपर्यंत हे दोन दिवस आंत घेउन किती दिवस होतात ते सांग·

उत्तर २२४

नउवें, एक फोजेंत ५२७१४ प्यादे, ५११० खासपागेचे स्वार, ६२५० बारगीर, ३९२७ शिलेदार, ९२८ गोलंदाज, १४१० इंजनेर, २५० बेलदार, आणि ४०६ फरंग्ये असे आहेत, तेव्हां सर्व मिळोन किती मनुष्यें आलीं सांग·

उत्तर ७०९९५

## वजाबाकी

वजाबाकी ह्मणजे एक संख्येहून दुसरी संख्या किती अधिक आहे तें दाखविल्ये आणि त्या दोहों संख्यांमध्यें जें अंतर आहे त्यास बाकी ह्मणतात, ती आणावयाचा प्रकार·

---

×२ ×३ मार्च तारीख २१ वी आणि सेप्तेंबर तारीख २२ वी या तारिखांत अवळ अवळ विषुव काळ येतात; त्यांत प्रथमास वसंत विषुव ह्मणतात, आणि दुसर्यास शरद्विषुव ह्मणतात,

सूर्याचे गमनाचा वेग सर्वदा समान नाहीं याजकरितां त्यास वसंतविषुवापासून शरद्विषुव पर्यंत आण्यास अथवा समसूत्राचे उत्तरेकडील राशी अतिक्रमण्यास शरद्विषुवापासून वसंतविषुवपर्यंत आण्यास अथवा समसूत्राचे दक्षिणेकडील राशी अति अतिक्रमण्यास जो काळ लागतो त्याहून ८ दिवस अवळ अवळ अधिक लागतात; ह्मणजे याप्रमाणें,

उत्तर राशींचे अतिक्रमणास १८६ दिवस १४ अवर ५३ मिन्युट·

दक्षिण राशींचे अतिक्रमणास १७८ दिवस १४ अवर ५६ मिन्युट·

यांचें अंतर ७ दिवस २३ अवर ५७ मिन्युट अथवा ८ दिवस अवळ अवळ·

दोहों

दोहों संख्यांमध्यें अधिक संख्या असेल ती वर मांड, त्याखालीं उणी संख्या असेल ती एकं दश या अनुक्रमें मिळवणींत सांगीतलें आहे तशी मांडोन त्याचेखालीं रेघ फाड — नंतर खालचे संख्येंतील उजव्येकडचा शेवटील अंक त्याचेच वरचे अंकांतोन बाद कर, बाकी राहील ती त्या रेघेखालीं मांड, याप्रमाणें डाव्येकडे करीत चाल· — जर खालचे ओळींतला अंक वरचा अंकापेक्षां अधिक असला, तर दाहा उसने घेउन वरचे अंकास मेळीव, मग त्यांतोन खालचा तो अंक बाद करोन बाकी मांड, दशक उसना घेतला आहे तो एक हातचा खालचे ओळीचे दुसर्ये अंकास मिळीव, नंतर तो वरचे अंकांतून बादकर, याप्रमाणें शेवट पर्यंत कर·

यास ताळा पाहाणें·

बाकीची रकम आली आहे ती तीचे वरचे लाहान रकमेस मिळीव; माथ्यावरचे स्मोटये संख्येप्रमाणें बेरीज आली म्हणजे हिंशोब खरा·*

उदाहरणें·

| प्रथम· | दुसरें· | तिसरें· | |
|---|---|---|---|
| ५३८६४२७ | ५३८६४२७ | १२३४५६७ | यांतोन |
| २१६४३१५ | ४२५८७९२ | ७०२९७३ | हे बाद कर |
| ३२२२११२ | ११२७६३५ | ५३१५९४ | बाकी |
| ५३८६४२७ | ५३८६४२७ | १२३४५६७ | ताळा |

* या ताळ्याचे रीतीचें कारण स्पष्ट आहे; म्हणजे, जर दोन संख्यांचें अंतर लाहान संख्येस मिळविलें तर उघडें दिसतें ती बेरीज स्मोटये संख्येचे बरोबर होईल·

चवथें





च्वथें, ५३३१८०६ यांतोन ५०७३९१८ हे बादकर·

उत्तर २५७८८८

पांन्चवें, ७०२०९७४ यांतोन २७६६८०९ हे बादकर·

उत्तर ४२५४१६५

साहावें, ८५०३६०२ यांतोन ५७४२७१ हे बादकर·

उत्तर ७९२९३३१

सातवें, सर ऐसाक न्युंटन अंग्लिस्थानचा स्रोटा ज्योतिषी इसवी संन १६४२ चे वर्षी जन्मला आणि संन १७२७ मध्यें मरण पावला तेव्हां मरत्ये समयीं त्याचें वय किती होतें तें सांग·

उत्तर ८५ वर्षें·

आठवें, महाराष्ट्र देशरीतींत शालिवाहन सिंहासनारूढ आल्यापासून त्याचा शक चालिला, शालिवाहन शके १७४९ आणि विलायती रीतींत जीजस क्रैस्ताचे जन्मदिवसापासून इसवी संन १८२७ तेव्हां या दोहोंत अंतर किती आहे तें सांग·

उत्तर ७८ वर्षें

नववें, विक्रम सिंहासनारूढ आल्यापासून संवत् १८८३ आणि जीजस क्रैस्त जन्मल्यापासून इसवी संन १८२७ तेव्हां या दोहोंत अंतर किती आहे तें सांग·

उत्तर ५६ वर्षें·

दाहावें, जीजसक्रैस्त जन्मल्यापासून इसवीसंन १८२७ आणि

महंमद

महंमद मकाशहरांतून मदिने शहरास गेल्यापासून मुसलमान लोकांचा हिजरी संन १२०५ तेव्हां या दोहोंत अंतर किती आहे तें सांग·

उत्तर ६२२ वर्षे·

अकरावें, तोफेची दारु करण्याची युक्ति इसवी संन १३३० या वर्षांत निघाली, आणि पुस्तकें छापण्याची युक्ति इसवी संन १४४१ या वर्षांत निघाली, तेव्हां या दोन युक्तींचे वर्षांत किती अंतर आहे तें सांग·

उत्तर १११ वर्षे·

बारावें, इसवी संन १६०० या वर्षांत इंग्रेज लोक भरत खंडांत आले आणि सांप्रत तोच संन १८२७ आहे, तेव्हां त्यांस भरत खंडांत येउन किती वर्षे जालीं सांग·

उत्तर २२७ वर्षे·

तेरावें, कोणी एक पुरुष जन्मोन २५५५ वर्षे जाहालीं आणि दुसरा कोणी एकपुरुष जन्मोन १८२२ वर्षे जाहालीं तेव्हां दुसऱ्ये पुरुषाचे पूर्वी पहिल्याचें जन्म किती वर्षे जाहालें सांग·

उत्तर ७३३ वर्षे·

चौदावें, कोणीएक राजानें शके ८११ चे वर्षी ब्राह्मणास भूमी दानकेली त्याकामास शके १७४४ सांत किती वर्षे जाहालीं सांग·

उत्तर ९३३ वर्षे·

---

गुणाकार·

## गुणाकार·

गुणाकार ह्मणजे मिळवणीची एक संक्षेपरीति आहे, जो कोणतीही सांगीतली संख्या तिची तीच पुनःपुनः आली असतां तिची बेरीज घेण्याची रीति दाखवितो; जसें ४ वेळ ६ ह्मणजे २४ आहेत·

जी संख्या गुणायाची अथवा पुनःपुनः घ्यायाची आहे तीस गुण्य ह्मणतात,— जा संख्येनें गुणितात, अथवा गुण्य किती वेळ घ्यायाचा हें जी संख्या दाखविल्ये तीस गुणक ह्मणतात·— आणि जी उत्पन्न जालेली संख्या बेरीज दाखविल्ये तीस गुणाकार ह्मणतात· आणि गुण्यगुणकांस सामान्य नाम पदें ह्मणतात·

खालीं लिहिलेले कोष्टक आरंभींचे १२ पर्यंत संख्यांचे गुणाकार दाखवितात, त्यांस गुणाकार कोष्टक अथवा पैथागोरासांचे ※ कोष्टक ह्मणतात· ते पुढील उदाहरणांचे पूर्वीं निश्चय मुखपाठ केले पाहिजेत·

---

※ इसवीसनाचे पूर्वी ५९० वर्षांवर पैथागोरास या नांवाचा एक मनुष्य विलायतेंत ह्मोटा विद्वान् गणिती होता·

गुणाकार कोष्टक·

# गुणाकारकोष्टक-

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| २ | ४ | ६ | ८ | १० | १२ | १४ | १६ | १८ | २० | २२ | २४ |
| ३ | ६ | ९ | १२ | १५ | १८ | २१ | २४ | २७ | ३० | ३३ | ३६ |
| ४ | ८ | १२ | १६ | २० | २४ | २८ | ३२ | ३६ | ४० | ४४ | ४८ |
| ५ | १० | १५ | २० | २५ | ३० | ३५ | ४० | ४५ | ५० | ५५ | ६० |
| ६ | १२ | १८ | २४ | ३० | ३६ | ४२ | ४८ | ५४ | ६० | ६६ | ७२ |
| ७ | १४ | २१ | २८ | ३५ | ४२ | ४९ | ५६ | ६३ | ७० | ७७ | ८४ |
| ८ | १६ | २४ | ३२ | ४० | ४८ | ५६ | ६४ | ७२ | ८० | ८८ | ९६ |
| ९ | १८ | २७ | ३६ | ४५ | ५४ | ६३ | ७२ | ८१ | ९० | ९९ | १०८ |
| १० | २० | ३० | ४० | ५० | ६० | ७० | ८० | ९० | १०० | ११० | १२० |
| ११ | २२ | ३३ | ४४ | ५५ | ६६ | ७७ | ८८ | ९९ | ११० | १२१ | १३२ |
| १२ | २४ | ३६ | ४८ | ६० | ७२ | ८४ | ९६ | १०८ | १२० | १३२ | १४४ |

हरकोणती संख्या, बारांचे आंत कोणत्येही संख्येनें गुणायाचा प्रकार·

गुण्यांकाचे

※ गुण्यांकांचे शेवटींचा अंक एकंची जागा त्याचे खालीं गुणक अंक लिहि; आणि त्याचे खालीं रेघ फाड.— गुणक अंकानें एकंपासोन अनुक्रमानें एकएक गुण्यांक गुण.— हरएक गुणाकार दशकापेक्षां अधिक आल्यास तो वरचा अंक अथवा बरोबर दशकच आल्यास तेंपूज्य त्या रेघेखालीं लिहि.— बाकी दशक पुढील गुण्यांक गुणोन त्यांत मिळीव, याप्रमाणें शेवटपर्यंत कर, शेवटील अंकाचा गुणाकार जो येईल तो तसाच मांड, ह्मणजे गुणाकार हिंशोब जाहाला.

## उदाहरण

| | |
|---|---|
| ९ ८ ७ ६ ५ ४ ३ २ १ ० | गुण्य. |
| २ | गुणक. |
| १ ९ ७ ५ ३ ० ८ ६ ४ २ ० | गुणाकार |

※ या रीतीचें कारण त्या कारणा सारिखें आहे जें मिळवणींत सांगीतलें, जांत वेगळाले गुणाकार अनुक्रमें उत्पन्न जाल्यानंतर जे दशक उत्पन्न होतात ते अनुक्रमें एकामागें एक असे मागील अंकास मिळवितात, आणि वेगळाले गुणाकार एकाखालीं एक करून त्यांची बेरीज घ्यावयाचें जवळचे उदाहरणा प्रमाणें प्रयोजन नाहीं.

| | | |
|---|---|---|
| ५ ६ ७ ८ | | |
| ४ | | |
| ३ २ | = | ८ × ४ |
| २ ८ ० | = | ७ ० × ४ |
| २ ४ ० ० | = | ६ ० ० × ४ |
| २ ० ० ० ० | = | ५ ० ० ० × ४ |
| २ २ ७ १ २ | = | ५ ६ ७ ८ × ४ |



हरकोणतीही

※ हरकोणतीही संख्या बारांपेक्षां अधिक संख्येनें गुणायाची रीति·

गुण्यांचे खालीं एकखालीं एक दशकाखालीं दशक अशा अनुक्रमानें गुणक लिही. नंतर त्याखालीं रेघ फाड·— मग एकंपासून एका गुणकांकानें सर्वगुण्यांक वर सांगीतल्ये रीतीप्रमाणें गुणून, त्यारेघेचे खालीं गुणकांकाचे एकखालीं एक अशा अनुक्रमें मांडीत चाल, याच प्रमाणें दुसर्ये गुणकांकाने सर्वगुण्यांक गुणून त्यागुणकांकाचे खालींपासोन गुणाकारलिही, याप्रमाणें गुणकांक जितके असतील तितक्या गुणाकारांच्या पंक्ती होतील·— त्यांचे खालीं रेघ फाडोन वरचे पंक्तींची एकंदर मेळवणी कर, बेरीज येईल तें उत्तर अथवा इछिला गुणाकार जाहाला·

---

※ पूर्वरीतीप्रमाणे गुणकाचे प्रथम अंकानें गुण्याच्या गुणाकार उत्पन्न करून, असे कल्पिलें आहे किं, गुणकाचे वेगळाले भाग केले आहेत, आणि गुणकाचे दुसर्ये अंकानें गुण्याच्या गुणाकार पूर्व प्रमाणें उत्पन्न करितात; परंतु हा गुणकाचा दुसरा अंक दशकस्थळींचा आहे, तेव्हां त्यापासून जो गुणाकार उत्पन्न आला तो त्याचे शुद्ध भावाचे दशगुण भावाचा आहे; आणि याचे कारणास्तव त्यागुणाकाराच्या प्रथम अंक दशकस्थळीं लिहावा; अथवा त्याचे बरोबर गुणक आहे म्हणजे ज्या गुणकांकानें गुणिला त्या गुणकांकाचे खालीं लिहावा· आणि या रीतीनें गुणकाचे प्रत्येक वेगळाल्ये अंकांनीं गुणून, स्पष्ट आहे किं गुण्याचे सर्व अवयव गुणकाचे सर्व अवयवांनीं गुणिले जातील, अथवा सगळा गुण्य सगळ्ये गुणकानें गुणिला जाईल! याजकरितां या वेगळाल्ये गुणाकारांची बेरीज इछिल्ये सगळ्ये गुणाकाराचे बरोबर होईल; जसें जवळचे उदाहरणांत दाखविलें आहे·

| | | | |
|---|---|---|---|
| १२३४५६७ | गुण्य | | |
| ४५६७ | गुणक | | |
| ८६४१९६९ | = | ७ | वेळ गुण्य |
| ७४०७४०२ | = | ६० | वेळ गुण्य |
| ६१७२८३५ | = | ५०० | वेळ गुण्य |
| ४९३८२६८ | = | ४००० | वेळ गुण्य |
| ५६३८२६७४८९ | = | ४५६७ | |

गुणाकार

## गुणाकार तपासावयाची रीति.

गुणाकार तपासावयाच्या रीति तीन आहेत त्या लिहितो.

प्रथम रीति. — गुण्याचे जागीं गुणक आणि गुणकाचे जागीं गुण्य याप्रमाणें बदल करून मांड, नंतर खालचे अंकांनीं वरचे अंक पूर्व रीती प्रमाणें गुणून बेरीज घे. गुणाकार बराबर आला ह्मणजे खरा.

दुसरी रीति*. — उदाहरणाचे बाजूस × याप्रमाणें दोन रेघा काढ, नंतर गुण्यांकांची एकत्र मेळवणी करून ती बेरीज नवांनीं भागून बाकी राहील ती त्या दोन रेघांचे कंबरेस एकीकडे मांड, तशीच गुणकांकांची बेरीज करून नवांनीं भागून बाकी राहील ती दुसर्‍येकडे मांड, नंतर गुण्यांकांची बाकी गुणकांकांचे बाकीनें गुणून जो गुणाकार येईल तो नवांनी

* ताळयाची ही रीति ९ या अंकाचे गुणापासून आहे, जीचा विस्तार पूर्वी मिळवणीचे ताळयामध्यें सांगितला आहे. तेथे जें कारण आश्रय सांगितलें तेंच एथे आहे. या रीतीचें प्रतिपादन याहून उघडें आहे तें सांगतो; — दोन पदांमध्यें किती नवक आहेत ते दाखवायाकरितां प आणि क्ष घे. आणि नवक सोडून जी बाकी राहील ती दाखवायाकरितां अ आणि ब घे; तर हे गुण्य गुणक हीं दोन पदें होतील ९प + अ, आणि ९क्ष + ब. त्यांचा गुणाकार हाच होईल; (९प × ९क्ष) + (९प × ब) + (९क्ष × अ) + (अ × ब); परंतु या गुणाकारांतील प्रथम तीन गुणाकारांमध्यें नवक बरोबर आहेत, कांकिं, दोन पदांतील अथवा एकेक पदांतील नवक बरोबर आहेत; याजकरितां यांस टाकून बाकी अ + ब इतकी मात्र राहिली. आणि हेही परस्पर गुणून त्या गुणाकारांतून नवक टाकून जी बाकी राहिली ती सगळ्ये गुणाकारांतून नवक टाकून राहिल्ये बाकीचे बरोबर होईल; परंतु वर घेतल्या प्रमाणें अ आणि ब या गुण्य गुणक पदांच्या बाक्या आहेत, आणि अ × ब हा त्या बाक्यांचा गुणाकार आहे, तेव्हां ही रीति सत्य आहे. कदाचित् अंकाचे स्थळांतरापासून संदिग्ध होईल.

भागून

भागून बाकी राहील ती वर मांड, मग गुणाकाराची मेळवणी करून नवां-नीं भागून बाकी राहीलती खालीं मांड, यांत वर आणि खालीं एकच अं-क आलानर, तो गुणाकार खरा·

तिसरी रीती, गुणाकाराची ताळा भागाकारापासूनही होतो, गुण्य गुणकांतील एकपदानें गुणाकार भागिला असतां दुसरें पद निघतें, परंतु हें भागाकार शिकल्याचे पूर्वीं समजायाचें नाहीं·

उदाहरणें·

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | ३ | ५ | ४ | २ |
| | | | | ६ | १ | ९ | ६ |
| | | | २ | १ | २ | ५ | २ |
| | | ३ | १ | ८ | ७ | ८ | |
| | | ३ | ५ | ४ | २ | | |
| २ | १ | २ | ५ | २ | | | |
| २ | १ | ९ | ४ | ६ | २ | ३ | २ |




| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | ६ | १ | ९ | ६ | गुण्य |
| | | | | ३ | ५ | ४ | २ | गुणक |
| | | | १ | २ | ३ | ९ | २ | |
| | | २ | ४ | ७ | ८ | ४ | | |
| | ३ | ० | ९ | ८ | ० | | | |
| १ | ८ | ५ | ८ | ८ | | | | |
| २ | १ | ९ | ४ | ६ | २ | ३ | २ | गुणाकार |

दुसरीं उदाहरणें·

प्रथम, १२३४५६७८९ हे गुण्य ३ या गुणकानीं गुण·

गुणाकार ३७०३७०३६७

दुसरें· १२३४५६७८९ हे गुण्य ४ या गुणकानीं गुण

गुणाकार ४९३८२७१५६

तिसरें

तिसरें, १२३४५६७८९ हे गुण्य ५ या गुणकानें गुण-

गुणाकार ६१७२८३९४५

चवथें, १२३४५६७८९ हे गुण्य ६ या गुणकानें गुण-

गुणाकार ७४०७४०७३४

पांचवें, १२३४५६७८९ हे गुण्य ७ या गुणकानें गुण-

गुणाकार ८६४१९७५२३

साहावें, १२३४५६७८९ हे गुण्य ८ या गुणकानें गुण-

गुणाकार ९८७६५४३१२

सातवें, १२३४५६७८९ हे गुण्य ९ या गुणकानें गुण-

गुणाकार ११११११११०१

आठवें, १२३४५६७८९ हे गुण्य ११ या गुणकांनीं गुण-

गुणाकार १३५८०२४६७९

नववें, १२३४५६७८९ हे गुण्य १२ या गुणकांनीं गुण-

गुणाकार १४८१४८१४६८

दाहावें, ३०२९१४६०३ हे गुण्य १६ या गुणकांनीं गुण-

गुणाकार ४८४६६३३६४८

अकरावें, २७३५८०९६१ हे गुण्य २३ या गुणकांनीं गुण-

गुणाकार ६२९२३६२१०३

बारावें, ४०२०९७३१६ हे गुण्य १९५ या गुणकांनीं गुण-

गुणाकार ७८४०८९७६६२०

८३

तेरावें, ८२१६४९७३ हे गुण्य ३०२७ या गुणकांनीं गुण·

गुणाकार २४८७१३३७३२७१

चवदावें, ७५६४९०० हे गुण्य ५७९ या गुणकांनीं गुण·

गुणाकार ४३८००७७१००

पंधरावें, ८४९६४२७ हे गुण्य ८७४३५९ या गुणकांनीं गुण·

गुणाकार ७४२८९२७४१५२९३

सोळावें, २७६०३२५ हे गुण्य ३७०७२ या गुणकांनीं गुण·

गुणाकार १०२३३०७६८४००

## गुणाकार संक्षेप·

प्रथम रीति·— गुण्य आणि गुणक यांत जर पूज्यें आलीं·

संख्येचे शेवटास उजव्येकडे जीं पूज्यें असतील तीं सोडून वरचे अंक खालचे अंकांनीं गुणोन पूर्वी प्रमाणें त्या त्या अंकाखालीं मांडीन चाल, सर्व अंक गुणल्यावर पूर्वी प्रमाणें बेरीज घेउन तीं पूज्यें मोजून तितकीं पूज्यें त्या बेरिजेचे शेवटास उजव्येकडे दे, जर गुणकामध्यें पूज्य आलें तर तें सोडून त्याचे अलीकडे अंक असेल त्याणें गुण्य गुणून त्याच अंकाखालींपासून ल्याहावें; नंतर पूर्ववत् बेरीज घ्यावी· ह्मणजे गुणाकार जाहाला·

उदाहरणें

## उदाहरणें·

प्रथम,

| |
|---:|
| ९००१६३५ |
| ७०१०० |
| ९००१६३५ |
| ६३०११४४५ |
| ६३१०१४६१३५०० |

दुसरें,

| |
|---:|
| ३९०७२०४०० |
| ४०६००० |
| २३४४३२२४ |
| १५६२८८१६ |
| १५८६३२४८२४००००० |

तिसरें, ८१५०३६०० हे गुण्य ७०३० या गुणकांनीं गुण·

गुणाकार ५७२९७०३०८०००

चवथें, ९०३०१०० हे गुण्य २१०० या गुणकांनीं गुण·

गुणाकार १८९६३२१००००

पांचवें, ८०५७०६९ हे गुण्य ७००५० या गुणकांनीं गुण·

गुणाकार ५६४३९७६८३४५०

### दुसरी रीति·

※ गुणक गुणाकार कोष्टकांतील दोन किंवा अधिक संख्यांचा गुणाकार असेलतर त्याचे मूळ गुण्य गुणक अंकांनीं गुण्य गुणावा, म्हणजे एकानें गुणून तो गुणाकार दुसर्यानें पुनः गुणावा·

※ या रीतीचें कारण उघडें आहे; कोणती ही संख्या दुसर्‍ये संख्येचे वेगळाल्ये अवयवांनीं गुणून जो गुणाकार होईल तो, सगळ्ये संख्येनें गुणून आल्ये गुणाकाराचे बरोबर होईल· म्हणजे प्रथम उदाहरणीं सांगीतल्ये संख्येच्या ८ येक ७ यांचा गुणाकार सांगीतली संख्या ५६ वेळ इतक्याचे बरोबर आहे·

## उदाहरणें

प्रथम, ५१३०७२९८ हे गुण्य ५६ ह्मणजे ७ येळ ८ तेव्हां ७ आणि ८ या दोन गुणकांनीं गुण.

```
 ५१३०७२९८
         ७
----------
 ३५९१५१०८६
         ८
----------
२८७३२०८६८८
```

दुसरें, ३१७०४५९२ हे गुण्य ३६ या गुणकांनीं गुण.

गुणाकार ११४१३६५३१२

तिसरें, २९७५३८०४ हे गुण्य ७२ या गुणकांनीं गुण.

गुणाकार २१४२२७३८८८

चवथें, ७१२८३६८ हे गुण्य ९६ या गुणकांनीं गुण.

गुणाकार ६८४३२३३२८

पांचवें, १६०४३०८०० हे गुण्य १०८ या गुणकांनीं गुण.

गुणाकार १७३२६५२६४००

साहावें, ६१८३५७२० हे गुण्य १३२० या गुणकांनीं गुण.

गुणाकार ८१६२३१५०४००

सातवें, कोणी एके फौजेंत पळटणें १०४ होतीं दर पळटणांत मनुष्यें ५०० तेव्हां त्या फौजेंत सगळीं मनुष्यें किती तें सांग.

उत्तर ५२०००

आठवें, कोणी एक देशांत सावकाराच्या गाडया २५० आत होत्या दर गाडींत नारळ ३२० होते त्या सर्वगाडया चोरानीं नेल्या तेव्हां सावकारास किती नारळ नुकसान आहालें तें सांग·

उत्तर ८००००

---

## भागाकार

भागाकार ह्मणजे वजाबाकीचे संक्षेपासारिखा आहे, आणखी भलत्ये संख्येमध्यें कोणती संख्या किती वेळा आहे हें दाखवितो, अथवा भलत्ये संख्येंतून कोणती संख्या किती वेळा निघूं सकत्ये हें दाखवितो·

जी संख्याभागावयाची आहे तीस भाज्य ह्मणतात·— जा संख्येनें भाग करायाचे तीस भाजक ह्मणतात·— भाज्यांतून भाजक जितके वेळ निघतो त्यावेळसंख्येस भागाकार ह्मणतात· कदाचित् भागाकार होउन काहीं बाकी राहात्ये·

भाज्य, भाजक, आणि भागाकार, हे तीन मांडावयाची रीति, मध्यें भाज्य मांड, त्याचे डाव्येकडे ) असें चिन्ह करून त्यांत भाजक मांड, आणि उजव्येकडे ( असें चिन्ह करून त्यांत भागाकार येईल तो

लिही·

लिही· जसें १२ हे भाज्य ४ या भाजकानें भाग·

भाज्य

भाजक ४ ) १२ ( ३ भागाकार हें दाखविती किं बारामध्यें ४ तीनवेळ आहेत अथवा बारांतून तीनवेळ ४ वजा होतात जसें बाजूवर दाखविलें·

१२
४
——
८ बाकी
४
——
४ बाकी
४
——
० बाकी

※ रीति·— भाजक भाज्याचे डाव्येकडे वर सांगीतल्ये प्रमाणें मांडून पाहा कीं हे भाजकाचे अंक त्या भाज्यांतून आयास जितके भाज्याचे अंक असावे तितके घेउन त्यांतून तो किती वेळ वजा होईल तो पाहा नंतर तितकावेळ संख्या अंक वर सांगीतल्ये प्रमाणें उजव्येकडे भागांकारस्थळीं मांड· या उजव्येकडचे अंकानीं भाजक गुणून गुणाकार

---

※ या रीतीनें भाज्याचे वेगळाले भाग केले जातात, आणि एकेक भागांतून भाजक कितीवेळा जातो तें तपाशिल्या पासून कळतें, आणि ते वेळांक एकापुढें एक भागाकारस्थळीं लिहितात, आणि ते सर्व मिळून भागाकारसंख्या होत्ये·

भागाकार होउन काहीं बाकी न राहिल्यास तो भागाकार प्रश्नाचें पूर्ण उत्तर आहे· परंतु जर बाकी राहिली तर तिजमधून भाजक आधाचा इतकें अधिक आहे· ह्मणजे जर बाकी भाजकाचा एक चतुर्थांश आहे आयाचे एक पुर्थे वेळाचा एक चतुर्थांश आहे· आणखी इत्यादि· याजकरितां भागाकारास पुराकरणें तर त्याचे उजव्येकडे बारीक अंकानीं बाकी लिहून तिचे खालीं रेघकरून खालीं तसांच भाजक लिहि·

भाज्याचे

भाज्याचे पूर्व घेतल्ये अंकाचे खालीं मांड. — नंतर हा गुणाकार भाज्याचे जा अंकाखालीं आहे त्यांतून वजाकरून बाकी खालीं मांड, नंतर त्यापुढील भाज्यांकांतून एक अंक या बाकीचे उजव्येकडे पुढें मांड, यांतून कितीवेळ भाजक आईल तितका वेळांक भागांकाचे उजवेकडे मांड, याप्रमाणें भाज्यांक खालीं आणण्यास नराहिला पर्यंत कर, कधीं भाज्यांकांतून भाजक जातनाहीं तर उजव्येकडे भागांकावर पूज्य दे आणि वरचा दुसरा भाज्यांकांतून अंक घेउन त्यांतून भाजक पूर्ववत् वजाकरून भागांक त्या पूज्यापुढें मांड.

## भागाकाराचा ताळा

※ भागाकारानें भाजक गुणोन त्यांत भागाकाराची बाकी मेळीव ती बेरीज भाज्याचे बरोबर आली ह्मणजे भागाकार खरा.

---

※. ताळ्याची हीरीति स्पष्ट आहे, कारण, भागाकार दाखवितो कीं भाज्यांतून भाजक कितीवेळ जातो, तेव्हां भागाकारानें भाजक गुणिला असतां गुणाकार निश्चय भाज्याचे बरोबर होईल.

भागाकाराचा ताळा दाखवायाकरितां अनेक रीती आहेत त्यांतून अति उपयोगी रीति सांगतो.

दुसरी रीति. — राहिली बाकी सगळ्ये भाज्यांतून वजाकर, नंतर हीनवी बाकी भागाकारानें भागून जो नवा भागाकार येईल तो भाजकाचे बरोबर आला ह्मणजे हिंशोब खरा.

तिसरी रीति. — भाजक आणि भागाकार यांचे कामाचे समयी वेगळाले जे गुणाकार केले आहेत त्यांत शेवटील गुणाकारास बाकी मिळवून त्या सर्वांची अनुक्रमें बेरीज घे. ती बेरीज भाज्याचे बरोबर आली ह्मणजे हिंशोब खरा.

उदाहरणें.

## उदाहरणें

### प्रथम

३ ) १ २ ३ ४ ५ ६ ७ ( ४ १ १ ५ २ २
१ २
· · ३
· ३
· ४
३
१ ५
१ ५
· · ६
६
· ७
६
१ बाकी

४ १ १ ५ २ २
३
१ २ ३ ४ ५ ६ ६
१
१ २ ३ ४ ५ ६ ७ ताळा

दुसरें,

```
३७ ) १२३४५६७८ ( ३३३६६६          ३३३६६६
     १११                              ३७
     ---                         -------
      १२४                        २३३५६६२
      १११                       १०००९९८
      ---                       --------
       १३५                      १२३४५६४२
       १११                            ३६
       ---                      --------
        २४६                     १२३४५६७८ ताळा.
        २२२
        ---
         २४७
         २२२
         ---
          २५८
          २२२
          ---
           ३६ बाकी
```

तिसरें, ७३१४६०८५ हे भाज्य ४ या भाजकानें भाग.

भागाकार १८२८६५२१ $\frac{1}{4}$

चवथें, ५३१७९८६०२७ हे भाज्य ७ या भाजकानें भाग.

भागाकार ७५९७१२२८९ $\frac{4}{7}$

पांचवें, ५७०१९६३८२ हे भाज्य १२ या भाजकांनीं भाग·

भागाकार ४७५१६३६५ २/१२

साहावें. ७४६३८१०५ हे भाज्य ३७ या भाजकांनीं भाग·

भागाकार २०१७२४६ ३/३७

सातवें, १३७८९६२५४ हे भाज्य ९७ या भाजकांनीं भाग·

भागाकार १४२१६१० ८४/९७

आठवें, ३५८२१६४९ हे भाज्य ७६४ या भाजकांनीं भाग·

भागाकार ४६८८६ ७४५/७६४

नववें. ७२०९१३६५ हे भाज्य ५२०१ या भाजकांनीं भाग·

भागाकार १३८६१ ७०४/५२०१

दाहावें, ४६३७०६४२८३ हे भाज्य ५७६०६ या भाजकांनीं भाग·

भागाकार ८०४९६ ११७०७/५७६०६

अकरावें, आंब्याचीं फळें ४७१ आहेत तीं तिघांस वांटून दे तां एकएकास किती येतात ते सांग·

उत्तर १५७

बारावें, कोणीएक सर्कारचाकर ३७८ कोसांवर राहात आहे त्यास १८ दिवसांत हुजूर यावें ऐशी सर्कारची आज्ञा जाहाली तेव्हां त्याणें दररोज किती कोस चालावें ह्मणजे अठराव्ये दिवशीं हुजूर येउन पावेल तें सांग·

उत्तर २१ कोस

तेरावें; कोणा एक मनुष्यास वर्षाचें रुपये ३८३२५ मिळतात तेव्हां दररोज किती रुपये आले ते सांग. वर्षाचे दिवस ३६५.

उत्तर १०५.

## भागाकार संक्षेप

भागाकार संक्षेप ह्मणजे भागाकार थोडक्यांत करण्याचा कित्येक रीती आहेत.

प्रथम रीति. — भाजक बारांचे अंका पावेतों असला तर पूर्वीप्रमाणे लांब तपशील करूनको भाजक पूर्व रीतीप्रमाणें डाव्येकडे मांडून भाज्याचे खालीं रेघ फाड, नंतर पूर्वीप्रमाणें गुणाकार आणि वजाबाकी मनांत करून त्या रेघेखालीं भागाकार लिहि.

## उदाहरणें

३) ५६१०३९६१
  १८७०१३२० $\frac{१}{३}$

४) ५२६१९६७५

५) १३७९१९२

६) ३८६७२९४०

७) ८१३९६६२७

८) २३७१८९२०

९) ४३९८१९६२

११) ५६७१४२३०

१२) २७९८०३७३

दुसरी.

दुसरी रीति*.— जर भाजकाचे उजव्येकडे पूज्य असेल तर याप्रमाणें करावें, भाजकाचे उजव्येकडे जितकीं पूज्यें आहेत तीं कापून नाहींत असें मनांत आण; आणि तीं पूज्यें जितकीं तितके उजव्ये शेवटाकडील भाज्यांक कापून ते नाहींत असें मनांत आण, नंतर त्या पूज्यरहित भाजकानें तो भाज्य कापल्यापर्यंत भाग, भागाकार होउन बाकी राहील त्याचे उजव्येकडे भाज्यांक कापून ठेविले आहेत ते मांड, आणि त्याचे खालीं भाजक लिहून त्याचे उजव्येकडे तीं पूज्यें लिही ते अपूर्णांक बाकी आहे ती दाखवितात.

उदाहरणें

प्रथम, ३७०४१९६ हे भाज्य २० या भाजकांनीं भाग.

२० ) ३७०४१९६

१८५२०९ $\frac{१६}{२०}$

* भागाकार करत्ये समयीं पूज्य पुनःपुनः न यावें याजकरितां ही रीति कामांत घेतली आहे आणि तिची सत्यता उघडी आहे. प्रत्येकांतून पूज्यें अथवा त्यांचे बरोबर अंक कापून भागणें आणि १०, १००, १०००, इत्यादिकांनीं भागणें हें बरोबर आहे; आणि स्पष्ट आहे कीं, सगळा भाजक सगळ्ये भाज्यांतून जितके वेळ जातो तसा भाजकाचा कोणताही भाग भाज्याचे तसेच भागांतून तितके वेळ जाईल.

दुसरें, ३१०८६९०१ हे भाज्य ७१०० या भाजकांनीं भाग·

```
७१००) ३१०८६९०१ ( ४३७८ ३१०१/७१००
       २८४
       ----
       ·२६८
        २१३
        ----
        ·५५६
         ४९७
         ----
         ·५९९
          ५६८
          -----
          ·३१०१
          -----
           ७१००
```

तिसरें, ७३८०९६४ हे भाज्य २३००० या भाजकांनीं भाग

भागाकार ३२० $\frac{१०९६४}{२३०००}$

चवथें, २३०४१०९ हे भाज्य ५८०० या भाजकांनीं भाग·

भागाकार ३९७ $\frac{१८०९}{५८००}$.

तिसरी रीति·— जेव्हां भाजक यारांचे आंत दोन किंवा अधिक संख्यांचा बरोबर गुणाकार आहे; सांगीतल्ये सगळ्ये[×] भाजकानें भाज्य भागल्या वांचून त्या त्या वेगळाल्ये संख्यांनीं भाज्य वेगळाले भाग·

---

[×] ही रीति गुणाकार संक्षेपाचे दुसर्ये रीती सारिखी आहे तीचे उलटीभाजं आहे; कारण, कोणत्येही वस्तूचें तृतीयभागाचें अर्ध त्या वस्तूचा निःसंशय षष्ठभाग आहे; दुसरी कोणती ही संख्या याच प्रमाणें आहे·— सर्व वेगळाल्ये बाक्यांपासून सगळी सत्य बाकी काढायाचें कारण व्यवहारी अपूर्णांकाचे गुणापासून स्पष्ट दिसेल· जसें वरचे प्रथम उदाहरणांत, प्रथम बाकी १ आहे आणि प्रथम भाजक ७ म्हणजे $\frac{१}{७}$ आला; हा दुसरी बाकी ६ याशिं मिळविला पाहिजे म्हणजे ६$\frac{१}{७}$ आला· आस ८ यांणीं भागायाचा आहे· परंतु ६$\frac{१}{७}$ = $\frac{६\times७+१}{७}$ = $\frac{४३}{७}$; यास ८ यांणीं भागून = $\frac{४३}{७\times८}$ = $\frac{४३}{५६}$

टीप

टीप · या रीतीनें काम करून प्रायशः प्रत्येक भागाकारांस वेगळ्या वाक्या राहातात; आणि सगळ्ये भाजकानें भाज्य भागून जी सत्य बाकी राहात्ये ती या वेगळाल्ये बाक्यांपासून काढायाची ही रीति आहे। शेवटील बाकी उपांत्य भाजकानें गुणावी, आणि त्या बाकीचे पूर्वींची बाकी या गुणाकाराशीं मिळवावी; आणि या बेरिजेस पूर्व जवळचे भाजकानें गुणावें; आणि या गुणाकारास पूर्व जवळची बाकी मिळवावी; आणि याप्रमाणें सर्व भाजक आणि बाक्या यांणी काम करावें तें आरंभपर्यंत· असें या उदाहरणीं·

## उदाहरणें

प्रथम, ३१०४६८३५ यांस ५६ अथवा ७ वेळ ८ याणीं भाग·

```
७) ३१०४६८३५                              ६ शेवटील बाकी
८)  ४४३५२६२ — १ प्रथम बाकी·              ७ उपांत्य भाजक·
     ५५४४०७ — ६ दुसरी बाकी·             ——
                                          ४२
उत्तर ५५४४०७ ४३/५६                         १ प्रथम बाकी·
                                          ——
                                          ४३ सगळी बाकी·
```

दुसरें, ७०१४५९६ यांस ७२ याणीं भाग·

उत्तर ९७४२४ $\frac{६८}{७२}$

तिसरें, ५१३०६५२ यांस १३२ याणीं भाग·

उत्तर ३८८६८ $\frac{७६}{१३२}$

चौथें, ८३०१६५७२ यांस २४० याणीं भाग·

उत्तर ३४५९०२ $\frac{९६}{२४०}$

चौथीरीति

चौथी रीति. — सरळ भागाकार दुसर्‍ये अतिसंक्षेप रीतीनें होईल, ह्मणजे असें, वेगळाले गुणाकार उत्पन्न होतात ते नलिहितां बाक्या मात्र लिहाव्या; ह्मणजे पूर्वप्रमाणें भाजकास भागाकार अंकानें गुण, आणि त्या गुणाकाराचे जसे जसे वेगळाले अंक अनुक्रमें उत्पन्न होतात ते लागलेच वरचे भाज्यांतून वजा करून बाकी खालीं लिहि; परंतु स्मरण ठेवावें जे हातचे दशक घेतले असतील ते पूर्व अंकाचे गुणाकारांत मिळवावे.

## उदाहरणें

प्रथम, ३१०४६७९ यांस ८३३ याणीं भाग.

८३३) ३१०४६७९ (३७२७ $\frac{८८}{८३३}$
६०५६
२२५७
५९१९
८८

दुसरें, ७९१६५२३८ यांस २३८ याणी भाग.

उत्तर ३३२६२७ $\frac{१२}{२३८}$

तिसरें, २९१३७०६२ यांस ५३१७ याणी भाग.

उत्तर ५४७९ $\frac{५२१९}{५३१७}$

चौथें, ६२०१५७३५ यांस ७८०३ याणी भाग.

उत्तर ७९४७ $\frac{५२९४}{७८०३}$

# भांजणी

भांजणी ह्मणजे संख्येचें नाम आणि रूप याचा बदल होतो परंतु किमत आहे तीच आहे, ही भांजणी प्रायशः पैका तोल आणि माप यांचे कामांत येत्ये.

जेव्हां भारी नामाचे संख्येस हलक्ये नामांत आणायाची आहे तेव्हां उतरती भांजणी ह्मणतात, तसेंच हलक्ये नामाचे संख्येस भारी नाम द्यावयाचें आहे तेव्हां तीस चढती भांजणी ह्मणतात.

भांजणीची रीति सांगायाचे पूर्वी पैका, तोल आणि माप यांचे कोष्टक लिहिले पाहिजेत.

## पैका, वजन, आणि माप, याचे कोष्टक.

### मुंबई चलनी पैक्याचे कोष्टक.

| | | | |
|---|---|---|---|
| १०० रेस | ह्मणजे | १ | पावला. |
| ४ पावले | = | १ | रुपया |

| रे. | | पा. | | |
|---|---|---|---|---|
| १०० | ह्मणजे | १ | | रु. |
| ४०० | = | ४ | = | १ |

### अंग्लेजस्थान चलनी पैक्याचे कोष्टक.

| | | | |
|---|---|---|---|
| २ फार्दिंग | = | १ | हाफपेंनि |
| ४ फार्दिंग | = | १ | पेंनि |
| १२ पेंन्स* | = | १ | शिलिंग |
| २० शिलिंग | = | १ | पौंड |

| फा | | पें. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | = | १ | | शि | | |
| ४८ | = | १२ | = | १ | | पौं |
| ९६० | = | २४० | = | २० | = | १ |

* हें पेंनि शब्दाचें अनेकवचन.

## भावप्रमाण कोष्टक·

कोष्टक, जे मुंबई चलनी रुपयांचा मुंबई अवळचे देश आणि मुंबई खालचीं इंग्लिस सरकारचीं ठिकाणें एथील चलनी रुपयांशीं जो प्रमाण भाव आहे तो दाखवितात·

| वेगळाल्ये जागेंतील रुपयांचे शिक्यांचीं नावें | मुंबई आणि मद्रास एथील १०० रुपयांशीं दुसर्ये जागेंतील रुपये जो भाव ठेवितात तो· | | सर्कारत्ता भावानें वेतन देतात तो भाव | |
|---|---|---|---|---|
| रुपयांचे शिके | रुपये | दशांश | रुपये | |
| मुंबई रुपये | १०० | ·००० | १००· | हे मुंबई, सुरत, खेडा, कानडा, आणि फंडा, या स्थळीं चालतात· |
| चांदवडी रुपये | १०४ | ·२५४ | १०४ | खानदेश चलनी उत्तर कोंकणांत ही चालतात· |
| चिंचवडी रुपये | १०४ | ·६९० | १०४ | पुणे चलनी सर्व दक्षिण आणि दोन ही कोंकणें एथे चालतात· |

| वेगळाल्ये आगेंतील रुपयांचे शिक्यांचीं नावें· | मुंबई आणि मद्रास एथील १०० रुपयांशीं दुसर्ये आगेंतील रुपये जो भाव ठेवितात तो· | | सर्कारजाभावानें येतनदेतात तो भाव· | |
|---|---|---|---|---|
| रुपयांचे शिके | रुपये | दशांश | रुपये | |
| भडोची रुपये | १०६ | ·९२० | १०६ | भडोचचलनी सुरत आणि खेडा इत्यादि स्थळीं चालतात· |
| बडोदी अथवा बाबाशाई | १०९ | ·८२६ | १०९ | बडोदा खेडा इत्यादि स्थळीं चालतात· |
| बडोदी अथवा सयाशाई | १११ | ·१०१ | १११ | बडोदा खेडा इत्यादि स्थळीं चालतात· |
| खंबायती | ११२ | ·२६५ | ११२ | खंबायतचे नबाबाचे मुलकांत चालतात· |
| अहमदाबादी | १०७ | ·३९६ | १०७ | अहमदाबादेंत चालतात· |
| देसलशाई कछाचा कोरी इसवी सेन १८१९ त पाडल्या· | ३७९ | ·८३३ | ३७९ | कछमुलुकचलनी· |

| वेगळाल्या जागेंतील रुपयांचे शिक्यांचीं नावें. | मुंबई आणि मद्रास एथील १०० रुपयांशीं दुसर्थे जागेंतील रुपये जो भाव ठेवितात तो. | | सर्कार जाभाचानें वेतन देतात तो भाव. | |
|---|---|---|---|---|
| रुपयांचे शिके | रुपये | दशांश | रुपये | |
| कितूर शापुरी | १०९ | .९४५ | १०९ | बेटीखेडा, बेलगांव आणि पादशाहपूर एथे चालतात. |
| गोविंदबख्शी अथवा औरंगाबादी | १२३ | .५९२ | १२३ | औरंगाबादेंत पाडिले. |
| उज्जयिनी रुपये | १०० | .९२१ | १०० | उज्जयिनींत पाडिले तेथील चलनी. |
| इंदूरी | १०१ | .८७५ | १०१ | इंदुरांत पाडिले तेथील चलनी. |
| इराणी नवे रुपये | १२३ | .५७० | १२३ | इराण देश चलनी. |

सोन्याचे

| सोन्याचे शिके, स्पेनिश आणि जर्मन दाल्लार· | यांचे १०० चे मुंबई रुपयांशिं भाव प्रमाण· | | वेतनांत यांचे १०० किति मुंबई रुपयांस देतात· | |
|---|---|---|---|---|
| | रुपये | दशांश | रुपये | |
| स्पेनिश दाल्लार | २२४ | ·७९२ | २२४ | व्यापारांत सर्व देशीं चालतात· |
| जर्मन क्रौन् | २१७ | ·४०६ | २१७ | |
| विनीश्यंन सिक्किन ह्मणजे पुतळी· | ४७८ | ·२०० | ४७८ | |
| गबर ह्मणजे वलंदेजी दकट· | ४७५ | ·६१८ | ४७५ | |
| धारवाडी होन | ३४५ ·८०७ पासून ३५३ ·८९३ पर्यंत | | ३५० | धारवाड जिल्यांत चालतात· |

मुंबई

## मुंबई आणि अंग्लेजस्थान एथील पैक्याचें परस्पर प्रमाण·

| | ग्रेन शुद्धसोनें* | ग्रेन हीण | वजन | | शिल्लिंग | पेंन्स* |
|---|---|---|---|---|---|---|
| सोन्याची मोहोर, | १६४·७४ | १४·२६ | १७९ | = | २९ | १·७८ |
| | रुपें | | | | | |
| रुप्याचा रुपया, | १६४·७४ | १४·२६ | १७९ | = | १ | ११ |

## इंग्रजी चालीचें आयवेटचें कोष्टक·

२४ ग्रेन ह्मणजे १ पेनिवेट
२० पेनिवेट = १ औंस
१२ औंस = १ पौंड

| ग्रेन | | पेनिवेट | | औंस | | पौंड |
|---|---|---|---|---|---|---|
| २४ | = | १ | | | | |
| ४८० | = | २० | = | १ | | |
| ५७६० | = | २४० | = | १२ | = | १ |

या वजनानें सोनें रुपें आणि जवाहीर ही तोलितात·

---

* शुद्ध सोनें ह्मणजे ज्यांत दुसऱ्या धातूची भेळ नाहीं, तें अशा भावाचें शुद्ध आहे कीं कितीवेळ अग्नीवर वितळलेलेंच ठेविलें तरीही उणें होत नाहीं. परंतु रुप्यामध्यें सोन्यासारिखी शुद्धी नाहीं याजकरितां याचानें त्याचे सारिखा अग्नि साहावत नाहीं, तथापि शुद्ध रुपें वितळलेलेंच काहींवेळ अग्नीवर ठेविलें तर अल्प न्यून होतें; आणि तांबें, कथिल, शिसें इत्यादि धातू अग्नीवर ठेविल्यास जळून जळून राख होउन जातात·

परम शुद्ध भावाचें सोनें अथवा रुपें हें परम मृदु शिशासारिखें आहे तस्मात् शिका अथवा अळंकार इत्यादि व्यवहारांत मृदु उपयोगी नाहीं याजकरितां त्यांत काठिण्य यावयासाठीं अनेक देशीं भिन्न भिन्न प्रमाणानें तांबें अथवा पितळ इत्यादिक त्यांत मिळवितात·

मुंबई

मुंबईतील सोनें रुपें तोलाचे कोष्टक

| | | | | ग्रेन |
|---|---|---|---|---|
| | | १ वाल | = | ४·४७५ |
| ४० वाल | = | १ तोळा | = | १७९ |

महाराष्ट्र चालीचे कोष्टक.

| | | | गुं | | मा· | | तो· | शे· |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ८ गुंजा | ह्मणजे | १ मासा | ८ | = | १ | | | |
| १२ मासे | = | १ तोळा | ९६ | = | १२ | = | १ | |
| २४ तोळे | = | १ शेर | २३०४ | = | २८८ | = | २४ | १ |

दक्षिण देशीं या वजनानें सोनें रुपें इत्यादि तोलितात.

मुंबईतील मोतीं तोलाचे कोष्टक.

| | | | | ग्रेन |
|---|---|---|---|---|
| | | १ टका | = | ०·२१८ |
| १३ $\frac{३}{४}$ टके | = | १ रति | = | ३ |
| २४ रति | = | १ टांक | = | ७२ |

इंग्रेजी

## इंग्रेजी वैद्यांचे तोल कोष्टक·

| | | | |
|---|---|---|---|
| २० ग्रेन | ह्मणजे | १ स्क्रूप्ल | ℈ |
| ३ स्क्रूप्ल | = | १ ड्रांम | ʒ |
| २ ड्रांम | = | १ औंस | ℥ |
| १२ औंस | = | १ पौंड | ℔ |

| ग्रे· | | स्क्रू· | | ड्रां· | | औं· | | पौं |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २० | = | १ | | | | | | |
| ६० | = | ३ | = | १ | | | | |
| ४८० | = | २४ | = | ८ | = | १ | | |
| ५७६० | = | २८८ | = | ९६ | = | १२ | = | १ |

हें तोल आणि आयतोल हीं थोडये अंतरानें बरोबर आहेत वैद्य लोक औषधें एकत्र मिळवून रोग्यास देणें तें काम या तोलानें करितात, परंतु गांधीकडोन सामान विकत घेणें किंवा कांहीं त्यास देणें हीं कामें अवार्डु पाइसवेट तोलानें करितात·

महाराष्ट्र

## महाराष्ट्र देशी तोलाचे कोष्टक.

| | | |
|---|---|---|
| ८ गुंजा | म्हणजे | १ मासा |
| १२ मासे | = | १ तोळा |
| २८ तोळे | = | १ शेर |
| ४० शेर | = | १ मण |
| २० मण | = | १ खंडी |

| गुं. | | मा. | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ८ म्ह. | | १ | | तो. | | | | | | |
| ९६ | = | १२ | = | १ | | शे. | | | | |
| २६८८ | = | ३३६ | = | २८ | = | १ | = | म. | | |
| १०७५२० | = | १३४४० | = | ११२० | = | ४० | = | १ | | खं. |
| २१५०४०० | = | २६८८०० | = | २२४०० | = | ८०० | = | २० | = | १ |

वरचे कोष्टक सोनें आणि रुपें खेरीज करून बहुतेक पदार्थांचे वजनांत येतात.

अवार्डुपाइस

## अवार्डुपाइस वेटचे कोष्टक·

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १६ ड्रांम ह्मणजे १ औंस | ड्रां· | औं· | | | |
| १६ औंस = १ पौंड | १६ = | १ | पौं· | | |
| २८ पौंड = १ काटर | २५६ = | १६ = | १ | का· | |
| ४ काटर = १ हंड्रेडवेट | ७१६८ = | ४४८ = | २८ = | १ | हं· |
| २० हंड्रेडवेट = १ टांन | २८६७२ = | १७९२ = | ११२ = | ४ = | १ टां· |
| | ५७३४४० = | ३५८४० = | २२४० = | ८० = | २० = १ |

या वजनानें जाड जातीचे सर्व पदार्थ तोलितात, जसें धान्य, लोणी, साकर आणि सर्व धातू, शिवाय सोनें रुपें·

टीप· १ पौंड अवार्डुपाइस = ७००० ग्रेन ग्राय·

## व्यांपारांतील वजन·

| | पौं· | औं· | ड्रां· |
|---|---|---|---|
| १ टांक = | ० | ० | २·४८८ |
| ७२ टांक = १ शेर = | ० | ११ | ३·२ |
| ४० शेर = १ मण = | २८ | ० | ० |
| २० मण = १ खंडी = | ५६० | ० | ० |

| टां· | शे· | | |
|---|---|---|---|
| ७२ = | १ | म· | |
| २८८० = | ४० = | १ | खं· |
| ५७६०० = | ८०० = | २० = | १ |

या वजनानें सर्व भारी माल तोलितात शिवाय मीठ क्वचित् मण आणि

स्करती

करती मण यांचे भाव ४० शेरांपासून ४४ शेरपर्यंत होतात. आणि करती खंडी क्वचित् २०, २१, आणि २२ मणही होत्ये.

## भूमी लांब मोजणीचे कोष्टक.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | यव | ह्मणजे | १ | अंगुळ |
| २४ | अंगुळें | = | १ | हात |
| ४ | हात | = | १ | दंड |
| २००० | दंड | = | १ | क्रोश. कोस |
| २ | कोस | = | १ | गव्यूति |
| २ | गव्यूति | = | १ | योजन |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| य. | अं. | | | | | |
| ८ = | १ | हा. | | | | |
| १९२ = | २४ = | १ | दं. | | | |
| ७६८ = | ९६ = | ४ = | १ | को. | | |
| १५३६००० = | १९२००० = | ८००० = | २००० = | १ | ग. | |
| ३०७२००० = | ३८४००० = | १६००० = | ४००० = | २ = | १ | यो. |
| ६१४४००० = | ७६८००० = | ३२००० = | ८००० = | ४ = | २ = | १ |

भूमि

## भूमि लांब मोजणीचे विलायती मान कोष्टक.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | यव | ह्मणजे | १ | इंच |
| १२ | इंच | = | १ | फुट |
| ३ | फुट | = | १ | यार्ड |
| ५½ | यार्ड | = | १ | पोल = काठी |
| ४० | पोल | = | १ | फरलांग |
| ८ | फरलांग | = | १ | मैल |

| इं. | फु. | | | |
|---|---|---|---|---|
| १२ = | १ | या. | | |
| ३६ = | ३ = | १ | पो. | |
| १९८ = | १६½ = | ५½ = | १ | फ. |
| ७९२० = | ६६० = | २२० = | ४० = | १ मै. |
| ६३३६० = | ५२८० = | १७६० = | ३२० = | ८ = १ |

## वस्त्रें व काष्ठ मोजणीचे कोष्टक.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | अंगुळें | = | १ | तसु |
| १२ | तसु | = | १ | हात |
| २ | हात | = | १ | गज |

| अं. | त. | | |
|---|---|---|---|
| २ = | १ | हा. | |
| २४ = | १२ = | १ | ग. |
| ४८ = | २४ = | २ = | १ |

विषमपद साकर आहे, आणि उत्तर त्याच पदाचे जातीचें येईल.

आणखी ही पाहावें कीं, एक जातीचीं दोन पदें उभ्ये एक ओळी- त येत नाहींत; आणि सर्व पदें समीकरण रीतीनें लिहिली आहेत. याज- वरून स्पष्ट दिसतें कीं काम करित्येसमयीं जीं पदें परस्पर बरोबर आहेत. तीं रद्द होतात. आणि याजकरितां भागाकार अथवा इछाफळ जें येतें तें विषम पदाशीं समजाति असतें.

दुसरें. मुंबईत कापूस ४ रुपयांनीं मण आहे आणि नानावटी भाव १ रुपयाचे १ शिलिंग ८ पेन्स येतात तेव्हां १ पौंड कापुसाची लंडनां- त काय किंमत होईल.

१ पौंड कापूस
४० पौंड = १ मण
१ मण = ४ रुपये
१ रुपया = २० पेन्स

याजकरितां $\frac{२० \times ४}{४०}$ = २ पेन्स हें उत्तर.

## सांकळरीतीचा ताळा.

यारीतीचा ताळा तपशिलाचे व्युत्क्रमानें होतो. म्हणजे उत्तर इछोत्पादक पदाचेस्थानीं लिहावें आणि शेवटील उपायसर प्रथम अ- ग्रसराचेस्थानीं.

असें

जसें

४० शेर साकर

२० शेर साकर — ६ शेर कावा

४ शेर कावा — ३ शेर चाहा

याजकरितां $\frac{४० \times ६ \times ३}{२० \times ४}$ = ९ शेर चाहा हें उत्तर·

अग्रसर आणि उपाग्रसर समान अंक आले असतां समीकरण रीतीनें रद करतां येतील तसें दृढ भाजकानें संक्षेपही करतां येईल·

ही सांकळरीति भांजणी आणि सरळ त्रिराशि यांजवर लागत्ये·

तिसरें· ३५३ खंडी च्यणे किती शेर होतात·

३५३ खंडी ; — इछोत्पादकपद

१ खंडी = २० मण

१ मण = १२ पायली

१ पायली = ४ शेर विषमपद

याजकरितां $\frac{३५३ \times २० \times १२ \times ४}{१ \times १ \times १}$ = ३३८८८० शेर हें उत्तर·

३३८८८० शेरांचा किती खंडी होतात हें वरसांगातल्ये व्युत्क्रमरीतीनें समजोंत येतें·

चौथें· ७ यार्ड मसरूस किती रुपये पडतील जर ३ यार्ड मसरूस ४५ रुपये पडतात·

७ यार्ड

७ यार्ड; – इच्छोत्पादकपद·

३ यार्ड = ४५ रुपये – विषमपद

तेव्हां $\frac{७ \times ४५}{३}$ = १०५ रुपये हें उत्तर*

---

* या साकळरीतीस आधार कायतो वरच्ये उदाहरणापासून कळतो, आणि तोही बीजगणिताचे समीकरणें करून दाखविला आहे·

असें· शेवटील उदाहरणांत इच्छिलेरुपये अव्यक्त ते दाखवायास क्ष पे·

तेव्हां क्ष = ७ यार्डांची किंमत·

आणि ३ यार्ड = ४५ रुपये·

याजकरितां ३ क्ष = ७ × ४५ = ३१५

क्ष = $\frac{३१५}{३}$ = १०५ रुपये·

अथवा

| | या· | | रु· | | या· | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| तसे | ३ | : | ४५ | :: | ७ | : | क्ष |

याजकरितां ३ क्ष = ३१५ आणि क्ष = १०५ रुपये·

सांकळरीतीचा आधार आणि ताळा दाखवायास पुढें रीती सांगतो ती वरसांगीतल्ये रीतीपेक्षां उत्तम आहे·

नलल्ये जातीचे माल दाखवायास अ, ब, क, ड इत्यादि अक्षरें असावीं, आणि त्याचा संख्या दाखवायास म· न, प, फ इत्यादि अक्षरें असावीं, आणि त्यांचा किमती पुढें सांगतो याप्रमाणें·

| अग्रसर | | अपायसर |
|---|---|---|
| म अ | = | न ब |
| प ब | = | फ क |
| र क | = | स ड |
| ट ड | = | व ई |

इच्छिलें आहेकीं शेवटील जातीचा पदार्थ प्रथम जातीचे पदार्थाचे कशाबरोबर आहे· तर ज्ञ वेळा शेवटील पदार्थ ई = य वेळा प्रथम पदार्थ अ असावा; ह्मणजे, ज्ञ ई = य अ,

आतां या सर्व समीकरणाचा बाजू परस्पर गुणाव्या· ह्मणजे याप्रमाणें रूप होईल·

म अ × प ब × र क × ट ड × ज्ञ ई = न ब × फ क × स ड × व ई × य अ,

अथवा

मपरटज्ञ = नफसवय

याजकरितां शेवटील पदार्थ किती प्रथमाच्ये बरोबर हे कळावें तर ज्ञ = $\frac{\text{नफसवय}}{\text{मपरट}}$

आणि प्रथमपदार्थ किती शेवटिलाचे बरोबर हें कळावें तर य = $\frac{\text{मपरटज्ञ}}{\text{नफसव}}$ ,

यापासून

यापासून पुढें सांगतो ही सामान्यरीति उत्पन्न होत्ये, जी पूर्व प्रमाणें-च आहे,

## सामान्यरीति

सर्वपदें उभ्ये दोन ओळींत ठेव, अशीकीं एक जातीचीं दोनपदें एक ओळींत नयेतील· विषमपद आणि इच्छोत्पादकपद हीं जाओळींत आहेत त्याओळीचीं सर्वपदें परस्पर गुणोन तोगुणाकार दुसर्ये ओळींतील सर्व पदांचे गुणाकारानें भाग, भागाकार येईलतो जाजातीचेंपद एकवेळ आलें आहे त्या जातीचें इच्छाफळ होईल·

सांकळरीतीनें वेगळाल्ये स्थळींचीं वजनें आणि मापें यांनें परस्पर काय प्रमाण आहे तेंही कळतें·

पांचवें, जर इंग्रेजी ३८ पौंड = १ सुरतीमण आणि पुण्याचा १ मण = ७८ इंग्रेजी पौंड असतीलतर पुणें आणि सुरत एथील मण परस्पर कायप्रमाण ठेवितात·

१ सुरतीमण

१ सुरतीमण = ३८ इंग्रेजी पौंड

७८ पौंडइंग्रेजी = १ पुण्याचामण

याजकरितां $\frac{१ \times ३८ \times १}{१ \times ७८} = \frac{३८}{७८}$ तेव्हां ३८ मण पुण्याचे = ७८ मण सुरती·

अथवा

अथवा याप्रमाणें

स = सुरत, अ = इंग्रेज, आणि प = पुणें, तर प्रश्नाचे संकेता प्रमाणें ·

१ स = ३८ अ

१ प = ७८ अ

तेव्हां अ = $\frac{प}{७८}$

आणि अ = $\frac{स}{३८}$

$\frac{प}{७८}$ = $\frac{स}{३८}$

म्हणजे ३८ प = ७८ स,

हीसांकळरीती नानावटीचे कामावर लागल्ये ·

साहावें, १०००० रुपये अमदाबादेंतून कलकत्यास पाठवाया-चे आहेत आणि परभारें हुंडीच्याभाव ११५ अमदाबादी रुपयांस कलक-त्याचे १०० रुपये येतात आणि रुपये पाठविणारा मुंबई आणि पुणें यामा-र्गानें पाठवायास इछितो तेव्हां या दोन मार्गांत पाठविणारास नफा कशांत आहे जर खालीं लिहिलो याप्रमाणें हुंडी भाव असेल ·

१०९ अमदाबादी = १०० मुंबईचलनी

१०० मुंबईचलनी = १०४ पुणेचलनी

११० पुणेचलनी = १०० कलकत्ती

याजकरितां

याजकरितां

१०००० अमदाबादी – इंछोत्पादक पद.

१०९ अमदाबादी = १०० मुंबईचलनी.

१०० मुंबईचलनी = १०४ पुणेंचलनी.

११० पुणेंचलनी = १०० कलकत्ती.

तेव्हां $\frac{१००००\times१०४\times१००}{१०९\times११०}$ = रु. ८६७३ . . पा. ३ . . पैं. ५७

या उदाहरणापासून कळतें कीं परभारे पाठवावे त्यापेक्षां मुंबई पुणे इकडून पाठविले असतां पाठविणारास लाभ आहे. आणि हुंडी देणारास तोटा आहे. तसें परभारे पाठविले असतां पाठविणारास तोटा आहे आणि हुंडी देणारास लाभ आहे.

---

## व्यवहारी अपूर्णांक.

कोणताही अवयवी किंवा संख्या पूर्ण अथवा अखंड आणून, त्याचे कितीहि खंड केले तर त्या खंडांचा सूचकास अपूर्ण ह्मणतात; जसें, जर मूळ अवयवीचे आठ भाग केले तर, त्या भागांतून ३, ५, ७, इत्यादि भाग घेतात त्यांस अपूर्ण ह्मणतात; आणि त्यांची लिहिण्याची रीति याप्रमाणें आहे, $\frac{३}{८}$, $\frac{५}{८}$, $\frac{७}{८}$, इत्यादि. रेघेचा खालचा आंगास जी संख्या आहे तीस छेद ह्मणतात, कांकिं मूळ अवयवी किती भागांनीं छेदिला आहे तें ती दाखवित्ये; आणि रेघेचा वरचा आंगास जी संख्या आहे तीस अंश ह्मणतात, कांकिं मूळ अवयवीचा अपूर्णपणा दाखवायासाठीं त्या केलेल्ये छेदांतून किती भाग घेतले आहेत हें ती दाखवित्ये. या रूपाची संख्येस दशांश अपूर्णांकांचा भेद दाखवायासाठीं व्यवहारी अपूर्णांक असें नांव ठेविलें आहे.

व्यवहारी अपूर्णांकांत कांहीं भेद आहेत; जसें, सम, विषम, भागजाति, प्रभागजाति, भागानुबंधपूर्णांक, इत्यादि.

सम अपूर्णांक तोच होय, जांत अंश छेदांहून उणे आहेत; जसें, $\frac{१}{२}$, अथवा $\frac{३}{४}$, अथवा $\frac{२}{३}$.

विषम अपूर्णांक तोच होय, जांत अंश छेदांचा बराबर किंवा अधिक आहेत; जसें, $\frac{३}{३}$, अथवा $\frac{५}{४}$ अथवा $\frac{७}{५}$. या प्रकारास विषम असें नांव ठेवायाचें कारण हेंच आहे किं असा अपूर्णांक एकंचे बराबर किंवा एकापेक्षां अधिक आहे.

आहे.

भागजाति अपूर्णांक तोच होय, जांत एके सगळ्ये वस्तूचा तुकडा केवळ अपूर्णांकच आहे; जसें, $\frac{२}{३}$, अथवा $\frac{३}{४}$.

प्रभागजाति अपूर्णांक तोच होय, जांत अपूर्णांकाचा अपूर्णांक, अथवा कित्येक अपूर्णांकामध्यें चा लिहून जे जोडले असतात; जसें, $\frac{३}{५}$ चा $\frac{२}{३}$ अथवा ३ चे $\frac{६}{७}$ चे $\frac{२}{३}$.

भागानुबंध पूर्णांक तोच होय, जांत पूर्णांक लिहून त्यापुढें जवळच अपूर्णांक लिहिला आहे; जसें, $३\frac{१}{२}$ अथवा $१५\frac{३}{४}$ अथवा $२१\frac{५}{७}$.

मिश्र अपूर्णांक तोच आहे; ज्याचे अंश आणि छेद दोनही सम, विषम, अथवा भागानुबंध आहेत; जसें $\frac{\frac{२}{३}}{५}$, अथवा $\frac{३}{\frac{५}{७}}$, अथवा $\frac{\frac{३}{४}}{\frac{५}{६}}$, अथवा $\frac{३\frac{१}{२}}{४}$, इत्यादि. हे सर्व मिश्र अपूर्णांक आहेत.

कोणत्याही पूर्णांकास छेदस्थळीं एक लिहिल्यानें अपूर्णांकाचें रूप होतें; जसें, जर ७ या पूर्णांकास अपूर्णांकाचें रूप द्यायाचें आहे तर त्याची लिहिण्याची रीति $\frac{७}{१}$ अशी आहे; तसें $\frac{५}{१}$ इत्यादि.

कोणताही अपूर्णांक भागाकार दाखवितो; ह्मणोन अंश छेदानीं भागून जो भागाकार उत्पन्न होतो त्याचे बराबर त्या अपूर्णांकाचा भाव आहे, जसें $\frac{२१}{३}$ या अपूर्णांकाचा भाव ७ याचे बराबर आहे, आणि $\frac{३०}{७}$ याचा भाव $४\frac{२}{७}$ याचे बराबर आहे.

---

व्यवहारी

## व्यवहारी अपूर्णांकांचा रूपभेद.

व्यवहारी अपूर्णांकांचा रूपभेद म्हणजे त्यास एका रूपांतून किंवा नावांतून दुसऱ्या रूपांत किंवा नावांत आणण्याचा प्रकार आहे; आणि व्यवहारी अपूर्णांकांची मेळवणी, वजाबाकी, इत्यादि करायासाठीं आगोदर त्यांस हा प्रकार केला पाहिजे; असा रूपभेद द्यावयाचे कितिएक प्रकार आहेत.

### कृत्य.

### दोन किंवा अधिक संख्यांचा दृढभाज काढायाचें.

दोन किंवा अधिक संख्यांचा दृढभाजक तीच संख्या आहे, जी त्या संख्यांस निःशेष भागित्ये; जसें १८ आणि २४ या दोन संख्या २, ३, ६, यांणीं निःशेष भागिल्या जातात, परंतु यांत मोठी संख्या ६ तीस दृढभाजक म्हणतात.

### रीति.

जर दोन संख्या मात्र असतील, तर त्यांत जी मोठी संख्या असेल ती लाहान संख्येनें भागावी; नंतर, बाकी राहील तो नवा भाजक करून त्याणें पूर्व भाजक भागावा; याप्रमाणें शेवटील बाकीनें तत्पूर्वभाजक पुनः पुनः भागितां जा भाजकानें शेवटील भाज्य निःशेष होईल तो इछिल्ये संख्यांचा दृढभाजक होय.

जेव्हां संख्या दोहोंपेक्षां अधिक असतील, तेव्हां त्यांतून भलत्ये दोहोंचा पूर्वीं सांगीतल्याप्रमाणें दृढभाजक काढ, नंतर, हा दृढभाजक आणि राहिलेली संख्या यांचा दृढभाज काढ; या रीतीनें जितक्यां संख्या राहिल्या

असतील

असतील त्यांचा दृढभाजक काढावा; ह्मणजे शेवटील दृढभाजक जो उत्पन्न होतो तो सर्व सांगीतल्या संख्यांचा दृढभाजक आहे.

जर असें होतें, कीं अशा रीतीनें दृढभाजक १ मात्र निघतो; तर अशा संख्यांस अदृढभाजक ह्मणतात, ह्मणजे त्यांस दृढभाजक नाहीं, अथवा असें ह्मणतात कि त्या संख्या परस्पर अविभाज्य※ आहेत.

उदाहरणें.

---

※ अविभाज्य संख्या त्या आहेत, जांस एका वांचून दुसरा भाजक निःशेष भागीत नाही असें, २, ३, ५, ७, ११, १३, १७, इत्यादि. या संख्यांचा शोध पूर्वकालापासून चालत आहे; आणि अशी संख्या आणायासाठीं एक चांगली रीति आजचा दिवशीं अपेक्षित आहे.

ईरातास्थेनीस या नामें एक मोठा ज्योतिषी मिश्रदेशांत होता; त्याणें या अपेक्षितासाठीं एक युक्ति काढिली, जीस त्याणें चालनी असें नांव ठेविलें, कांकि त्या युक्तीनें अविभाज्य संख्या इतर संख्यांहून निराळ्या करितां येतात. आणि अशा रीतीस विषम ह्मणतात, कांकि फार मोठया विस्तारावांचून थोंडक्यांत सरळ रीतीनें कोणतीही संख्या आरंभ आहे किं नाहीं हें समजात येत नाहीं; अशी विस्तार रीति आजपर्यंत चालली आहे तीही आहे.

एकापासून कोणत्येही इछिल्ये संख्येपावेतों सर्व विषम संख्या अनुक्रमानें लिहि; जसें,

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ३ | ५ | ७ | ९ | ११ | १३ | १५ | १७ | १९ |
| २१ | २३ | २५ | २७ | २९ | ३१ | ३३ | ३५ | ३७ | ३९ |
| ४१ | ४३ | ४५ | ४७ | ४९ | ५१ | ५३ | ५५ | ५७ | ५९ |
| ६१ | ६३ | ६५ | ६७ | ६९ | ७१ | ७३ | ७५ | ७७ | ७९ |
| ८१ | ८३ | ८५ | ८७ | ८९ | ९१ | ९३ | ९५ | ९७ | ९९ |

आतां प्रथमच्या अविभाज्य संख्येपासून आरंभ कर, आणि तीपासून तिसऱ्या

तिसऱ्या

## उदाहरणें.

प्रथम, १९०८, १३६, आणि ६३० यांचा दृढभाजक काढ.

```
१३६) १९०८(२ ह्मणजे १९०८ आणि १३६ यांचा दृढभाजक ३६ आहे.
     १८७२
     ----
       ३६) १३६ (२६ नंतर ३६) ६३०(१७
            ७२               ३६
           ----             ----
           २१६              २७०
           २१६              २५२
           ----             ----
            ...          १८) ३६(२
                             ३६
                            ----
                             .
```

याजकरितां सांगीतल्या संख्यांचा दृढभाजक १८ आहे.

दुसरें,

---

तिसऱ्या संख्येवर एक एक बिंदु कर, कांकिं ती ती संख्या तिहींनीं निःशेष भागिली जात्ये, जसें, ९, १५, २१, इत्यादि.

नंतर पांचांपासून पांचव्ये पांचव्ये स्थळीं बिंदु कर, कांकिं ती ती संख्या पांचांनी निःशेष भागिली जात्ये, असें, १५, २५, ३५, इत्यादि.

पुनः सातांपासून सातव्ये सातव्ये संख्येवर बिंदु कर, कांकिं ती ती संख्या सातांनीं निःशेष भागिली जात्ये, जसें, २१, ३५, ४९, इत्यादि.

असें केलें असतां सर्व संख्या जा बिंदूवांचून आहेत त्या अविभाज्य संख्या जाणाव्या; ह्मणोन ७ आणि √१०० या दोहों संख्यांचा मध्यें कोणतीही अविभाज्य संख्या नाहीं; कांकिं जर कोणतीही संख्या कोणत्येही अविभाज्य संख्येनें निःशेष भागिली जात नाहीं, परंतु ती अविभाज्य संख्या अशी असावी किं सांगीतल्या संख्येचे वर्गमूळापेक्षां उणी; तर असें जाणावें किं सांगीतली संख्या स्वतः अविभाज्य संख्या होय; सर्व सम संख्यांमध्यें २ ही समसंख्या मात्र अविभाज्य संख्या आहे, ह्मणोन दोहोंपासून १०० पर्यंत पुढें सांगतो या संख्या अविभाज्य संख्या आहेत; २, ३, ५, ७,

११,

दुसरें, २४६, आणि ३७२ यांचा दृढभाजक काय.

उत्तर ६

तिसरें, ३२४, ६१२ आणि १०३२ यांचा दृढभाजक काय.

उत्तर १२

## प्रथम प्रकार.

### अपूर्णांकांचा अति संक्षेप करायाचा.

* सांगीतल्या अपूर्णांकांचा पदांस कोणत्येही संख्येनें भाग, किं जिणें निःशेष होईल; नंतर जे भागाकार येतील त्यांस तशा रीतीनें दुसर्ये संख्येनें भाग; असें

पुढें

---

११, १३, १७, १९, २३, २९, ३१, ३७, ४१, ४३, ४७, ५३, ५९, ६१, ६७, ७१, ७३, ७९, ८३, ८९, ९७.

या चालनीवांचून दुसरी थोडक्यांत कोणतीही रीति नाहीं, किं जिणेंकरून अविभाज्य संख्या समजांत येईल; ह्मणजे आजपावेतों ज्योतिषामध्यें अशी रीति सांपडली नाहीं.

---

* स्पष्ट आहे किं जर सांगीतल्या अपूर्णांकांचे पदांस भलत्या एकाच अंकानें भागिलें तर दुसरा अपूर्णांक उत्पन्न होईल त्याचा भाव सांगीतल्या अपूर्णांकाबराबर होईल. आणि अशारीतीनें जों चालेल तों पुनः पुनः भागाकार केला आहे, अथवा जेव्हां भाजक अनिदृढ आहे तेव्हांही, स्पष्ट आहे किं नवीं अपूर्णांकांचीं पदें जीं उत्पन्न होतात त्यांपेक्षां संक्षेप व्हायास अशक्य.

पाहा. १. कोणत्याही संख्येचा शेवटीं जर समअंक अथवा पूज्य असेल, तर ती सर्व संख्या २ होनीं भागिली जाईल.

पुढेंही करजोंपर्यंत एकावांचून दुसऱ्या कोणत्येही संख्येनें भागितां न येईल, ह्मणजे ते शेवटील भागाकार सांगीतल्या अपूर्णांक पदांचा संक्षेप झाला.

---

२, कोणत्याही संख्या ज्यांचा शेवटीं ५ किंवा ० आहे त्या सर्व पांचानीं भागिल्या जातील.

३, जर कोणत्याही संख्यांचा उजव्येकडे शेवटीं ० आहे तर त्या सर्व संख्या १० नीं भागिल्या जातील; जर दोन शून्यें असतील तर त्या सर्व संख्या १०० नीं भागिल्या जातील; जर तीन शून्यें असतील तर १००० नीं भागिल्या जातील, आणि असें पुढेंही, ह्मणजे असा भागाकार करायासाठीं शून्यें मात्र कापिलीं पाहिजेत.

४, जर कोणत्येही संख्येचे शेवटील दोन अंक चोहोंनीं भागिले जातील तर ती सर्व संख्या चोहोंनीं भागिली जाईल. आणि शेवटील ३ अंक जर आठांनी भागिले जातील तर ती सर्व संख्या आठांनीं भागिली जाईल. असें पुढेंही.

५, जर कोणत्येही संख्येचे सर्व अंकांची बेरीज तिहींनीं किंवा नवांनीं भागिली जाईल तर ती सर्व संख्या तिहींनीं किंवा नवांनी भागिली जाईल.

६, जर उजव्ये शेवटींचा अंक सम आहे, आणि सर्व अंकांची बेरीज ६ नीं भागिली जाईल तर ती सर्व संख्या साहांनीं भागिली जाईल.

७, जर कोणत्याही संख्येचे विषमस्थळींचे अंकांची बेरीज समस्थळींचे अंकांचे बेरिजेबरोबर आहे,तर, ती सर्व संख्या ११ नीं भागिली जाईल.

८, जर कोणतीही संख्या आपल्या वर्गमूळाहून उण्या संख्येनें निःशेष भागिली जातनाहीं तर ती अविभाज्य संख्या जाणावी, ती एकावांचून कोणत्याही अंकानें भागायास अशक्य.

९, दोन आणि पांच या शिवाय सर्व अविभाज्य संख्यांचे एकंचे स्थळीं हे अंक असतात, १, ३, ७, किंवा ९; आणि या शिवाय दुसऱ्या सर्व संख्या (कंपुसेट) आहेत ह्मणोन भागिल्या जातील.

१०, जेह्वां कोणत्याही संख्या धन किंवा ऋण चिन्हांनीं जोडिल्या असून, त्यांस कोणत्येही

अथवा सांगीतल्या अपूर्णांकांचे पदांस त्यांचा दृढभाजकानें एकदांच भाग, मग अशा रीतीनें जे भागाकार येतील तीं इछिल्ये अपूर्णांकांची पदें सांगीतल्ये अपूर्णांकाचा पदां बराबर आहेत.

## उदाहरणें.

प्रथम, $\frac{२१६}{२८८}$ यांस अति संक्षेप रूप दे.

$\frac{२१६}{२८८} = \frac{७२}{९६} = \frac{३६}{४८} = \frac{१२}{१६} = \frac{६}{८} = \frac{३}{४}$ हें उत्तर.

अथवा याप्रमाणें

२१६)२८८(१ याकरितां दृढभाजक ७२ आहे.
    २१६
    ७२)२१६(३ आणि ७२) $\frac{२१६}{२८८} = \frac{३}{४}$ हें उत्तर. वरचे सारिखें.
        २१६
        ...

दुसरें, $\frac{१९५}{७८०}$ यांस अति संक्षेप रूप दे.

उत्तर $\frac{१}{४}$

तिसरें, $\frac{१३६}{२०४}$ यांस अति संक्षेप रूप दे.

उत्तर $\frac{२}{३}$

चवथें, $\frac{५२५}{६३०}$ यांस अति संक्षेप रूप दे.

उत्तर $\frac{५}{६}$

---

कोणत्येही दुसर्ये संख्येनें भागायाचें आहे तर त्या प्रत्येक संख्येस बेगळें बेगळें भागिलें पाहिजे; जसें $\frac{१० + ८ - ४}{२} = ५ + ४ - २ = ७$.

११ परंतु जर संख्या गुणाकाराचा चिन्हानें जोडिली आहे तर त्यांतील एकच संख्या भागावी. जसें

$$\frac{१० \times ८ \times ३}{६ \times २} = \frac{१० \times ४ \times ३}{६ \times १} = \frac{१० \times ४ \times १}{२ \times १} = \frac{१० \times २ \times १}{१ \times १} = \frac{२०}{१} = २०$$

दुसरा

## दुसरा प्रकार.

भागानुबंध पूर्णांकास बरोबर भावाचें विषम अपूर्णांकाचें रूप द्यावयाचा.

* पूर्णांकास अपूर्णांकाचे छेदानीं गुण, आणि त्या गुणाकाराशीं अंश मेळीव; नंतर ही बेरीज अपूर्णांकाचे वरल्ये आंगास अंशस्थळीं लिहि. म्हणजे इछिलें काम झालें.

### उदाहरणें.

प्रथम, $२३\frac{२}{५}$ यास बरावर भावाचें अपूर्णांकाचें रूप दे.

$२३\frac{२}{५}$ अथवा या प्रमाणें $\frac{(२३\times५)+२}{५}=\frac{११७}{५}$ हें उत्तर.

$$\begin{array}{r} ५ \\ \hline ११५ \\ २ \\ \hline ११७ \\ ५ \end{array}$$

दुसरें, $१२\frac{७}{९}$ यास बरावर भावाचें अपूर्णांकाचें रूप दे.

उत्तर $\frac{११५}{९}$

तिसरें, $१४\frac{७}{१०}$ यास बरावर भावाचें अपूर्णांकाचें रूप दे.

उत्तर $\frac{१४७}{१०}$

चवथें, $१८३\frac{५}{२१}$. यास बरावर भावाचें अपूर्णांकाचें रूप दे.

उत्तर $\frac{३८४८}{२१}$

---

* स्पष्ट दिसतें कीं वरची रीति उघडी आहे, कांकि कोणत्याही अवयवीस भलत्या संख्येनें गुणावें आणि तो गुणाकार त्याच संख्येनें भागावा हीं दोनही बराबर भावाचीं आहेत. म्हणजे भलतेही अपूर्णांक हेंच दाखवितात, किं अंशांस छेदांनीं भागावें.

तिसरा

## तिसरा प्रकार.

### विषम अपूर्णांकास बरोबर भावाचें पूर्णांकाचें अथवा भागानुबंध पूर्णांकाचें रूप द्यावयाचा.

※ अंश छेदांनी भाग, भागाकार येईल तो इछिला पूर्णांक अथवा भागानुबंध पूर्णांक होईल.

### उदाहरणें.

प्रथम, $\frac{१२}{३}$ यास बरोबर भावाचें रूप दे

आतां $\frac{१२}{३}$ अथवा $१२ \div ३ = ४$ हें उत्तर.

दुसरें, $\frac{१५}{७}$ यास बरोबर भावाचें रूप दे.

आतां $\frac{१५}{७}$. अथवा $१५ \div ७ = २\frac{१}{७}$ हें उत्तर.

तिसरें, $\frac{७४९}{१७}$ यास बराबर भावाचें रूप दे.

याप्रमाणें १७) ७४९ ( ४४ $\frac{१}{१७}$ हें उत्तर.

६८
―――
६९
६८
―――
१
―――

चवथें, $\frac{५६}{७}$ यास बराबर भावाचें रूप दे.

उत्तर ८

पांचवें, $\frac{१३६२}{२५}$ यास बराबर भावाचें रूप दे.

उत्तर ५४ $\frac{१२}{२५}$

---

※ स्पष्ट आहे कीं, ही रीति पूर्व रीतीचीच उलट आहे; आणि ईचें कारण सरळ भागाकाराचे गुणापासून प्रकट आहे.

साहावें. $\frac{२९१८}{१७}$ यास बराबर भावाचें रूप दे.

उत्तर १७१ $\frac{११}{१७}$

## चौथा प्रकार.

### पूर्णांकास बरोबर भावाचें अपूर्णांकाचें रूप द्यावयाचा. ज्याचे छेद सांगीतल्ये संख्ये बराबर होतील.

* पूर्णांकास सांगीतल्ये छेदांनीं गुण; आणि त्या गुणाकाराखालीं सांगीतले छेद लिही, ह्मणजे इछिलें अपूर्णांक रूप आलें.

### उदाहरणें.

प्रथम, ९ यास बरोबर भावाचें अपूर्णांकाचें रूप दे. ज्यास छेद ७ होतील.

आतां ९×७=६३; तेव्हां $\frac{६३}{७}$ हें उत्तर.

ह्मणजे $\frac{६३}{७}$ = ६३÷७ = ९ हा ताळा.

दुसरें, १२ यास बराबर भावाचें अपूर्णांकाचें रूप दे, ज्यास छेद १३ होतील.

उत्तर $\frac{१५६}{१३}$

तिसरें, २७ यास बराबर भावाचें अपूर्णांकाचें रूप दे. ज्यास छेद ११ होतील.

उत्तर $\frac{२९७}{११}$

---

* यांत गुणाकार आणि भागाकार हे दोनही कामांत आणिले आहेत याजकरितां उत्पन्न जालेलें फळ सांगीतल्ये अवयवीचे बरोबर भावाचें होईल.

पांचवा

## पांचवा प्रकार.

## प्रभागजाति अपूर्णांकांस बराबर भावाचें भागजाति अपूर्णांकांचें रूप द्यावयाचा.

* अंशांकरितां सर्व अंश परस्पर गुण, आणि छेदांकरितां सर्व छेद परस्पर गुण, ते नवे अंशछेद इछिलें अपूर्णांकरूप आलें.

प्रभागजाति अपूर्णांकांमध्यें जर पूर्णांक अथवा भागानुबंध पूर्णांक असेल, तर त्यास पूर्वरीतीनें अपूर्णांकांचे रूप द्यावें.

जर अपूर्णांकांतील भलतीं अंशछेदरूप दोन पदें भलत्ये एका अंकानें निःशेष भागिलीं जातील तर ते भागाकार त्यांचे स्थळीं कामांत घेतां येतील, अथवा अंशछेदरूप कोणतींही दोन पदें समान असतील तर तीं रद करितां येतील.

### उदाहरणें.

प्रथम, ३/४ चे २/३ चा १/२ यांस बराबर भावाचें भागजाति अपूर्णांकाचें रूप दे.

आतां (३×२×१)/(४×३×२) = ६/२४ = १/४ हें उत्तर.

अथवा (३×२×१)/(४×३×२) = १/४ दोन ठिकाणीं २ आणि दोन ठिकाणीं ३ रद केल्यानें.

---

* या रीतीची सत्यता याप्रमाणें दाखविली जात्ये, सांगीतले प्रभागजाति अपूर्णांक ३/४ चे २/३ असावे. आतां ३/४ चा १/३ = ३/४ ÷ ३, = ३/१२; याजकरितां ३/४ चे २/३ = ३/१२ × २ = ६/१२; ह्मणजे या अपूर्णांकाचे अंश सांगीतल्ये अपूर्णांकाचे अंशांचे गुणाकारा बरोबर आहेत. आणि याचे छेद सांगीतल्ये अपूर्णांकाचे छेदांचे गुणाकाराबरोबर आहेत. जेव्हां प्रभागजाति अपूर्णांकांत दोहोंपेक्षां अधिक रकमा आहेत, तेव्हां वरप्रमाणे दोन रकमांस भागजातिरूप देऊन त्याशीं तिसरी रकम जोडून लिहि ह्या तीन रकमांचे बरोबर भावाचा होतील, याप्रमाणें अधिक असतील तरीही.

दुसरें;

दुसरें, $\frac{१०}{११}$ चे $\frac{३}{५}$ चे $\frac{२}{३}$ यास बराबर भावाचें भागजाति अपूर्णांकांचे रूप दे.

आतां $\frac{१० \times ३ \times २}{११ \times ५ \times ३} = \frac{६०}{१६५} = \frac{४}{११}$. हें उत्तर.

अथवा $\frac{१० \times ३ \times २}{११ \times ५ \times ३} = \frac{४}{११}$ वरचे प्रमाणें दोन ठिकाणीं ३ रद करून आणि दोन स्थळीं ५ नीं भागून.

तिसरें, $\frac{५}{८}$ चे [illegible] यास बराबर भावाचें भागजाति अपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर [illegible]

चवथें, $\frac{५}{[illegible]}$ चे [illegible] चे $\frac{२}{३}$ यास बराबर भावाचें भागजाति अपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर [illegible]

पांचवें, ३ [illegible] चे $\frac{५}{[illegible]}$ चे $\frac{२}{[illegible]}$ यास बराबर भावाचे भागजाति अपूर्णांकांचें रूप दे

उत्तर [illegible]

साहावें, ४ चे ३ $\frac{१}{२}$ चे $\frac{५}{[illegible]}$ चे $\frac{३}{[illegible]}$ यास बराबर भावाचें भागजाति अपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर २ [illegible]

सातवें, $\frac{५}{६}$ चे $\frac{२}{[illegible]}$ आणि २ यास बराबर भावाचे भागजाति अपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर २ [illegible]

साहावा

## साहावा प्रकार.

### वेगळ्ये वेगळ्ये छेदांचे अपूर्णांकांस बरोबर भावाचें अपूर्णांक रूप द्यावयाचा ज्याचे छेद सम होतील.

नव्ये अंशांकरितां, प्रति अपूर्णांकाचे वेगळे वेगळे अंश त्याचे त्याचे खालचे छेदांवांचून सर्व छेदांनी गुण; आणि सम छेदांकरितां सर्व छेदांस परस्पर गुण.※

पाहा, या कामांत आणि दुसर्ये कित्येक कामांत जर सांगीतल्ये संख्यांमध्यें पूर्णांक, अथवा भागानुबंध पूर्णांक, किंवा प्रभागजाति अपूर्णांक असतील तर त्यांस आरंभीं सांगीतल्ये पूर्व रीतीं करून सरळ अपूर्णांकाचें रूप दिलें पाहिजे.

### उदाहरणें.

प्रथम, $\frac{१}{२}$, $\frac{२}{३}$, आणि $\frac{३}{४}$ यांस बरोबर भावाचें समछेद अपूर्णांक रूप दे.

१ × ३ × ४ = १२ हा $\frac{१}{२}$ चा नवा अंश आहे.

२ × २ × ४ = १६ हा $\frac{२}{३}$ चा नवा अंश आहे.

३ × २ × ३ = १८ हा $\frac{३}{४}$ चा नवा अंश आहे.

२ × ३ × ४ = २४ हा सर्वांचा सम छेद आहे.

याजकरितां सांगीतल्ये वेगळ्ये वेगळ्ये अपूर्णांकांचे बराबर भावाचे

---

※ यापासून स्पष्ट आहे कीं, अंश आणि छेद हे एकच संख्येनें गुणिल्यापासून जो नवा अपूर्णांक उत्पन्न होतो, तो पूर्व अपूर्णांकाचेच भावाचा त्याचे व याचे भावांत भेद होत नाहीं.

हे अपूर्णांक आहेत. $\frac{१२}{२४}$, $\frac{१६}{२४}$ आणि $\frac{१८}{२४}$.

अथवा हें काम मनांत गुणाकार करून वेगळाल्या रकमा एकदांच लिहितां येतील. जसें $\frac{१}{२}$, $\frac{२}{३}$, $\frac{३}{४}$ = $\frac{१२}{२४}$, $\frac{१६}{२४}$, $\frac{१८}{२४}$, अथवा संक्षेपानें = $\frac{६}{१२}$, $\frac{८}{१२}$, $\frac{९}{१२}$.

जेव्हां नवे अंश आणि समछेद यांचा दृढ किंवा साधारण भाजक असेल, तर त्या वेगळाल्ये संख्यांचे स्थळीं त्यांचे त्यांचे कर्ते लिहि. नंतर असे वेगळे वेगळे कर्ते जे अंश आणि छेद या दोन स्थळीं साधारण आहेत त्यांस त्या त्या स्थळांतून रद कर, ह्मणजे अपूर्णांकांस अतिसंक्षेपरूप आलें जापासून समछेद होतील.

दुसरें, $\frac{५}{४}$, $\frac{७}{६}$ आणि $\frac{८}{९}$ यांस बरोबर भावाचें समछेद अपूर्णांकरूप दे.

आतां या अपूर्णांकांस सांगीतले प्रमाणें समछेद करून हें रूप होतें. $\frac{५×६×९}{४×६×९}$, $\frac{४×७×९}{४×६×९}$, $\frac{४×६×८}{४×६×९}$; आतां २, आणि ३, या संख्या ४, ६, आणि ६, ९ यांचे अनुक्रमें भाजक आहेत; याजकरितां जर प्रथम आणि तिसरे या अपूर्णांकांत ६ टाकून त्यांचे कर्ते २, आणि ३ हे लिहिले आणि दुसर्ये अपूर्णांकांत ६, ४, आणि ९ यांस टाकून त्यांचे स्थळीं त्यांचे वेगळाले कर्ते २ आणि ३ हे लिहिले तर त्या अपूर्णांकांस हें रूप होईल. $\frac{२×३×९}{४×२×३×९}$, $\frac{२×२×७×३}{४×२×३×९}$, आणि $\frac{४×२×३×८}{४×२×३×९}$, एथे २, आणि ३ हे दोन कर्ते जे अंश आणि छेद यांत साधारण आहेत त्यांस रद करून अपूर्णांकांस हें रूप होतें, $\frac{५×९}{४×९}$, $\frac{२×३×७}{४×९}$, $\frac{४×८}{४×९}$, ह्मणजे = $\frac{४५}{३६}$, $\frac{४२}{३६}$ आणि $\frac{३२}{३६}$. यांतजी ३६ सम

छेद

छेद संख्या उत्पन्न जाली ती ४, ६, ८ यांचा साधारण गुणाकार आहे, अथवा या संख्यांनीं ती निःशेष भागिली जात्ये. आणि या रीतीनें कोणत्येही दुसर्‍यें सांगितल्ये संख्यांच्या लघुतम साधारण गुणाकार उत्पन्न होईल. परंतु अशा संख्या छेद असून त्यांचे अंशस्थळीं १ असावा.

परंतु लघुतम साधारण गुणाकार त्वरेनें काढायाची रीति ही आहे.

सांगीतल्या संख्या एक ओळींत लिहि, आणि जर त्यांतील दोन किंवा अधिक संख्या २ या अविभाज्य संख्येनें भागल्या जातात तर त्यांस भागून त्यांचे भागाकार त्यांचे त्यांचे खालीं दुसर्‍यें ओळींत लिहि, आणि जा भागत नाहीं त्या त्यांचे खालीं दुसर्‍यें ओळींत पुनः लिहि; —— या दुसर्‍यें ओळीस तसेंच २ नीं भाग, पुढें तिसरीस, इत्यादि. असें करितां जर २ या संख्येनें भागिल्या जात नाहीं तर ३ या अविभाज्य संख्येनें भाग, त्याणेंही सर्व भागत नाहीं तर ५, ७, इत्यादि अविभाज्य संख्यांनीं भाग. जोंपर्यंत दोन संख्या भागल्यावांचून न राहातील. नंतर ते सर्व भाजक, आणि शेवटील ओळींतील भागाकार व भागल्यावांचून राहिली संख्या, हे सर्व परस्पर गुणून जो गुणाकार होईल तो लघुतम साधारण गुणाकार होय.

उदाहरण, ७, २४, ४०, ४५, आणि ७२ यांचा लघुतम साधारण गुणाकार काढ.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २) | ७ | २४ | ४० | ४५ | ७२ |
| २) | ७ | १२ | २० | ४५ | ३६ |
| २) | ७ | ६ | १० | ४५ | १८ |
| ३) | ७ | ३ | ५ | ४५ | ९ |
| ३) | ७ | १ | ५ | १५ | ३ |
| ५) | ७ | १ | ५ | ५ | १ |
| | ७ | १ | १ | १ | १ |

तेव्हां

तेव्हां २×२×२×३×३×५×७ = २५२० हा इच्छिला लघुतम साधारण गुणाकार आहे. अथवा ७, २४, ४०, ४५ आणि ७२ या सर्व संख्यांनीं हा निःशेष भागायास शक्य आहे.

दुसरें, २७, ६६, १३५, २७५, आणि ६७५ यांचा लघुतम साधारण गुणाकार काढ.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३) | २७ | ६६ | १३५ | २७५ | ६७५ |
| ३) | ९ | २२ | ४५ | २७५ | २२५ |
| ३) | ३ | २२ | १५ | २७५ | ७५ |
| ५) | १ | २२ | ५ | २७५ | २५ |
| ५) | १ | २२ | १ | ५५ | ५ |
| ११) | १ | २२ | १ | ११ | १ |
| | १ | २ | १ | १ | १ |

तेव्हां ३×३×३×५×५×११×२ = १४८५० हा इच्छिला लघुतम साधारण गुणाकार आहे.

जेव्हां अपूर्णांक अथवा भागानुबंध पूर्णांक सांगितले आहेत, तेव्हां शेवटल्यास नियम अपूर्णांकाचें रूप दे; आणि अतिसंक्षेप समछेद काढ; नंतर अंशाचे लघुतम सांधारण गुणाकारास अशा अतिसंक्षेप समछेदांनीं भागून जो भागाकार येईल तो इच्छिला अशो अपूर्णांकांचा लघुतम साधारण गुणाकार जाला.

उदाहरण, ४$\frac{१}{६}$, ५$\frac{१}{३}$, आणि $\frac{५}{६}$ ह्मणजे $\frac{२५}{६}$, $\frac{१६}{३}$, $\frac{५}{६}$ यांचा लघुतम साधारण गुणाकार काढ.

' अपूर्णांकांस अतिसंक्षेप समछेद करून हें रूप होतें $\frac{७५}{१८}$, $\frac{९६}{१८}$, आणि $\frac{१५}{१८}$

$\frac{१५}{१८}$ आणि ७५, ९६, १६ यांचा लघुतम साधारण गुणाकार २४०० आहे, त्यास १८ याणीं भागून भागाकार १३३ $\frac{१}{३}$ हा इछिला लघुतम साधारण गुणाकार जाला.

जेह्कां सांगीतल्ये दोन अपूर्णांकांतील एकाचा छेद दुसर्याचे छेदास निःशेष भागितो, तेह्कां त्या लाहान अपूर्णांकाचीं दोनही पदें त्या भागाकारानें गुण, ह्मणजे दोनही समछेद आले.

जसें $\frac{३}{४}$ आणि $\frac{७}{८}$ यांस समछेद करायाठीं लाहान अपूर्णांक $\frac{३}{४}$ यास २ नीं ह्मणजे ८ ÷ ४ = २ याणीं गुणायाचें इतकें मात्र आहे. असें करून त्यांस हें रूप होतें, $\frac{६}{८}$ आणि $\frac{७}{८}$.

आणि $\frac{३}{८}$, $\frac{५}{१६}$, $\frac{११}{३२}$, यांस समछेद करायासाठीं $\frac{३}{८}$ यांचीं दोन पदें ४ याणीं गुणायाचीं, आणि $\frac{५}{१६}$ याचीं २ नीं इतकें मात्र आहे; ह्मणजे असें करून त्यांचें हें इछिलें रूप आलें, $\frac{१२}{३२}$, $\frac{१०}{३२}$, $\frac{११}{३२}$.

## अथवा याप्रमाणें.

सांगीतल्ये अपूर्णांकांस अतिसंक्षेप रूप देऊन, छेदांचा लघुतम साधारण गुणाकार काढ, नंतर त्या गुणाकारास वेगळाल्ये सांगीतल्ये छेदांनीं भागून. जेजे भागाकार येतील, ते त्याचे त्याचे अंशानें गुण; नंतर त्या त्या गुणाकार अंशांखालीं लघुतम साधारण गुणाकार लिहि, ह्मणजे सांगीतल्ये अपूर्णांकांस बरोबर भावाचें अतिसंक्षेपसमछेद रूप आलें.

उदाहरण, $\frac{३}{१४}$, $\frac{५}{२२}$, आणि $\frac{१०}{१२१}$ यांस अतिसंक्षेप समछेद रूप दे.

१४, २२, १२१ यांचा लघुतम साधारण गुणाकार = १६९४

$\frac{१६९४}{१४}$

$\frac{१६९४}{१४} = १२१$
$\frac{१६९४}{२२} = ७७$
$\frac{१६९४}{१२१} = १४$
} हे तीन वेगळाले भागाकार. आणीं अंश गुणायाचे आहेत.

तेव्हां $१२१ \times ३ = ३६३$
$७७ \times ५ = ३८५$
$१४ \times १० = १४०$
} हे इछिले अंश आहेत.

आणि $\frac{३६३}{१६९४}$, $\frac{३८५}{१६९४}$, $\frac{१४०}{१६९४}$, हे इछिले अतिसंक्षेप समछेदरूपाचे अपूर्णांक जाले.

पाहा, अपूर्णांकांस समछेद रूप दिल्यानें त्यांत अधिक भावाचा कोणता आहे हेंही सत्वर कळतें, जर $\frac{३}{४}$, $\frac{४}{५}$ यांस समछेद रूप $\frac{१५}{२०}$, $\frac{१६}{२०}$, हें दिल्यानें $\frac{४}{५}$ हे अधिक भावाचे आहेत हें उघड समजतें. कांकिं. $\frac{१६}{२०}$ हे $\frac{१५}{२०}$ यांहून अधिक आहेत.

## दुसरीं उदाहरणें.

प्रथम, $\frac{२}{३}$ आणि $\frac{४}{५}$ यांस बरोबर भावाचें समछेद अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{१०}{१५}$, $\frac{१२}{१५}$

दुसरें, $\frac{१}{३}$, $\frac{२}{५}$ आणि $\frac{३}{४}$ यांस बरोबर भावाचें समछेद अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{२०}{६०}$, $\frac{२४}{६०}$, $\frac{४५}{६०}$

तिसरें, $\frac{१}{२}$, $२\frac{१}{३}$ आणि ४ यांस बरोबर भावाचें समछेद अपूर्णांक रू-

पदे.

उत्तर $\frac{३५}{३०}, \frac{७८}{३०}, \frac{१३०}{३०}$.

चवथें, $\frac{४}{१५}$ आणि $\frac{४}{२७}$ यांस बरोबर भावाचें समछेद अपूर्णांक रूपदे.

उत्तर $\frac{३६}{१३५}$ आणि $\frac{२०}{१३५}$.

पांचवें, $\frac{२}{५}$ आणि $\frac{५}{१५}$ यांस बरोबर भावाचें समछेद अपूर्णांक रूपदे.

उत्तर $\frac{६}{१५}$ आणि $\frac{५}{१५}$

साहावें, $\frac{२}{३}$, $\frac{३}{४}$ आणि $\frac{७}{८}$ यांस बरोबर भावाचें समछेद अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{१६}{२४}, \frac{१८}{२४}$ आणि $\frac{२१}{२४}$

## सातवा प्रकार.

### मिश्र अपूर्णांकांस शुद्ध अपूर्णांकांचें रूप द्यावयाचा.

अपूर्णांकांचे दोनही अवयवांस सरळ अपूर्णांकांचें रूप दे; नंतर प्रत्येकाचा अंश दुसर्याचे छेदानें गुण. हें काम पूर्वप्रमाणेंच आहे, एक एक अवयव बरोबर संख्येनें गुणिला असतां भावांत भेद होत नाहीं.

असें $\frac{२\frac{१}{२}}{३} = \frac{५}{६}$ · आणि $\frac{२\frac{१}{३}}{४} = \frac{७}{१२}$ · आणि $\frac{३\frac{२}{५}}{४\frac{१}{२}} = \frac{\frac{१७}{५}}{\frac{९}{२}} = \frac{१७}{५} \times \frac{२}{९} = \frac{३४}{४५}$.

आठवा

## आठवा प्रकार.

### कोणत्येही अपूर्णांकाचा भाव आपल्ये पूर्णांकाचे अवयवांत काढायाचा.

पूर्णांकांत जर अनेक भावाचे अवयव आहेत तर त्यांस विविध गुणाकार रीतीनें अंशानें गुणावे, आणि तो गुणार विविध भागाकार रीतीनें छेदांनी भाग.

अथवा जर पूर्णांक कोणत्येही भावाचा १ या संख्येचा असेल तर, त्यांत त्याचे खालचे भावाचे किती अवयव आहेत त्या संख्येनें अंश गुणावा, आणि तो गुणाकार छेदांनीं भागावा. नंतर जर कांहीं शेष राहील, तर त्या भावाचा खालचे भावाचे अवयव त्या एकांत किती आहेत त्या संख्येनें तें शेष गुणावें, आणि तो गुणाकार पूर्वप्रमाणें छेदानीं भागावा; इछा असेल त्या पावेतों पुढें असेंच कर: नंतर वेगळाले उत्पन्न आलेले भागाकार एक ओळींत त्याचे त्याचे स्थळीं लिहावे. ह्मणजे अपूर्णांकाचा इछिला भाव आला.*

### उदाहरणें.

प्रथम, २ रुपये ३ पावले याचे $\frac{४}{५}$ काय आहेत

रीतीचे प्रथम रूपानें

रु ... पा
२ .. ३
       ४
५) ११ .. ०
रु २ .. ० .. ८० रे हें उत्तर

दुसरें, १ रुपयाचे $\frac{२}{३}$ काय आहेत.

रीतीचे दुसर्ये रूपानें.

२
४
३) ८
   २ — २
     १००
३) २००
    $६६\frac{२}{३}$

उत्तर २ पा .. $६६\frac{२}{३}$ रें

---

* कोणत्येही अपूर्णांकाच्या अंश भागाकाराचे शेषासारिखा कल्पिला आहे, आणि छेद भाजकासारिखा; याजकरितां ही रीति आणि विविध भागाकार हीं एकजातीचीं आहेत, अथवा त्रैराशिकांतील शेषाचा भाव काढायाचे रीतीचीं आहेत.

तिसरें,

तिसरें, १ रुपयाचे $\frac{३}{८}$ हे पूर्णांकांत किती भावाचे आहेत तें सांग.

रु पा रे
उत्तर ० .. १ .. ५०.

चवथें, १ रुपयाचे $\frac{२}{९}$ हे पूर्णांकांत किती भावाचे आहेत तें सांग.

रु पा रे
उत्तर ० .. ० .. ८८ $\frac{८}{९}$.

पांचवें, ५ रुपयांचे $\frac{३}{४}$ हे पूर्णांकांत किती भावाचे आहेत तें सांग.

रु पा रे
उत्तर ३ .. ३ .. ०.

साहावें, २ रुपये ३ पावले ५० रेस यांचे $\frac{२}{५}$ हे पूर्णांकांत किती भावाचे आहेत तें सांग.

रु पा रे
उत्तर १ .. ० .. ६०.

सातवें, १ मणाचे $\frac{४}{५}$ हे वजनी पूर्णांकांत किती भावाचे आहेत तें सांग.

उत्तर ३२ शेर.

आठवें, १ खंडीचे $\frac{२७}{८०}$ हे कैली पूर्णांकांत किती भावाचे आहेत हें सांग.

म पा
उत्तर ६ .. ३.

नववें, १ बिघ्याचे $\frac{७}{८}$ हे पूर्णांकांत किती भावाचे आहेत तें सांग.

पां का
उत्तर १७ .. १०

दाहावें, १ दिवसाचे $\frac{३}{१०}$ हे विलायती मानाचे पूर्णांकांत किती भावाचे आहेत तें सांग.

अवर मि
उत्तर ७ .. १२

---

नववा.

## नववा प्रकार.

### अपूर्णांकास एक जातींतून दुसऱ्ये जातींत आणायाचा.

※ हलक्या रूपाचे अवयव त्याचे वरचे भारी रूपाचे एकांत किती आहेत तो विचार करावा; नंतर जर भारी रूपांतून हलक्या रूपांत आणायाचें आहे तर अंशास त्या संख्येनें गुणावा, परंतु जर हलक्या रूपांतून भारी रूपांत न्यावयाचें आहे तर छेदास त्या संख्येनें गुणावा.

उदाहरणें.

**प्रथम,** एकरुपयाचे $\frac{२}{३}$ यांस रेसांत अपूर्णांक रूप दे.

$$\frac{२}{३} \times \frac{४}{१} \times \frac{१००}{१} = \frac{८००}{३}$$ हें उत्तर.

दुसरें, एकरेंसाचे $\frac{५}{७}$ यांस रुपयांत अपूर्णांक रूप दे.

$$\frac{५}{७} \times \frac{१}{१००} \times \frac{१}{४} = \frac{१}{५६०}$$ हें उत्तर.

तिसरें, एक रुपयाचे $\frac{१}{३}$. यांस रेंसांत अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{४००}{३}$ रेस.

चवथें, वजनी एकमणाचे $\frac{१}{३}$ यांस खंडींत अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{१}{६०}$ खंडी.

पांचवें, वजनी एक खंडीचे $\frac{१}{७}$ यांस शेरांत अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{८००}{७}$ शेर.

साहावें, केली एक शेराचे $\frac{१}{२}$ यांस खंडींत अपूर्णांक रूप दे.

---

※ अंकास रूपभेद करायासाठीं पूर्णांकांत चढती उतरती मांडणी रीति सांगीतली आहे, ती आणि ही रीति, सारिख्या आहेत.

उत्तर

उत्तर [illegible]/१६०० खंडी.

सातवें. एक रेंसाचे ३/८ यांस रुपयांत अपूर्णांक रूप दे.

उत्तर ३/३२०० रुपया.

आठवें, एकरुपयाचें ५/६ यांस रेंसांत अपूर्णांकरूप दें.

उत्तर १०००/३ रेंस.

नववें, ३ पावले ५० रेंस यांस रुपयांत अपूर्णांक रूप दे.

उत्तर ७/८ रुपया.

दाहावें, ३ पावले ३३ रेस यांस अपूर्णांक रूप दे.

उत्तर ३३३/४०० रुपया.

---

## व्यवहारी अपूर्णांकांची मिळवणी.

जर अपूर्णांक समछेद आहेत, तर सर्व अंश एकत्र मिळवून त्यांचे खालीं समछेद लिहि, ह्मणजे ही वेगळाल्ये अपूर्णांकांची इछिली बेरीज आली.

※ जर अपूर्णांक समछेद नाहींत तर ते समछेद करावे. आणि प्रभागजाति अपूर्णांक, भागजाति करावे. आणि अनेकरूप अपूर्णांक असतील तर ते एक

---

※ अपूर्णांक समछेद केल्याचे पूर्वी परकाष्ठा विरूप आहेत, जसें रुपया आणि रेंस हे विरूप किंवा विजाति ह्मणून त्यांचा एकीभाव होत नाहीं. परंतु त्यांस जेव्हां समछेद केले, आणि एकच वस्तूचे अवयव जाले तेव्हां त्यांचे अंशांची बेरीज अथवा वजाबाकी सुकर प्रसिद्ध होत्ये, अशी कोणत्येही पूर्णवस्तूंची यापासून या रीतीची सत्यता स्पष्ट आहे मिळवणी अथवा वजा बाकी यांत.

जेव्हां

एकरूप करावे. नंतर वर सांगीतल्या प्रमाणें मिळवणी करावी. भागानुबंध पूर्णांक असल्यास विषम अपूर्णांक रूप देऊन काम करावें, अथवा त्यांतील अपूर्णांक मात्र घेऊन मिळवणी करावी, नंतर ती बेरीज पूर्णांक जोडून लिहावी.

## उदाहरणें.

प्रथम, $\frac{३}{५}$, आणि $\frac{४}{५}$, यांची बेरीज कर.

आतां $\frac{३}{५} + \frac{४}{५} = \frac{७}{५} = १\frac{२}{५}$, हें उत्तर.

दुसरें,

---

जेव्हां कित्येक अपूर्णांकांची मिळवणी करायाची आहे तेव्हां बंकुत करून बरें आहे किं, त्यांतील दोन अपूर्णांक जे समछेद करण्यास सुगम आहेत ते घेऊन त्यांस समछेद करून त्यांची बेरीज घे; नंतर ती बेरीज आणि दुसरा एक अपूर्णांक यांस समछेद करून बेरीज घे, याप्रमाणें पुढें हीं.

पाहा, २, भलते कोणतेही दोन अपूर्णांक घेतले, जसे $\frac{७}{११}$ आणि $\frac{३५}{५५}$ हे बरोबर भावांत आहेत किंवा नाहींत हें त्यांस समछेद केल्या नंतर त्यांचे अंशांपासून प्रसिद्ध होतें. याज करितां जर $३५\times११$, आणि $७\times५५$ याप्रमाणें दोन बरोबर भावाचे गुणाकार उत्पन्न होतात, तर त्यांपासून बरोबर भावाचे दोन नवे अपूर्णांक उत्पन्न होतील, जसें $\frac{३५}{५५} = \frac{७}{११}$, अथवा $\frac{३५}{७} = \frac{५५}{११}$.

तेव्हां जर बरोबर भावाचे दोन अपूर्णांक घेतले, जसे $\frac{७}{११}$ आणि $\frac{३५}{५५}$ तर $३५\times११ = ७\times५५$; या प्रत्येकांतून $७\times११$ हे वजा करून ही बाकी राहील. $(३५-७)\times११ = (५५-११)\times७$. याज करितां हें अपूर्णांकरूप उत्पन्न होतें. $\frac{३५-७}{५५-११} = \frac{७}{११}$. अथवा $\frac{२८}{४४} = \frac{७}{११}$.

याचरीतीनेंही जर $\frac{७}{११}$ या अपूर्णांकाचीं पदें $\frac{३५}{५५}$ या अपूर्णांकाचे पदांशीं अनुक्रमें मिळविलीं तरीही त्यांस बरोबर भावाचें रूप होतें, जसें $\frac{३५+७}{५५+११} = \frac{४२}{६६} = \frac{७}{११}$.

अथवा सामान्यतः जर $\frac{अ}{ब} = \frac{क}{ड}$, तर त्या प्रमाणें दाखविलें जातें किं,

अ

दुसरें, $\frac{३}{५}$ आणि $\frac{५}{६}$ यांची बेरीज कर.

आतां $\frac{३}{५}+\frac{५}{६}=\frac{१८}{३०}+\frac{२५}{३०}=\frac{४३}{३०}=१\frac{१३}{३०}$ हें उत्तर.

तिसरें, $\frac{५}{८}$ आणि $७\frac{१}{२}$ आणि $\frac{३}{४}$ चा $\frac{१}{३}$ यांची बेरीज कर.

आतां $\frac{५}{८}+७\frac{१}{२}+\frac{३}{४}$ चा $\frac{१}{३}=\frac{५}{८}+\frac{१५}{२}+\frac{१}{४}=\frac{५}{८}+\frac{६०}{८}+\frac{२}{८}=\frac{६७}{८}=८\frac{३}{८}$ हें उत्तर.

चवथें, $\frac{३}{७}$ आणि $\frac{६}{७}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $१\frac{२}{७}$

पांचवें, $\frac{७}{९}$ आणि $\frac{५}{१२}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $१\frac{७}{३६}$

साहावें, $\frac{२}{७}$ आणि $\frac{५}{२१}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $\frac{११}{२१}$

सातवें, $\frac{२}{३}$ आणि $\frac{३}{१०}$ आणि $\frac{५}{७}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $१\frac{१०३}{२१०}$.

आठवें, $\frac{५}{१२}$ आणि $\frac{३}{४}$ आणि $२\frac{१}{५}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $३\frac{३५}{६०}$

---

$\frac{अ \pm क}{ब \pm ड}=\frac{अ}{ब}=\frac{क}{ड}$.

याजकरितां जेव्हां बरोबर भावाचे दोन अपूर्णांक आहेत, तेव्हां जर त्या दोहोंचे अंशांची बेरीज आणि छेदांची बेरीज अथवा अंशांची वजाबाकी आणि छेदांची वजाबाकी यांपासून जे नवे अपूर्णांक उत्पन्न होतील ते त्या पूर्व दोन अपूर्णांकांचे बरोबर भावाचेआहेत, हें प्रतिपाद्य बहुत उपयोगी आहे असें पुढें प्रमाणरीतींत कळेल.

नववें,

नववें, $\frac{२}{७}$ आणि $\frac{२}{३}$ चे $\frac{५}{८}$ आणि $१\frac{३}{२०}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $१०\frac{१}{६०}$.

दाहावें, एक रुपयाचे $\frac{२}{३}$ आणि एक पावल्याचे $\frac{५}{२}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर पा ३ .. रें $२२\frac{१}{२}$.

अकरावें, एक पावल्याचे $\frac{५}{८}$ आणि एक रेंसाचे $\frac{५}{१८}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर रें $६०\frac{५}{१८}$.

बारावें, एक रुपयाचे $\frac{१}{७}$ आणि एक पावल्याचे $\frac{२}{३}$ आणि एक रेंसाचे $\frac{५}{१२}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर रें $७९\frac{१९७}{२५२}$.

---

## व्यवहारी अपूर्णांकांची वजाबाकी.

असे मेळवणी करावयाकरितां व्यवहारी अपूर्णांक समजाति समछेद केले, तसे तयार करावे; नंतर भारी अंशांत थोडे अंश वजा करून, बाकी राहील त्या खालीं समछेद लिहावे, ह्मणजे इछिली वजाबाकी जाली.

### उदाहरणें.

प्रथम, $\frac{५}{६}$ आणि $\frac{१}{६}$ यांची वजाबाकी कर.

आतां $\frac{५}{६} - \frac{१}{६} = \frac{४}{६} = \frac{२}{३}$. हें उत्तर.

दुसरें, $\frac{३}{४}$ आणि $\frac{५}{८}$ यांची वजाबाकी कर.

$\frac{७}{१२} - \frac{५}{९} = \frac{२१}{३६} - \frac{२०}{३६} = \frac{१}{३६}$. हें उत्तर.

तिसरें, $\frac{७}{१२}$ आणि $\frac{५}{१२}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर $\frac{१}{६}$.

चवथें, $\frac{३}{१३}$ आणि $\frac{५}{३९}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर $\frac{४}{३९}$.

पांचवें, $\frac{५}{१२}$ आणि $\frac{७}{१३}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर $\frac{१९}{१५६}$.

साहावें, ५ $\frac{३}{८}$ आणि ४ $\frac{१}{६}$ चे $\frac{३}{७}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर ४ $\frac{३१}{१६८}$.

सातवें, एकरुपयाचे $\frac{५}{८}$ आणि एकपावल्याचे $\frac{२}{३}$ चे $\frac{२}{३}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर पा १ .. रें ७२ $\frac{२}{३}$.

आठवें, रुपये ५ $\frac{१}{६}$ चे $\frac{३}{४}$ आणि एक पावल्याचे $\frac{२}{५}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर, रु १ .. पा १ .. रें ३० $\frac{२०}{२२}$.

---

## व्यवहारी अपूर्णांकांचा गुणाकार.

※ भागानुबंध पूर्णांक असला तर त्यास विषम अपूर्णांकाचें रूप द्यावें; नंतर

---

※ कोणतीही वस्तु अपूर्णांकानें गुणायाची, यांत हाच अर्थ आहे कीं त्या वस्तूचे कांहीं भाग घ्यावयाचे आहेत; याजकरितां प्रभागजाति अपूर्णांकासारिखें प्रसिद्ध होतें; आणि

सर्व अंश परस्पर गुणावे, ते अंश होतील; तसे सर्व छेद परस्पर गुणावे, ते छेद होतील, ह्मणजे इछिला गुणाकार होईल.

## उदाहरणें.

प्रथम, $\frac{३}{४}$ आणि $\frac{२}{९}$ यांचा गुणाकार काय होतो.

आतां, $\frac{३}{४} \times \frac{२}{९} = \frac{६}{३६} = \frac{१}{६}$ हें उत्तर.

दुसरें, $\frac{२}{३}$, $३\frac{१}{४}$, ५ आणि $\frac{३}{५}$ चे $\frac{३}{४}$ हे सर्व परस्पर गुण.

आतां, $\frac{२}{३} \times \frac{१३}{४} \times \frac{५}{१} \times \frac{३}{५} \times \frac{३}{४} = \frac{१३ \times ३}{४ \times २} = \frac{३९}{८} = ४\frac{७}{८}$ हें उत्तर.

तिसरें, $\frac{२}{७}$ आणि $\frac{५}{८}$ यांचा गुणाकार काय होतो.

उत्तर $\frac{५}{२८}$.

चवथें, [illegible] यांस [illegible] यांणीं गुण.

उत्तर [illegible].

पांचवें, $\frac{३}{७}$, [illegible], आणि [illegible] हे सर्व परस्पर गुण.

उत्तर [illegible].

साहावें, $\frac{१}{२}$, $\frac{२}{३}$ आणि ३ हे सर्व परस्पर गुण.

उत्तर १

---

णि त्या प्रमाणें अंश आणि छेद परस्पर अनुक्रमें गुणून नवा इछिला अपूर्णांक उत्पन्न होतो.

पाद्धा. जेव्हां अपूर्णांकास पूर्णांकानें गुणायाचें आहे तेव्हां त्या अपूर्णांकाचे छेद त्या पूर्णांकानें निःशेष भागिले जातील तर भागून भागाकार तेथें लिहावा ह्मणजे इछिलें काम जालें, आणि तसें न होई तर अंश पूर्णांकानें गुणावे ह्मणजे इछिलें काम जालें.

सातवें,

सातवें, $\frac{७}{९}$, $\frac{३}{५}$, आणि ४ $\frac{५}{१४}$ हे सर्व परस्पर गुण.

उत्तर २ $\frac{१}{३०}$.

आठवें, $\frac{५}{६}$ आणि $\frac{६}{७}$ चे $\frac{२}{३}$ हे परस्पर गुण.

उत्तर $\frac{१०}{२१}$.

नववें, ६ आणि ५ चे $\frac{२}{३}$ हे परस्पर गुण.

उत्तर २०.

दाहावें, $\frac{३}{५}$ चें $\frac{२}{९}$ आणि ३ $\frac{२}{७}$ चे $\frac{५}{८}$ हे परस्पर गुण.

उत्तर $\frac{२३}{८४}$.

अकरावें, ३ $\frac{२}{७}$ आणि ४ $\frac{१४}{३३}$ हे परस्पर गुण.

उत्तर १४ $\frac{१२४}{२३१}$.

बारवें, ५, $\frac{२}{३}$, $\frac{३}{५}$ चें $\frac{२}{७}$ आणि ४ $\frac{१}{६}$ हे सर्व परस्पर गुण.

उत्तर २ $\frac{८}{२१}$.

---

## व्यवहारी अपूर्णांकांचा भागाकार.

* जसे गुणाकार करावयास अपूर्णांक तयार केले, तसेच भागाकार करावयास तयार करावे; नंतर अंश अंशानें भागावे, तसे छेद छेदानें भागावे.

---

* भागाकार गुणाकाराचे उलटा आहे, याजकरितां या रीतीची सत्यता स्पष्ट आहे.

पाहा, जेव्हां अपूर्णांकास पूर्णांकानें भागायाचें आहे, तेव्हां त्या अपूर्णांकाचे अंश पूर्णांकानें निःशेष भागिले जातील तर भागून, भागाकार तेथे लिहावा, तसें नहोई तर छेद पूर्णांकानें गुणावे ह्मणजे इछिलें आलें.

जर

अर दोनही निःशेष भागले आतील, असें न होईल तर, भाजकाचे अंश व छेद बदलून लिहून, गुणाकार रीती प्रमाणें तीं पदें परस्पर गुणावीं. ह्मणजे भागाकार आला.

## उदाहरणें.

प्रथम, $\frac{२५}{९}$ यास $\frac{५}{३}$ याणें भाग.

आतां $\frac{२५}{९} \div \frac{५}{३} = \frac{५}{३} = १\frac{२}{३}$ हें उत्तर.

दुसरें, $\frac{५}{९}$ यास $\frac{३}{२५}$ याणें भाग.

$\frac{५}{९} \div \frac{३}{२५} = \frac{५}{९} \times \frac{२५}{३} = \frac{१२५}{२७} = ४\frac{१७}{२७}$ हें उत्तर.

तिसरें, $\frac{१६}{२५}$ यास $\frac{४}{५}$ याणें भाग.

उत्तर $\frac{४}{५}$.

चवथें, $\frac{७}{१६}$ यास $\frac{३}{४}$ याणें भाग.

उत्तर $\frac{७}{१२}$.

पांचवें, $\frac{१४}{९}$ यास $\frac{७}{६}$ याणें भाग.

उत्तर $१\frac{१}{३}$.

साहावें, $\frac{५}{६}$ यास $\frac{१५}{७}$ याणें भाग.

उत्तर $\frac{७}{१८}$.

सातवें, $\frac{१५}{३५}$ यास $\frac{३}{५}$ याणें भाग.

उत्तर $\frac{५}{७}$.

आठवें, $\frac{२}{७}$ यास $\frac{३}{५}$ याणें भाग.

उत्तर $\frac{१०}{२१}$.

नववें,

नववें, $\frac{९}{१६}$ यास ३ याणें भाग.

उत्तर $\frac{३}{१६}$.

दाहावें, $\frac{३}{५}$ यास २ याणें भाग.

उत्तर $\frac{३}{१०}$.

अकरावें, ७$\frac{२}{३}$ यास १$\frac{५}{६}$ याणें भाग.

उत्तर $\frac{२३}{३३}$.

बारावें, $\frac{२}{३}$ चे $\frac{२}{३}$ यास ७$\frac{२}{३}$ चे $\frac{५}{७}$ याणें भाग.

उत्तर $\frac{७}{१७२}$.

---

## व्यवहारी अपूर्णांकांचें त्रैराशिक.

पूर्वरीती प्रमाणें अपूर्णांक तयार करावे; नंतर, त्यांत सम आणि व्यस्त काय असेल तें पाहून त्रिराशि रीती प्रमाणें इच्छाफळ उत्पन्न करावें.

### उदाहरणें.

प्रथम, जर एक यार्ड बनाथीचे $\frac{३}{८}$ यांस एक रुपयाचे $\frac{२}{५}$ पडतात; तर एक यार्ड बनाथीचे $\frac{५}{१६}$ यांस काय पडेल. ?

जर या. $\frac{३}{८}$ : रु. $\frac{२}{५}$ :: या. $\frac{५}{१६}$

$\frac{२}{५} \times \frac{५}{१६} \times \frac{८}{३} = \frac{१}{३}$ = रु. पा. १ रें. ३३$\frac{१}{३}$ इच्छाफळ हें उत्तर.

दुसरें, जर रुपें तोळे ३$\frac{१}{२}$ यास ४ रुपये २ पावले पडतात; तर १ तोळ्यास काय पडेल ?

उत्तर

रु पा रें
उत्तर १ .. १ .. ३३$\frac{१}{३}$.

तिसरें, जर एक गलबताचे $\frac{३}{१६}$ यांची किंमत २७३१ रु. १ पावला होत्ये, तर त्याच गलबताचे $\frac{५}{३२}$ यांची किंमत किती होईल.

रु पा रें
उत्तर २२७६ .. ० .. १६$\frac{२}{३}$.

चवथें, जर कलकत्यास १०० रुपयांची हुंडी घेणें तर, मुंबईस १०८$\frac{५}{८}$ रुपये पडतात, तर कलकत्यास १२३०० रुपयांचे हुंडीस मुंबईस किती रुपये देणें पडतील.

रु पा रें
उत्तर १३३६० .. ३ .. ५०.

पांचवें, २७३७ रुपये २ पावले याचें एक वर्षाचें व्याज दरशेंकडा ३$\frac{१}{४}$ रुपये प्रमाणें काय होईल.

रु पा रें
उत्तर ८८ .. ३ .. ८७$\frac{१}{२}$

साहावें, एक गलबताचा $\frac{१}{१०}$ यास ७३० रुपये २ पावले २५ रेंस पडतात, तर २५०५ रुपयांस त्याच गलबताचा कोणता हिंसा येईल.

उत्तर $\frac{४००८}{११६८९}$

सातवें, एक फुट अथवा १२ अंगुळें लांब आणि १२ अंगुळें रुंद असें फळें असावें, त्यास ७$\frac{३}{४}$ अंगुळें रुंदीचा तरवता लांब आहे, तेव्हां त्यांतून किती लांब घेतल्यानें बराबर होईल.

उत्तर १८$\frac{१८}{३१}$ अंगुळें.

आठवें, ९$\frac{१}{२}$ यार्ड लांब आणि २$\frac{१}{२}$ यार्ड रुंद कापडाची रजई करावयाची आहे, तीस एके आंगास रेशमी अस्तर असावें, आणि तें रेशमी एक यार्डाचे

र्डीचे $\frac{३}{४}$ रुंदीचें आहे, तेव्हां किती लांब घ्यावें ह्मणजे रजईस बराबर होईल.

उत्तर ३१ $\frac{३}{५}$ यार्ड.

नववें, कोणी एक जासुद रोज १३ $\frac{५}{८}$ तास चालत असतां, ३५ $\frac{३}{४}$ दिवसांत जा मुकामीं गेला; त्याच मुकामीं जाणें आहे, आणि रोज ११ $\frac{५}{६}$ तास चालतो आहे, तर किती दिवस लागतील.

उत्तर ४० $\frac{६१५}{११५२}$ दिवस.

दाहावें, एके पळटणांत ९७६ शिपाई आहेत. त्यांस नवीं डगलीं द्यावयाचीं, एक डगल्यास बनाथ २ $\frac{३}{४}$ यार्ड लांब, आणि १ $\frac{५}{८}$ यार्ड रुंद लागत्ये, सर्व डगल्यांस अस्तर असावें, त्यास कापड $\frac{५}{८}$ यार्डीचे रुंदीचें लांब आहे, तेव्हां किती यार्ड लांब घेतलें ह्मणजे सर्व डगल्यांस पुरेल.

उत्तर ४५३१ $\frac{३}{५}$ यार्ड.

---

## दशांश अपूर्णांक.

दशांश अपूर्णांक तोच आहे, ज्याचा छेद (१) हा अंक आहे; आणि त्याजवर इतकीं शून्यें आहेत किं अंशस्थळींचे अंकास जितकीं स्थळें आहेत; आणि त्याचे लिहिण्याचा प्रकार असा आहे किं, अंशस्थळींचा अंक लिहून त्याचे डावेकडे मात्र (·) असा बिंदु द्यावा. जसें, $\frac{४}{१०}$ ह्मणजे याप्रमाणें लिहितात. ·४, आणि $\frac{२४}{१००}$ याप्रमाणें लिहितात ·२४, आणि $\frac{७४}{१०००}$ याप्रमाणें ·०७४, आणि $\frac{१२४}{१०००००}$ याप्रमाणें ·००१२४ : यांत इतकीं शून्यें घालितात किं, अंकस्थळांची संख्या जिहीं करून छेदस्थळींचे शून्यांचे संख्ये बरोबर होईल.

मिश्र

मिश्र संख्या तीच आहे, ज्यांत एक पूर्णांक संख्या आणि दुसरी अपूर्णांक संख्या योजिली आहे, त्यांचा भेद मधील बिंदू करून स्पष्ट होतो. जसें, ३·२५ ही आणि $३\frac{२५}{१००}$ अथवा $\frac{३२५}{१००}$ ही एकच आहे.

दशांशांचे उजव्ये बाजूस कितीही शून्यें ठेविली तरी त्यांचे भावांत न्यूनाधिक होत नाहीं; ह्मणजे ·४, अथवा ·४०, अथवा ·४००, हे दशांश आहेत ज्यांचे भाव एकच आहेत, यांचे बरोबर $\frac{४}{१०}=\frac{२}{५}$. परंतु जेव्हां दशांशाचे डाव्ये कडे शून्यें ठेविलीं, तेव्हां त्यांचे भाव उत्तरोत्तर दश गुण न्यून होतात; जसें, ·४ हा $\frac{४}{१०}$ ह्मणजे चार दशमांश आहेत; परंतु ·०४ हा $\frac{४}{१००}$ ह्मणजे चार शतांशांचे मात्र बरोबर आहे; आणि ·००४ हा $\frac{४}{१०००}$ ह्मणजे चार सहस्रांशांचे बराबर आहे.

जेव्हां दशांशांत कित्येक अंक लिहून पुढें संख्या स्तब्ध होत्ये त्यास सांत दशांश ह्मणतात, जसें, ·१२५ = $\frac{१२५}{१०००}=\frac{१}{८}$, आणि ·९४८ = $\frac{९४८}{१०००}=\frac{२३७}{२५०}$.

जेव्हां दशांशांत एक किंवा अनेक अंक त्यांचे तेच पुन: पुन: येतात तेव्हां त्यांस आवर्त दशांश ह्मणतात; जसें, ·३३३३३३ इत्यादि = $\frac{१}{३}$, ·६६६६६६ इत्यादि = $\frac{२}{३}$, ·४२८५७१४२८५७१ इत्यादि = $\frac{३}{७}$, तसेच बहुत दुसरेही.

जसें पूर्णांकांत तसेंच दशांश अपूर्णांकांत आहे, कि उजव्येकडील अंकाहून डाव्येकडील अंक उत्तरोत्तर दशगुण अधिक होतो; आणि उजव्येकडे तसाच न्यून होतो; हें या पुढील कोष्टकांवरून समजांत येईल.

३ दश

| ३ दशलक्ष | ३ लक्ष | ३ दशसहस्र | ३ सहस्र | ३ शत | ३ दश | ३ एक . | ३ दशांश | ३ शतांश | ३ सहस्रांश | ३ दशसहस्रांश | ३ लक्षांश | ३ दशलक्षांश |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|

## दशांश अपूर्णांकांची मिळवणी.

पूर्णांकांप्रमाणें यांतील अंक त्या त्या भागाचे अंकांखालीं अनुक्रमें लिहावे; असें केल्यानें जा दशांश चिन्हबिंदूनीं पूर्णांक आणि अपूर्णांक यांचा भेद दाखविला ते सर्व एकाखालीं एक असे एक ओळींत येतील. नंतर पूर्णांक-रीतीनें उजव्येकडून आरंभ करून एक एक ओळीची बेरीज घेऊन लिहावी; आणि जा रकमेंत दशांशस्थळें अधिक असतील तीं मोजून बेरिजेंत तितक्या स्थळांवर, अथवा दशांश चिन्हाचे ओळी खालीं दशांश चिन्ह करावें.

### उदाहरणें.

प्रथम, २९·०१४६, आणि ३१४६·५, आणि २१०९, आणि ·६२४१७, आणि १४·१६ यांची बेरीज घे.

```
  २९·०१४६
३१४६·५
२१०९
    ·६२४१७
  १४·१६
─────────────
५२९९·२९८७७ ही बेरीज.
```

दुसरें,

दुसरें, २७६, ३९·२१३, ७२०१४·९, ४१७, आणि ५०३२ यांची बेरीज घे.

उत्तर ७७७७९·११३.

तिसरें, ७५३०, १६·२०१, ३·०१४२, ९५७·१३, ६·७२११९, आणि ·०३०१४ यांची बेरीज घे.

उत्तर ८५१३·०९६५३.

चवथें, ३१२·०९, ३·५७११, ७१९५·६, ७१·४९८, ९७३९·२१५, १७९, आणि ·००२७ यांची बेरीज घे.

उत्तर १७५००·९७६८.

---

## दशांश अपूर्णांकांची वजाबाकी.

मिळवणी प्रमाणें, सर्व अंकांस आपआपल्ये भावारवालीं लिहावे; नंतर पूर्णांकरीती प्रमाणें, उजव्येकडून आरंभ कर, नंतर मिळवणींत सांगीतल्या प्रमाणें दशांश चिन्ह बिंदु करावा.

### उदाहरणें.

प्रथम, ९१·७३, आणि २·१३८ यांची वजाबाकी कर.

```
९१·७३
 २·१३८
------
८९·५९२   बाकी हें उत्तर.
```

दुसरें, १·९१८५, आणि २·७३ यांची वजाबाकी कर.

उत्तर ·८११५

तिसरें,

तिसरें, ४.९०१४२, आणि २१४.८१ यांची वजाबाकी कर.

उत्तर २०९.९०८५८.

चौथें, २७१४, आणि .९१६ यांची वजाबाकी करं.

उत्तर २७१३.०८४.

---

## दशांश अपूर्णांकांचा गुणाकार.

※ जसे अपूर्णांक असतील, तसे कर्त्यांस मांडून गुणाकार करावा. — नंतर दोहों कर्त्यांत जितकीं दशांश स्थळें आहेत तितकीं गुणाकारांत मोजून दशांश चिन्ह करावें. परंतु जर गुणाकारांत इतकीं अंकस्थळें नाहीं तर मागें शून्यें देऊन तितकीं स्थळें पूर्णकरून दशांश चिन्ह करावें.

### उदाहरणें.

प्रथम, .३२१०९६ यांस .२४६५ यांणी गुण.

```
   .३२१०९६
     .२४६५
  --------
   १६०५४८०
  १९२६५७६
 १२८४३८४
 ६४२१९२
-----------
.०७९१५०१६४०   गुणाकार हें उत्तर.
```

---

※ या पुढील उदाहरणापासून या रीतीची सत्यता स्पष्ट होईल : — .१२ हे .३६१ यांणीं गुणायाचे असावे; या संख्या याचे बराबर आहेत. $\frac{१२}{१००}$, आणि $\frac{३६१}{१०००}$ यांचा गुणाकार हाच आहे, $\frac{४३३२}{१०००००}$ म्हणजे पूर्वीं सांगीतल्ये दशांश अपूर्णांक लिहिण्याचे रीती प्रमाणें = .०४३३२ आहे, जांत दशांशस्थळें छेदस्थळींचे शून्या इतकीं आहेत. अथवा दोहों कर्त्यांत जितकीं दशांश स्थळें आहेत.

दुसरें,

दुसरें, ७९·३४७ यांस २३·१५ याणीं गुण.

उत्तर १८३६·८८३०५.

तिसरें, ·६३४७८ यांस ·४२०४ याणीं गुण.

उत्तर ·२६६८६१५१२.

चौथें, ·३८५७४६ यांस ·००४६४ याणीं गुण.

उत्तर ·००१७८९८६१४४.

## प्रथम संक्षेप.

दशांशांस १ आणि त्यावर एक, दोन, किंवा याहून अधिक शून्यें, जसें, १०, १००, १०००, इत्यादिकानें गुणायाचा.

हें काम करायास इतकें मात्र केलें पाहिजे, गुणकांत जितकीं शून्यें आहेत तितक्ये स्थळांवर गुण्यांत उजव्येकडे दशांश चिन्ह सारावें. तितकीं स्थळें नाहींत तर शून्यें देऊन पूर्ण करावीं.

### उदाहरणें

प्रथम, ५१·३, आणि १००० यांचा गुणाकार हाच आहे. ५१३००

दुसरें, २·७१४, आणि १०० यांचा गुणाकार काय आहे.

तिसरें, ·९१६, आणि १००० यांचा गुणाकार काय आहे.

चौथें, २१·३१, आणि १०००० यांचा गुणाकार काय आहे.

## दुसरा संक्षेप.

संक्षेपानें गुणाकार कृति करायाचा, असा किं, गुणाकारांत दशांशस्थळें इछिल्याप्रमाणेंच येतील.

गुणक

गुणकसंख्येंतील एकमचे स्थळींचा अंक गुण्यांकाचे त्या अंकाखालीं लिहावा; जो अंक गुणाकारांतील इछिल्ये दशांशस्थळांचे शेवटल्ये स्थळीं आहे; आणि तेथून बाकी पूर्णांक उजवे कडे उलटे लिहावे. आणि अपूर्णांक त्या एकंपासून डावे कडे लिहावे. — नंतर गुणायास आरंभ करावा, जा गुणकानें गुणायाचे त्याचे वरचे अंकापासून होईल असा; परंतु उजव्ये कडील शेवटा पासून लिहावे; मागील सोडिल्ये अंकांतून एक जवळचा अंक गुणून, त्यांतून हातचे घेण्याचा मार्ग ५ पासून १४ पर्यंत असल्यास हातचा १ धरावा; तसें १५ पासून २४ पर्यंत हातचे २, तसें २५ पासून ३४ पर्यंत असल्यास हातचे ३, या प्रमाणें पुढेंही. तो हातचा अंक त्यांत मेळवून लिहावे; नंतर पूर्व प्रमाणें मेळवणी करून, तितक्ये इछिल्ये स्थळांवर दशांश चिन्ह करावें. म्हणजे गुणाकार जाला.

## उदाहरणें.

प्रथम. २७·१४९८९६ यांस ९२·४१०३५ याणीं गुण, असे कीं; गुणाकारांत दशांशस्थळें चार होतील.

संक्षेपरीति.

| |
|---|
| २७·१४९८९६ |
| ५३ ०१४२९ |
| २४४३४८०७४ |
| ५४२९९७ |
| १०८५९९ |
| २७१५ |
| ८१ |
| १४ |
| २५०८·९२८० |

चालती रीति.

| | |
|---|---|
| २ | ७·१४९८९६ |
| ९ | २·४१०३५ |
| १३ | ५७४९३० |
| ८१ | ४४९६८ |
| २७१४ | ९८९६० |
| १०८५९९ | ४४ |
| ५४२९९७ | २ |
| २४४३४८०७४ | |
| २५०८९२८० | ६५०५९० |

दुसरें,

दुसरें, ४८०·१४६३६ यांस २७२४१६ यांणीं गुण, असेकिं गुणाकारांत दशांशस्थळें चार होतील.

गुणाकार १३०८·००३६.

तिसरें, २४९०·३०४८ यांस ·५७३२८६ यांणीं गुण, असेकिं गुणाकारांत दशांशस्थळें पांच होतील.

गुणाकार १४२७·६५६८७

चवथें, ३२५·७०१४२८ यांस ·७२१८३५२ यांणीं गुण, असेकिं गुणाकारांत दशांशस्थळें तीन होतील.

गुणाकार २३५·१०४

## दशांश अपूर्णांकांचा भागाकार.

पूर्णांकांप्रमाणें, भागाकार करावा; आणि भागाकारांत इतकीं दशांश स्थळें करावीं, किं जितकीं दशांश स्थळें भाजका पेक्षां भाज्यांत अधिक आहेत.*

दशांशचिन्ह बिंदुस्थळ आणायाची दुसरी हीरीति आहे; भागाकारांतील प्रथम अंक, पूर्णांक अथवा दशांश असेल, तो अशा स्थळीं असावा, किं, भाजक आणि भागाकार यांचे प्रथम गुणाकारांतील भाजकाचे एकमचे स्थळीं-

---

* या रीतीचें कारण स्पष्ट आहे; कांकिं, भाजक आणि भागाकार हे गुणून भाज्य उत्पन्न होतो, आणि गुणाकाराप्रमाणें भाज्यांत दशांशस्थळें भाजक आणि भागाकार या दोहोंतील दशांशस्थळांचे बरोबर असलीं पाहिजेत; याजकरितां भागाकारांत तितकीं दशांशस्थळें असली पाहिजेत, जितकीं भाजकापेक्षां भाज्यांत अधिक आहेत.

ध्यें जर मध्यांचा आणि शेवटांचा गुणाकार बरोबर आहे, तर यांतच गुणोत्तर ही बरोबर आहे असें जाणावें $\frac{६}{३} = \frac{१४}{७}$, अथवा याप्रमाणाची सत्ता ६ : ३ : : १४ : ७, याजवरून,

दुसरासिद्धांत. कोणतेही दोन गुणाकार बरोबर असतील, तर त्यांचे वेगळाल्ये कर्त्यांपासून एकप्रमाण करतां येईल.

जर दोन मध्यपदें बरोबर असतील, जसें, यापदांमध्यें ३, ६, ६, १२, तर त्या मध्यपदांचा गुणाकार वर्ग होईल. याजवरून

तिसरासिद्धांत. कोणत्येही दोन संख्यांचें मध्यप्रमाण त्या संख्यांचे गुणाकाराचें वर्गमूळ आहे.

कोणत्येही प्रमाणाचीं वेगळालीं पदें स्थळांतर करून लिहिलीं, अशीं कीं आंत आद्यंतांचा गुणाकार मध्यांचे गुणाकाराबरोबरच राहील, तर प्रमाणाचे शुद्धीचा नाश होत नाहीं.

जसें, ६ : ३ : : १४ : ७, याप्रमाणामध्यें ६ × ७ = ३ × १४, त्याचे शेवटपदांस किंवा मध्यपदांस स्थळांतर करतां येईल, हें परावर्तानें होतें असें म्हणतात.

जसें ६ : १४ : : ३ : ७

अथवा ७ : ३ : : १४ : ६

अथवा ७ : १४ : : ३ : ६

अथवा, दुसर्‍ये रीतीनें, शेवटपदें मध्यपदांचे स्थळीं लिहितां येतील, हें व्यत्ययानें होतें असें म्हणतात.

असें

जसें ३ : ६ : : ७ : १४

अथवा, तिसर्‍येरीतीनें, दोनही अग्रसरांस अथवा उपाग्रसरांस प्रमाणतेचा नाश नहोतां कोणत्येही एकसंख्येनें गुणितां किंवा भागितां येईल.

जसें ६×४ : ३ : : १४×४ : ७ ह्मणजे २४ : ३ : : ५६ : ७

आणि ६÷२ : ३ : : १४÷२ : ७ ह्मणजे ३ : ३ : : ७ : ७

आणि, व्यवहारी अपूर्णांकांचे मिळवणींतील दुसर्‍ये दीपेमध्यें जी प्रतिज्ञा आहे ती प्रमाणपदांस लाविली असतां, जसें यांत ३० : ६ : : १५ : ३, अथवा, $\frac{३०}{६} = \frac{१५}{३}$ तेव्हां यांस ती प्रतिज्ञा लाउन हें रूप होतें

$$\frac{३० \pm १५}{६ \pm ३} = \frac{१५}{३} \text{ आणि } \frac{३० + १५}{६ + ३} = \frac{३० - १५}{६ - ३}$$ याजवरून.

चौथा सिद्धांत. अग्रसरांची बेरीज अथवा वजाबाकी उपाग्रसरांचे बेरिजेस अथवा वजाबाकीस आहे, जसा त्यांतील कोणताही अग्रसर त्याचे उपाग्रसरास आहे.

पांचवा सिद्धांत. अग्रसरांची बेरीज त्यांचे वजाबाकीस आहे, जशी उपाग्रसरांची बेरीज त्यांचे वजाबाकीस

अशारीतीनें जर युग्मांची श्रेढी असेल, जसें $\frac{६}{३} = \frac{१०}{५} = \frac{१४}{७} = \frac{३०}{१५}$; त्यांसही याप्रमाणें रूप होईल $\frac{६+१०+१४+३०}{३+५+७+१५} = \frac{१४}{७} = \frac{३०}{१५}$ इत्यादि, याजवरून.

साहावा सिद्धांत. भूमितिप्रमाणांत युग्मांचे कोणत्येही श्रेढीमध्यें, सर्व अग्रसरांची बेरीज त्यांतील सर्व उपाग्रसरांचे बेरिजेस आहे, जसा त्यांतील कोणत्येही एक युग्माचा अग्रसर त्याचे उपाग्रसरास.

सात

सातवा सिद्धांत. जर दोन प्रमाणें अनुक्रमें पदशः गुणिलीं, तर ते गुणाकार नवें एकप्रमाण करितील.

जसें, जर ३० : १५ : : ६ : ३

आणि २ : ३ : : ४ : ६

तर ३०×२ : १५×३ : : ६×४ : ३×६

अथवा ६० : ४५ : : २४ : १८ अथवा $\frac{६०}{४५} = \frac{२४}{१८}$.

आठवा सिद्धांत. जर चार पदें प्रमाणांत आहेत, तर त्यांचे वर्ग घनादिकही प्रमाणांत होतील.

कां, स्पष्ट आहे कीं, यांत हेंच मात्र आहे कीं एकच प्रमाण बरप्रमाणें पुनःपुनः गुणून ते गुणाकार वर्गघनादि होतात.

तसेच हे गुण करणीवर ही लागतात.

जसें $\sqrt{७२०}$ : $\sqrt{८०}$ : : $\sqrt{५६७}$ : $\sqrt{६३}$

आणि $\sqrt{१२}$ : $\sqrt{३}$ : : $\sqrt{४}$ : $\sqrt{१}$

कां $\frac{\sqrt{७२०}}{\sqrt{८०}} = \frac{\sqrt{९.८०}}{\sqrt{८०}} = \frac{३}{१}$ आणि $\frac{\sqrt{५६७}}{\sqrt{६३}} = \frac{\sqrt{९.६३}}{\sqrt{६३}} = \frac{३}{१}$

आणि $\frac{\sqrt{१२}}{\sqrt{३}} = \sqrt{\frac{१२}{३}} = \frac{\sqrt{४}}{१} = \frac{२}{१}$

नववा सिद्धांत. भूमितिश्रेढीचे शेवटपदांचा भागाकार, त्याच श्रेढीचे गुणोत्तरास घातप्रकाशक एकोनगच्छ केला इतक्या घाताचे बरोबर आहे.

जसें, २, ४, ८, १६, ३२, ६४, १२८, २५६, ५१२, १०२४, या दाहा

पदांत

पदांत गुणोत्तर २ आहे, एकोनगछ ९ आहे; तेव्हां शेवटांचा भागाकार $\frac{१०२४}{२}$ = ५१२, आणि $२^{९}$ = ५१२ हेही बरोबर आहेत.

याजकरितां अतिमोटें पद, अतिलाहानपद गुणिलें गुणोत्तराचे घातानें जास घातप्रकाशक एकोनगछ आहे, त्या गुणाकाराचे बरोबर आहे.

दाहावा सिद्धांत. पदांचें सर्वधन भूमितिश्रेढीमध्यें, यारीतीनें निघतें; दोन शेवटांची वजाबाकी एकोनगुणोत्तरानें भागावी, नंतर त्याभागाकारांत अतिमोटें पद मेळवावें, ती बेरीज सर्वधन आलें.

असें यापदांचें सर्वधन. २, ४, ८, १६, ३२, ६४, १२८, २५६, ५१२, १०२४, (जांचें गुणोत्तर २) असें आहे १०२४ + $\frac{१०२४-२}{२-१}$ = १०२४ + १०२२ = २०४६ हें सर्वधन.

याप्रमाणें वर लिहिल्याशिवाय, भूमितीचा विस्तार आहे तो पुढें बीजगणितांत लिहील.

पूर्वसिद्धांत समजावयाकरितां कांहीं उदाहरणें लिहितो, व भूमिति मध्यप्रमाणा बाबद कित्येक कृत्यें ही सांगतो.

## उदाहरणें.

प्रथम, एक भूमितिश्रेढीमध्यें दाहापदें आहेत, त्यांत अतिलाहान पद १; आणि गुणोत्तर २; तेव्हां मोठें पद आणि सर्वधन काय होईल?

उत्तर अतिमोटेंपद ५१२ आणि सर्वधन १०२३

दुसरें, कोणीएक गृहस्थास कर्ज आहे, तें असें कीं, प्रथम हप्त्यास रुपये १० पुढें दरहप्त्यास दुपटीनें चढते याप्रमाणें दरमहिन्यास हप्ता देतां बारा

महि

महिन्यांत फिटेल; तेव्हां बाराव्ये हस्तास किती रुपये द्यावे पडतील, व सर्व कर्ज किती असेल, तें सांग.

उत्तर शेवट हस्त्यास २०४८० रुपये आणि सर्वकर्ज ४०९५० रुपये.

## प्रथम कृत्य.

कोणत्येही दोन संख्यांचें एक भूमिति मध्यप्रमाण काढायाचें.

त्या दोन संख्या परस्पर गुणाव्या, नंतर त्या गुणाकाराचें वर्गमूळ काढावें, तें भूमिति मध्यप्रमाण होतें.

## उदाहरण,

दोन संख्या ३ आणि १२, यांचें भूमिति मध्यप्रमाण काय?

१२
३
३६ (६ भूमिति मध्यप्रमाण, हें उत्तर.
३६

## दुसरें कृत्य,

कोणत्येही दोन संख्यांचीं दोन भूमिति मध्यप्रमाणें काढायाचें.

मोठी संख्या लाहान संख्येनें भागावी, नंतर, त्या भागाकाराचें घनमूळ काढावें, तें पदांचें गुणोत्तर होईल. तेव्हां सांगीतल्येंलाहान पद, या गुणोत्तरानें गुणावें, तो गुणाकार प्रथम भूमिति मध्यप्रमाण जालें; नंतर हेंच मध्यप्रमाण पुनः गुणोत्तरानें गुणावें, तें दुसरें भूमिति मध्यप्रमाण होईल, अथवा, मोठें पद गुणोत्तरानें भागावें, तो भागाकार मोठें भूमिति मध्यप्रमाण होईल; नंतर तेंच पुनः गुणोत्तरानें भागावें, तो भागाकार लाहान भूमिति मध्यप्रमाण

होईल

होईल.

## उदाहरण,

३ आणि २४ यांचीं दोन भूमितिमध्यप्रमाणें काढावीं.

आतां २४ ÷ ३ = ८ यांचें घनमूळ २ हें पदांचें गुणोत्तर आलें.

तेव्हां ३ × २ = ६, आणि ६ × २ = १२, हीं दोन भूमितिमध्यप्रमाणें निघालीं.

अथवा २४ ÷ २ = १२, आणि १२ ÷ २, = ६ हीं वरचे बराबर आहेत.

ह्मणजे ३ आणि २४ यांचीं मध्यप्रमाणें ६ आणि १२ हीं दोन आहेत.

## तिसरें कृत्य.

कोणत्येही दोन संख्यांचीं हावींतितकीं भूमितिमध्यप्रमाणें काढावयाचें.

मोठी संख्या लाहान संख्येनें भागावी; नंतर मध्यप्रमाणें जितकीं हावीं ती संख्या एकाधिक करून भागाकारास मूळप्रकाशक आणून त्या भागाकाराचें तितकेंघातमूळ काढावें, तें गुणोत्तर आलें. ह्मणजे एकमध्यप्रमाणाकरितां वर्गमूळ, दोनमध्यप्रमाणांकरितां घनमूळ, तीनमध्यप्रमाणांकरितां चतुर्घातमूळ. याप्रमाणें पुढेंही. नंतर लाहानपद त्यागुणोत्तरानें पुनःपुनः गुणावें, अथवा मोठेंपद पुनःपुनः भागावें, ह्मणजे तितकीं मध्यप्रमाणें निघतील.

## उदाहरण.

३ आणि ९६ यादोन संख्यांचीं चार मध्यप्रमाणें काढावीं.

आतां

आतां ९६ ÷ ३ = ३२, याचें पंचघात मूळ २, तें गुणोत्तर आलें. तेव्हां ३ × २ = ६, आणि ६ × २ = १२, आणि १२ × २ = २४, आणि २४ × २ = ४८.

अथवा ९६ ÷ २ = ४८, आणि ४८ ÷ २ = २४, आणि २४ ÷ २ = १२, आणि १२ ÷ २ = ६. ह्मणजे ६, १२, २४, ४८, हींचार ३ आणि ९६ यांचीं इच्छिलीं भूमिति मध्यप्रमाणें आहेत.

---

## सर्कन.

सर्कन ह्मणजे एकरीति आहे, जीणें कोणतीही रास अथवा अवयवी हावे तेवढये भागांत भागतां येईल, जे भाग परस्परांत कोणतेंही सांगितलें प्रमाण ठेवितील.

यारीतीनें व्यवहारांत भाग्यांचा लाभ अथवा हानि किंवा व्यय यथास्थित चुकवितात. अथवा दिवाळ्याचें ऋण आणि धन याची व्यवस्था करितात; अथवा, युद्धांत किंवा दुसर्‍ये कोणत्येकामांत बहुत मनुष्यांनीं एकत्र मिळून जें कांहीं मेळविलें, त्याचे भाग करितात; अथवा, एकादी भूमि बहुकाळ पडीत आहे ती भोंवर गांवांस लागवडी करितां वांटून देणें तर त्या त्या गांवीं मनुष्य समुदाय पाहून त्यांस वांटून देतात.

सर्कन, एकेरी आणि दुहेरी ऐशी दोन प्रकारची आहे. जेव्हां प्रत्येक भाग केवळ कोणत्येही एक संख्येशीं प्रमाणांत आहेत, ह्मणजे भाग्यांचे भाग एक्येच वेळेस कामांत लाविले आहेत, तेव्हां एकेरी; आणि जेव्हां प्रत्येक

भाग

भाग दोन किंवा अधीक संख्यांशीं प्रमाणांत आहेत, ह्मणजे भाग्यांचे भाग भिन्न भिन्न वेळेस कामांत लाविले आहेत, तेव्हां दुहेरी.

## एकेरी सर्कत.

### सामान्य रीति.

जा संख्या भागांचें वेगळालें प्रमाण दाखवितात, त्यांची बेरीज घ्यावी. नंतर याप्रमाणें राशि सांगाव्या.

जशी भागांचें प्रमाण संख्यांची बेरीज.

वांटावयाचे सर्व राशीस होत्ये.

तशी एक एक भागाची प्रमाणसंख्या.

त्यात्या संख्येचें वांट्यास होईल.

अथवा.

असें सगळें भांडवल.

सगळ्ये लाभास अथवा हानीस होतें.

तसें एकेकाचें विशेष भांडवल.

लाभ किंवा हानि याचे त्यात्या विशेष भागास होईल.

ताळा पाहायासाठीं सर्व विशेष भागांची बेरीज घ्यावी, ती सांगीतल्ये वांटायाचे सगळ्ये संख्येचे बरोबर आली ह्मणजे खरी.

## उदाहरणें.

प्रथम, २४० यासंख्येचे तीन भागकर, असेकीं, १,२,३, या संख्या

पर

परस्पर प्रमाणांत आहेत, तसेते परस्पर प्रमाणांत होतील.

एथे १ + २ + ३ = ६, ही प्रमाणसंख्यांची बेरीज.

तर, जसें ६ : २४० : : १ : ४० प्रथम भाग.

आणि जसें ६ : २४० : : २ : ८० दुसरा भाग.

आणि जसें ६ : २४० : : ३ : १२० तिसरा भाग.

सर्वांची बेरीज २४० ताळा.

दुसरें, तीन मनुष्यांनीं दुसऱ्या बंदरीं नेण्याकरितां एके आहाजावर ३४० खंडी धान्य भरिलें; त्या मनुष्यांचीं नावें. अ, ब, क; त्यांत अ ११० खंडी, आणि ब ९७ खंडी, व बाकी राहिलें तें क; पुढें तें जहाज हाकारून चालिलें, तों समुद्रांत तुफान आहालें, तेव्हां ८५ खंडी धान्य टाकावें लागलें, तो तोटा त्या तिघांस बराबर वांटतां कोणास किती येईल.

एथे ११० + ९७ = २०७ खंडी, अ, आणि ब, याणीं भरिलें; याजकरितां ३४० − २०७ = १३३ खंडी, क, याणें भरिलें.

याजवरून, जसें ३४० : ८५ : : ११०

अथवा जसें ४ : १ : : ११० : २७ $\frac{१}{२}$ खंडी = अ, ची हानि.

आणि जसें ४ : १ : : ९७ : २४ $\frac{१}{४}$ खंडी = ब, ची हानि.

आणि जसें ४ : १ : : १३३ : ३३ $\frac{१}{४}$ खंडी = क, ची हानि.

सर्वांची बेरीज ८५ खंडी, ताळा.

तिसरें, दोन सावकार, क, आणि ब, याणीं मिळून १२०० रुपयांचें भांडवल केलें; त्यांत ७५० रुपये क, चे, बाकी ब, चे, पुढें व्यापार करितां ३००

रुपये

रुपये लाभ झाला; तो त्या दोघांस भागप्रमाणें बरोबर वांटून दे

रु. पा. रु. पा.

उत्तर क = १८७ . . २, आणि ब = ११२ . . २,

चवथें, तिघे सावकार, अ, प, ग, यांणीं मिळून ७००० रुपये भांडवल केलें; त्यांत १२३० रुपये अ, चे, ३५८० रुपये प, चे बाकी रुपये गचे; पुढें व्यापारकर्त्या १२५५ रुपये लाभ झाला; तो एक एकास भागप्रमाणें बराबर वांटून दे.

| | | रु. | पा | रे |
|---|---|---|---|---|
| उत्तर | अ = | २२० | २ | ८ $\frac{४०००}{७०००}$ |
| | प = | ६४१ | ३ | ३७ $\frac{१०००}{७०००}$ |
| | ग = | ३९२ | २ | ५४ $\frac{२०००}{७०००}$ |

पांचवें, चार गांव मिळून महसुलाचा ठराव ७००० रुपये केला, त्यांत लागवड जमीन एक गावांत २५० बिघे आहे, व एक गावांत ३५० बिघे आहे, व एक गावांत ४०० बिघे आहे, व एक गावांत ५०० बिघे आहे; तेव्हां कोणत्ये गांवांस बिघेप्रमाणें किती रुपये महसूल देणें पडेल तो सांग.

| | बि. | रु. | पा. | रें. |
|---|---|---|---|---|
| उत्तर | २५० = | ११६६ | २ | ६६ $\frac{१०००}{१५००}$ |
| | ३५० = | १६३३ | १ | ३३ $\frac{५००}{१५००}$ |
| | ४०० = | १८६६ | २ | ६६ $\frac{१०००}{१५००}$ |
| | ५०० = | २३३३ | १ | ३३ $\frac{५००}{१५००}$ |
| | | ७००० | ० | ०० |

साह्या

साहावें, बहुकाळी पडीनभूमि ३७ बिघे, २ पांड, ३ काठ्या, ऐशी तीन गावांस लगत मध्यें आहे, ती त्या तीन भोंवरगावांस वसातीप्रमाणें वांटून द्यावी, ह्मणोन सर्कारची आज्ञा, त्यास वसात एके गावांत ५०० मनुष्यें, एकेगावांत ३२०, एकेगावांत ७५; याप्रमाणें आहे; तेव्हां कोणत्ये गावांस किती भूमि विभाग येईल तो सांग.

| | म. | | बि. |
|---|---|---|---|
| उत्तर | ५०० | = | २०·७३०४४६९ |
| | ३२० | = | १३·२६७४८६० |
| | ७५ | = | ३·१०९५६७० |

सातवें, कोणीएक मनुष्याकडे चार सावकारांचें कर्ज होतें, त्यांत क,चें ५७७ रुपये २ पावले, ख,चें १०८१ रुपये २ पावले, ग,चें २२५ रुपये, घ,चें ७३० रुपये; पुढें तो पळोन गेला, तेव्हां त्याचें यत्किंचित् सामान त्या सावकारांनीं जस करून विकविलें, त्याचे १७०७ रुपये आले; ते त्या सावकारांस दामाशाई प्रमाणें वांटून द्यावयाचे, तेव्हां कोणत्यास किती रुपये वांटा आला तो सांग.

| | | |
|---|---|---|
| उत्तर | ३७७·१२ | क.चा भाग. |
| | ७०६·२४ | ख.चा भाग. |
| | १४६·९ | ग.चा भाग. |
| | ४७६·७ | घ.चा भाग. |

आठवें, मालसुद्धां ९००० रुपये किमतीचें एकगलबत तुफान होउन समुद्रांत बुडालें; त्यांत विभाग र,चा $\frac{१}{८}$, ल,चा $\frac{१}{४}$, बाकी व,चा; त्या गलबताचा विमा ५४०० रुपये केला होता, ते येतील परंतु मूळ किमतींत जी खोट आली

ती

ती कोणावर किती घालावी तें सांग.

| | | |
|---|---|---|
| उत्तर | रु ४५० | र. |
| | ९०० | ल. |
| | २२५० | व. |

नववें, प, फ, ब, भ, ऐसे चार मनुष्य ह्मणीं कोणे कामांत २५० रुपये खर्च केला; त्याचा करार याप्रमाणें, प $\frac{१}{२}$, फ $\frac{१}{३}$, ब $\frac{१}{४}$, भ $\frac{१}{५}$, केला होता; पुढें तो खर्च वांटून घेणें आलें, तेव्हां कोणकोणास किती किती वांटा आला तो सांग.

| | रु. | पा. | रें. | |
|---|---|---|---|---|
| उत्तर | ९७ | १ | ६१ $\frac{३}{७७}$ | प, चे भागास. |
| | ६४ | ३ | ७४ $\frac{२}{७७}$ | फ, चे भागास. |
| | ४८ | २ | ८० $\frac{४०}{७७}$ | ब, चे भागास. |
| | ३८ | ३ | ८४ $\frac{३२}{७७}$ | भ, चे भागास. |

दाहावें, कोणएक किल्ला सांभाळावयाकरितां हुजुरूहून पांच जमाती रवाना केल्या होत्या; त्यांत लोकभरणा एके जमातींत ५४, दुसर्ये जमातींत ५१ तिसर्ये ४८, चवथ्ये ३९, पांचव्ये ३६, याप्रमाणें होता; पुढें त्या किल्याचे चौकीस दरप्रहरास ७६ मनुष्यें लागतात, तेव्हां दरप्रहरास जमातीचे लोकभरण्याप्रमाणें कोणत्ये जमातीनें किती किती मनुष्यें द्यावीं तें सांग.

उत्तर

| | | |
|---|---|---|
| उत्तर | ५४ चे जमातींतील मनुष्यें . | १८ |
| | ५१ . . . . . | १७ |
| | ४८ . . . . . | १६ |
| | ३९ . . . . . | १३ |
| | ३६ . . . . . | १२ |

## दुहेरीसर्कत.

दुहेरी सर्कत, वर सांगीतल्या प्रमाणें अशे प्रकारांत आणवत्ये, जेथें भाग्यांचीं भांडवलें भिन्न भिन्न वेळेस कामांत लाविलीं आहेत.

रीति※. — प्रत्येक मनुष्याचें भांडवल त्याचे त्याचे कामांत भोगल्ये काळानें गुणावें; नंतर तो गुणाकार प्रमाणानें भागावा, जसें एकेरी सर्कतेंत सांगीतलें आहे, ह्मणजे या प्रमाणें राशी होतील.

जसें सर्व गुणाकारांची बेरीज.

सर्वलाभ किंवा हानि किंवा वांटा याचा अवयवी यास आहे.

तसें प्रत्येक विशेष भागाकार.

त्याचे त्याचे विशेष भागास होईल.

---

※ या रीतीची सत्यता या प्रमाणें आहे: जेव्हां काळ बरोबर आहेत, तेव्हां एकेरी सर्कतेंत सांगीतल्या प्रमाणें स्पष्ट आहे कीं, लाभ किंवा हानि याचे भाग भांडवलां प्रमाणें आहेत, आणि जेव्हां भांडवलें बरोबर आहेत, तेव्हां भाग काळा प्रमाणें होतील; या अकरितां जेव्हां दोनही बराबर नाहींत, तेव्हां भाग दोहोंचे गुणाकारां प्रमाणें निश्चय होतील.

उदाहरणें

## उदाहरणें,

प्रथम, दोघानीं सर्कती व्यापार केला, त्यांत भांडवल कचें ५०० रुपये, त्यास ४ महिने आले; आणि गचे ६०० रुपये त्यास ५ महिने आले, त्या सर्कत व्यापारांत नफा २४० रुपये आला; तो दोघांस भागाप्रमाणें कसा वांटून द्यावा तें सांग.

| | क. | | ग. | |
|---|---|---|---|---|
| एथे | ५०० | | ६०० | |
| | ४ | | ५ | |
| | २००० | + | ३००० | = ५००० |

तर असें ५००० : २४० :: २००० : ९६ रु० कच्या नफा.

आणि असें ५००० : २४० :: ३००० : १४४ रु० गच्या नफा.

दुसरें, च, आणि ज, या दोघांनीं एक कुरण घोडीं चारावयाकरितां मखता ठरावून घेतलें, मखता ५४० रुपये; त्या कुरणांत चचीं २३ घोडीं २७ दिवस चरलीं, आणि जचीं २१ घोडीं ३९ दिवस चरलीं, मखत्याचे रुपये दोघांनीं किती किती द्यावे ते सांग.

| | | रु. | पा. | रें. |
|---|---|---|---|---|
| उत्तर | च, | २३२ | ३ | ५० |
| | ज, | ३०७ | ० | ५० |

तिसरें, प, फ, ब, या तिघांनीं गाई चारावयाशि कुरण घेतलें. त्याचें देणें एक वर्षाचें ३०० रुपये, त्यांत पचा ७ गाई ३ महिने, फचा ९ गाई ५ महिनें, आणि बचा ४ गाई १२ महिने, याप्रमाणें चरल्या; तेव्हां ३०० रुपये देणें

त्याचा

त्याचा विभाग कोणी किती घावा तो सांग.

| | | रु. | पा. | रे. | |
|---|---|---|---|---|---|
| उत्तर | प | ५५ | १ | ५ | $\frac{३०}{११४}$ |
| | फ | ११८ | १ | ६८ | $\frac{४८}{११४}$ |
| | ब | १२६ | १ | २६ | $\frac{३६}{११४}$ |

चवथें, कोणी एक किल्ला फौजेनें हल्ला करून घेतला, तेसमयीं तेथें १०००० रुपये मिळाले, ते फौजेंत दरमहा दर आसामीस २० रुपये ऐसे ४ जमानदार ६ महिने चाकरी करीत होते; व दरमहा दर आसामीस १५ रुपये ऐसे १२ हवालदार ६ महिने चाकरी करीत होते; व दरमहा दर आसामीस ११ रुपये ऐसे ११० शिपाई ३ महिनें चाकरी करीत होते; पुढें सर्कारचा हुकुम आला कीं, ते रुपये त्या फौजेस आसामी तैनात चाकरीची मुदत योग्यतेप्रमाणें बरोबर वांटून द्यावे ह्मणोन, त्यास कोण कोणास किती किती येतात तें सांग.

| | रु. | पा. | रे. | | |
|---|---|---|---|---|---|
| उत्तर | ९२४ | ३ | ४२ | $\frac{१०२०}{५१९०}$ | जमानदार आसामी ४ त्यांचा वांटा. |
| | २०८० | ३ | ६९ | $\frac{४८९०}{५१९०}$ | हवालदार आसामी १२ त्यांचा वांटा. |
| | ६९९४ | ० | ८७ | $\frac{४४७०}{५१९०}$ | शिपाई आसामी ११० त्यांचा वांटा. |

पांचवें, चैत्रशुद्ध प्रतिपदेस १०००० रुपये भांडवल करून, हनें व्यापार आरंभिला; नंतर ज्येष्ठशुद्ध प्रतिपदेस त्या व्यापारांत १५००० रुपये भांडवल देउन, क, सर्कती मिळाला; नंतर भाद्रपदशुद्ध प्रतिपदेस त्याच व्यापारां

त

रांत २८००० रुपये भांडवल देउन, ग, सर्कती आला; याप्रमाणें तिघांचा सर्कती व्यापार चालला; पुढें वर्षांतीं हिंशेबकर्ता १७७६५ रुपये नफा आला, तो भागप्रमाणें तिघांस बरोबर वांटून दे.

| | | रु. | | पा. | | रें. | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| उत्तर | हच्या वांटा | ४५७४ | .. | २ | .. | ७१ | $\frac{२१४}{७६६}$ |
| | कच्या वांटा | ५७१८ | .. | १ | .. | ३९ | $\frac{२६}{७६६}$ |
| | गच्या वांटा | ७४७१ | .. | ३ | .. | ८९ | $\frac{३२६}{७६६}$ |

साहावें, र, ल, व, या तिघांनीं १ वर्ष सर्कतीनें व्यापार केला. त्यांत आरंभींच रनें २०० रुपये दिल्हे, पुढें चार महिने आउुन २०० रुपये दिल्हे; तसें लनें आरंभीं ३०० रुपये दिल्हे, पुढें ३ महिने गेल्यावर २०० रुपये दिल्हे, नंतर २ महिने गेल्यावर पुनः ४०० रुपये दिल्हे; तसे वनें आरंभीं ६०० रुपये दिल्हे, पुढें ५ महिने गेल्यावर १०० रुपये दिल्हे, नंतर १ महिना गेल्यावर १०० रुपये माघारे घेतले; याप्रमाणें वर्ष पुरें आल्यानंतर हिंशेबीं ५०० रुपये नफा आला, तो त्या तिघांस भागप्रमाणें बरोबर वांटून दे.

| | | रु. | | पा. | | रें. | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| उत्तर | रच्या वांटा | १०२ | .. | २ | .. | २५ | $\frac{१२५}{१९५}$ |
| | लच्या वांटा | २१० | .. | १ | .. | २ | $\frac{११०}{१९५}$ |
| | वच्या वांटा | १८७ | .. | ० | .. | ७१ | $\frac{१५५}{१९५}$ |

व्याज

## व्याज

व्याज ह्मणजे पैका उधार देणें किंवा धिरणें याजवर वृद्धीचा नियम आहे. जो पैका उधार देतात किंवा धिरतात, त्यास मुद्दल ह्मणतात; आणि व्याज व मुद्दल यांचे बेरिजेस रास ह्मणतात. व्याज शेंकड्याप्रमाणें वर्षावर अथवा महिन्यावर किंवा दिवसावर ठरवितात, परंतु बहुतकरून वर्षावरच, त्यास व्याजाचा दर ह्मणतात :— जसें

जेव्हां व्याज शेंकड्यास ३ आहे, तेव्हां दर ३ चा ह्मणतात.

. . . शेंकड्यास ४ आहे, . . . ४ चा ह्मणतात.

. . . शेंकड्यास ५ आहे, . . . ५ चा ह्मणतात.

. . . शेंकड्यास ६ आहे, . . . ६ चा ह्मणतात.

व्याज दोन प्रकारचें आहे, सरळ आणि चक्रवाढ.

सरळ व्याज तेंच आहे, जें आल्येमुदतीचें दराप्रमाणें मुद्दलावर मात्र व्याज होतें. कोणत्येही पैक्याचें व्याज, कोणत्येही वेळेंत, मुद्दल पैका आणि त्याचा काळ यांशिं समप्रमाणांत आहे; याजवरून त्यांचा हिंसाब करायास ही पुढील सामान्यरीति उत्पन्न आली आहे.

जसें १०० रुपये व्याजाचे दरास आहेत, तसें कोणतें ही सांगीतलें मुद्दल त्याचे एक नियम काळाचे व्याजास होईल. आणि पुनः

जसें एक नियमकाळ, कोणत्येही सांगीतल्ये काळास आहे, तसें वर उत्पन्न आलेलें एकनियमकाळाचें व्याज, सांगीतल्ये सर्वकाळांचे व्याजास होईल.

अथवा

अथवा, एकरुपयाचें एकनियमकाळाचें व्याज घेउन त्याणें सांगीतलें मुद्दलगुणावें, आणि तो गुणाकार उधार दिल्हेले किंवा धिरलेल्ये पैक्याचे नियमकाळानें गुणावा, ह्मणजे हा गुणाकार त्या काळाचें इछिलें व्याज होईल.

पाहा. जेव्हां काळामध्यें वर्षाचे कांहीं अवयव आहेत, जसें अर्धवर्ष, पाववर्ष, महिना, अथवा दिवस, तेव्हां त्याचें व्याज वर्षाचें व्याज भागून होईल, अथवा त्रिराशिरीतीनें होईल.

## उदाहरणें.

प्रथम, मुद्दलरुपये २३०५ याशि व्याज दरसाल दरशेंकडा रुपये ४ प्रमाणें एकवर्षाचें व्याज किती रुपये होतील तें सांग.

```
जसें  १०० : ४ :: २३०५ :
                   ४          रु
        १००) ९२२०·०(९२·२
             ९००           ४
             ·२२०          ·८
              २००         १००
              ·२००    रें  ८००
               २००
               ···

        रु.      पा.      रें.
        ९२ ··    ० ··    ८०   एक वर्षाचें व्याज हें उत्तर
```

दुसरें, मुद्दल रुपये ५४७७ ·· २ पावले याशि व्याज दरसाल दरशेंकडा रुपये ५ प्रमाणें तीनवर्षाचें व्याज किती रुपये होतील तें सांग.

जसें

जसें १०० : ५ : : ५४७७.५ :

अथवा २० : १ : : ५४७७.५ :

```
                    १
२०) ५४७७.५०० ( २७३.८७५  व्याज १ वर्षाचें
    ४०                 ३
    १४७        रु  ८२१.६२५  तीन वर्षांचें
    १४०                ४
    ..७७       पा  २.५००
      ६०                १००
      १७५      रें  ५०.०००
      १६०
      .१५०
       १४०
       .१००
        १००
        ...
```

रु पा रे
८२१ : : २ : : ५० हें उत्तर

तिसरें, मुद्दल रुपये २१०० याशि व्याज दरसाल दरशेंकडा रुपये ४ $\frac{१}{२}$ प्रमाणें ४ वर्षें ७ मास २५ दिवस, याचें व्याज किती रुपये होतील तें सांग.

जसें १०० : ४·५ :: २१०० :

४५

१०५००

८४००

१००) ९४५०·० ( ९४·५ एक वर्षाचें व्याज.

९००                ४

·४५० रु ३७८·० चार वर्षांचें.

४००

·५०० ४७·२५ साहामास.

५०० ७·८७५ एकमास.

··· ६·४७२ पंचवीसदिवस.

रु ४३९·५९७

४

पा २·३८८

१००

रें ३८·८००

अथवा

जसें ३६५ : ९४·५ :: २५ :

२५

४७२५

१८९०

३६५) २३६२·५०० ( ६·४७२

२१९०

·१७२५

१४६०

·२६५०

२५५५

··९५०

७३०

२२०

रु पा रें

४३९ .. २ .. ३८·८ हें उत्तर.

चवथें, मुद्दल ४५०० रुपये यांचें १ वर्षाचें व्याज दरशेंकडा दरसाल ५ रुपये प्रमाणें किती रुपये होतील तें सांग.

२२५ रुपये हें उत्तर.

पांचवें, मुद्दल ७१५६ रुपये १ पावला याचें १ वर्षाचें व्याज दरशेंकडा दरसाल ४ रुपये २ पावले प्रमाणें किती रुपये होतील तें सांग.

रु पा रें
३२२ .. ० .. १२ $\frac{1}{2}$ हें उत्तर

साहावें, मुद्दल ७२०० रुपयांचें ३ वर्षांचें व्याज दरशेंकडा दरसाल ५ रुपये प्रमाणें किती रुपये होतात तें सांग.

१०८० रुपये हें उत्तर.

सातवें, मुद्दल ३५५७ रुपये २ पावले याचें ४ वर्षांचें व्याज दरशेंकडा दरसाल ४ रुपये प्रमाणें किती रुपये होतात तें सांग.

रु पा रें
५६९ .. ० .. ८० हें उत्तर.

आठवें, मुद्दल ३२२ रुपये २ पावले ८० रेंस याचें दरशेंकडा दरसाल ४ रुपये १ पावला प्रमाणें किती रुपये व्याज आहालें तें सांग.

रु पा रें
९५ .. ३ .. ९५ हें उत्तर

नववें, मुद्दल १७०० रुपये यांचें १ $\frac{1}{2}$ दीढ वर्षाचें व्याज दरशेंकडा दरसाल ५ रुपये प्रमाणें किती रुपये होतात तें सांग.

रु. पा
१२७ .. २ हें उत्तर.

दाहावें, मुद्दल २००० रुपये याचें व्याज दरशेंकडा दरसाल ४ रुपये प्रमाणें $\frac{1}{4}$ पाववर्षाचें किती रुपये होतील तें सांग.

उत्तर

२० रुपये हें उत्तर.

अकरावें, मुद्दल ३९०० रुपये याचें ५ $\frac{1}{2}$ वर्षांचें व्याज दरशेंकडा दरसाल ३ रुपये २ पावले प्रमाणें किती रुपये होतात ते सांग.

रु पा रें
८४० .. २ .. ७५, हें उत्तर.

बारावें, मुद्दल ११६०० रुपये यांचें दरशेंकडा दरसाल ४ रुपये ३ पावले प्रमाणें ११७ दिवसांचें व्याज किती रुपये होतात तें सांग, साल ह्मणजे ३६५ दिवस.

रु पा रें
२६७ .. ३ .. ९१ हें उत्तर.

---

## चक्रवाढ व्याज.

चक्रवाढ व्याज, जासही व्याजावर व्याज ह्मणतात, तें तेंच आहे, जें मुद्दल आणि व्याज प्रत्येक नियम काळाचे अंतीं एकत्र मिळल्यापासून उत्पन्न होतें.

प्रथम रीति, प्रथम नियमकाळाचे अंतीं सांगितल्ये मुद्दलाचें व्याज सरळ व्याजाचे रीतीप्रमाणें करावें; नंतर तें व्याज व मुद्दल एकत्र मेळवावें; आणि ती बेरीज नवें मुद्दल जाह्मलें, नंतर पुनः नियमकाळाचे अंतीं त्या बेरिजेचें व्याज सरळ व्याजाचे रीती प्रमाणें करावें. आणि तें व्याज व ती पूर्व बेरीज पुनः नवें मुद्दल जाहालें. याप्रमाणें प्रतिनियमकाळाचे अंतीं करीत जावें. ह्मणजे चक्रवाढ व्याज होईल.

दुसरी रीति, एक रुपयाचें व्याज प्रथम नियमकाळाचे अंतीं

काय

काच आहालें तें काढावें, आणि त्यास तो मुद्दल १ रुपया मिळवावा; नंतर त्याचा घात करावा असाकीं ज्याचा प्रकाशक नियमकाळांची संख्या होईल; मगतो घात मुद्दलानें गुणावा, तो गुणाकार रास ह्मणजे व्याजासुद्धां मुद्दल आलें. कदाचित् व्याजच हावेंतर राशींत मुद्दल वजा करावें, बाकी राहील तें व्याज आहालें.

## उदाहरणें.

प्रथम, ७२०० रुपये मुद्दल यास व्याज दरसाल दरशेंकडा पांचोत्रा प्रमाणें ४ वर्षांत रास किती होईल तें सांग.

एथे ५ हा १०० याचा २० वा भाग आहे, आणि १ रुपयाचें व्याज १ वर्षांत $\frac{१}{२०}$ आहे, अथवा ·०५, आणि त्याचीरास १·०५ आहे, याजकरितां

### प्रथमरीतीप्रमाणें,

| | रु | पा | रें | |
|---|---|---|---|---|
| २० ) | ७२०० | ० | ० | प्रथम वर्षाचें मुद्दल. |
| | ३६० | ० | ० | प्रथम वर्षाचें व्याज. |
| २० ) | ७५६० | ० | ० | दुसर्ये वर्षाचें मुद्दल. |
| | ३७८ | ० | ० | दुसर्ये वर्षाचें व्याज. |
| २० ) | ७९३८ | ० | ० | तिसर्ये वर्षाचें मुद्दल. |
| | ३९६ | ३ | ६० | तिसर्ये वर्षाचें व्याय. |
| २० ) | ८३३४ | ३ | ६० | चौथ्ये वर्षाचें मुद्दल. |
| | ४१६ | २ | ९५ | चौथ्ये वर्षाचें व्याज. |
| | ८७५१ | २ | ५५ | रास किंवा इछिलें उत्तर. |

रु पा रें
८७५१ .. २ .. ५५ हें उत्तर.

दुसर्ये

दुसऱ्ये रीती प्रमाणें.

| | |
|---|---|
| १·०५ | एक रुपयाची रास |
| १·०५ | |
| १·१०२५ | वर्ग |
| १·१०२५ | |
| १·२१५५०६२५ | चतुर्घात |
| ७२०० | |
| ·२४३१०१२५००० | |
| ८५०८५४३७५०० | |
| रु ८७५१·६४५ | |
| ४ | |
| पां २·५८० | |
| १०० | |
| रें ५८००० | |

रु पा रें
रास ८७५१ .. २ .. ५८ हें उत्तर.

दुसरें, ५०० रुपये मुद्दल व्याज दरसाल दरशेंकडा पांचोंप्रमाणें वर्षे ५ आलीं रास काय होईल तें सांग.

रु पा रें
उत्तर ६३८ .. ० .. ५६.

तिसरें, ५०० रुपये मुद्दल व्याज वरप्रमाणें वर्षे ५ आलीं. परंतु मुदत अर्ध अर्ध वर्षाची तेव्हां १० मुदती आल्या त्याची रास काय होईल तें सांग.

रु पा रें
उत्तर ६४० .. ० .. १६·९५९८.

चौथें, उदाहरण पूर्वींचेंच मुदत ३ तीन महिन्याची. तेव्हां २० मुदती आल्या व्याज काय होईल तें सांग.

रु पा रें
उत्तर ६४१ .. ० .. ७·४४५२.

पांच

पांचवें, ३७०० रुपये मुद्दल. वर्षे ६ आलीं दरसाल दरशेंकडा व्याज ४ रुपये प्रमाणें रास काय होईल तें सांग.

| | रु | पा | रें |
|---|---|---|---|
| उत्तर | ४६८१ | २ | ७३.१४ |

साहावें, ८१०० रुपये मुद्दल वर्षे २$\frac{१}{२}$ आलीं दरसाल दरशेंकडा व्याज ४$\frac{१}{२}$ रुपये प्रमाणें मुदत $\frac{१}{२}$ वर्षाची रास काय होईल तें साग.

| | रु | पा | रें |
|---|---|---|---|
| उत्तर | ९०५३ | ० | ७५.७२४०२४ |

सातवें, २१७० रुपये मुद्दल वर्षे २$\frac{१}{४}$ आलीं दरसाल दरशेंकडा व्याज ५ रुपये प्रमाणें मुदत $\frac{१}{४}$ पाववर्षाची रास काय होईल तें सांग.

| | रु | पा | रें |
|---|---|---|---|
| उत्तर | २४१७ | ० | २.७०४ |

---

## मिश्रगणित.

मिश्रगणित म्हणजे वेगळाल्या जातींचे शुद्ध पदार्थ एकत्र मिश्र केले, असे कीं, त्या मिश्राची किमत त्यांचे वेगळाल्ये किमतीचे मध्यें होईल, ती काढायाची रीती दोन आहेत. एक मध्यमिश्रगणित आणि दुसरें व्युत्क्रम मिश्रगणित.

### मध्यमिश्रगणित.

मध्यमिश्रगणित म्हणजे मिश्रपदार्थांचा दर काढायाची रीति आहे, जेव्हां प्रत्येक शुद्धपदार्थांचे दर आणि परिमाणें सांगीतलीं आहेत.

रीति

## रीति

* प्रत्येक शुद्ध पदार्थांचीं परिमाणें त्यांचे त्यांचे दरानें वेगळालीं गुणावीं; नंतर या सर्व गुणाकारांची बेरीज घ्यावी, आणि दुसरी शुद्ध पदार्थांचे परिमाणांची बेरीज घ्यावी; नंतर प्रथम बेरीज दुसर्‍यें बेरिजेनें भागावी, ह्मणजे, गुणाकारांची बेरीज परिमाणाचे बेरिजेनें भागावी, भागाकार येईल तो त्या मिश्र राशीचा इच्छिला दर परिमाण भाव होईल.

## उदाहरणें.

प्रथम, तीन जातींची शुद्ध साकर एकत्र मिळोन मिश्रराशि आली आहे. त्यांत ५० शेर दरशेरीं १२ पैसे दराची, तसें ४४ शेर दरशेरीं ९ पैसे दराची, आणि २६ शेर दरशेरीं ८ पैसे दराची, ऐसे वेगळाले भाव होते. आतां त्या मिश्र राशीस दरशेरीं काय भाव होईल.

---

* प्रतिपाद्य या रीतीची सत्यता बीजगणितापासून यापुढिला प्रमाणें निघत्ये.

अ, ब, क, हीं तीन अक्षरचिन्हें वस्तूंचीं वेगळालीं परिमाणें दाखवायास घे.

आणि म, न, प, हीं तीन अक्षरचिन्हें त्यांचे प्रत्येकीं दर दाखवायास घे.

तर अम, बन, कप, हे त्या तीन राशींचे वेगळाले भाव आहेत.

आणि अम + बन + कप, ही त्या वेगळाल्ये तीन राशींचे भावांची बेरीज आहे,

पुनः अ + ब + क ही त्या तीन राशींचे वेगळाल्ये परिमाणांची बेरीज आहे.

आतां अरर. सर्व मिश्रराशींचा भाव दाखवितो.

तर (अ + ब + क) × र, ही सर्व मिश्रराशीची किमत होईल.

याजकरितां (अ + ब + क) × र, = अम + बन + कप.

आणि $र = \frac{अम + बन + कप}{अ + ब + क}$ ह्मणजे हीच रीति आहे.

आतां

आतां ५०, ४४, २६, हें परिमाण आहे, तर ५०×१२ = ६००
४४× ९ = ३९६
२६× ८ = २०८

आणि १२, ९, ८ हा भाव आहे, १२० )१२०४( १० $\frac{४}{१२०}$ = १० $\frac{१}{३०}$

उत्तर १० $\frac{१}{३०}$ पैसे हा मिश्रराशीचा दरशेरीं भाव.

दुसरें, एक चाहा पौंड ५ दर पौंडीं भाव ७ शिल्लिंग, दुसरा चाहा पौंड ९ दर ८ शिल्लिंग ६ पेन्स, आणि तिसरा चाहा पौंड १४ $\frac{१}{२}$ दर ५ शिल्लिंग १० पेन्स प्रमाणें ऐसा तीन प्रकारचा एकत्र केला तर त्यामिश्रास दर पौंडीं भाव काय होईल.

उत्तर ६ शिल्लिंग १० $\frac{१}{२}$ पेन्स.

तिसरें, एक आतीचें तेल ग्यालंन ४ दर ग्यालंनीं भाव ४ शिल्लिंग १० पेन्स, दुसरें तेल ग्यालंन ७ दर ५ शिल्लिंग ३ पेन्स, आणि तिसरें तेल ग्यालन ९ $\frac{३}{४}$ दर ५ शिल्लिंग ८ पेन्स प्रमाणें ऐसें एकत्र केलें तर त्यामिश्रास दर ग्यालंनीं भाव काय होईल.

उत्तर ५ शिल्लिंग ४ $\frac{१}{४}$ पेन्स.

चवथें, कोणी फडयानें एक जातीचे गहुं १० बुशिल दर बुशिलीं भाव ५ शिल्लिंग, दुसरे गहुं १८ बुशिल दर ३ शिल्लिंग, आणि तिसरे गहुं २० बुशिल दर २ शिल्लिंग प्रमाणें ऐंसे एकत्र केले तर त्यामिश्रास दर बुशिलीं भाव काय होईल.

उत्तर ३ शिल्लिंग.

पांचवें, कोणी दुकान दारानें एक जातीचें पीठ बुशिल ३ दर बुशिलीं

भाव

भाव ३ शिल्लिंग ५ पेन्स, तसें दुसर्यें आनीच्यें बुशिल ४ दर ५ शिल्लिंग ६ पेन्स, आणि तिसर्यें आनीच्यें बुशिल ५ दर ४ शिल्लिंग ८ पेन्स प्रमाणें ऐसें एकत्र करून विकुं लागला तर त्या मिश्रराशीस दर बुशिलीं काय भाव होईल.

उत्तर ४ शिल्लिंग ७ $\frac{१}{२}$ पेन्स.

साहावें, सोनें ७ औंस २२ क्यारेंकूट* चांगलें, तसें १२ $\frac{१}{२}$ औंस २१ क्यारेकूट चांगलें, आणि १७ औंस १९ क्यारेकूट चांगलें, ऐसें एकत्र आटिलें तर त्या मिश्रसोन्यास किती क्यारेकूट चांगलें भावलागेल.

उत्तर २० $\frac{१९}{७३}$ क्यारेकूट चांगलें.

सातवें, रुपें ३ पौंड ९ औंस* शुद्ध तसें ५ पौंड ८ औंस यांत १० औंस शुद्ध आणि १ पौंड १० औंस हीण ऐसें एकत्र आटिलें तर त्या मिश्रास किती औंस शुद्ध भाव लागेल

उत्तर ७ $\frac{६१}{६३}$ औंस शुद्ध.

---

* जर, १ औंस अथवा दुसरें कोणतेंही सोन्याचें परिमाण भर शुद्ध सोनें आहे, तर त्याचे बरावर २४ भाग केले, त्यांस प्रत्येकीं क्यारेकूट ह्मणतात; तसें रुप्याचे भागांस औंस ह्मणतात. परंतु बहुत करून सोनें रुपें या धातू दुसर्यें हीन धातूशीं मिश्र असतात, ज्यास हीण ह्मणतात, आणि या मिश्रसोन्यास इतके क्यारेकूट सोनें ह्मणतात, जसें मिश्रांत शुद्ध सोनें आहे;

जसें जर २२ क्यारेकूट शुद्ध सोनें आणि दोन क्यारेकूट हीण एकत्र मिळविलें तर या मिश्रास २२ क्यारेकूट शुद्ध सोनें ह्मणतात.

जर मिश्रांत मिळाल्ये वेगळाल्ये पदार्थांत एक हीन दुसर्यें शुद्धांत मिळाला आहे, तर तो हीन पदार्थ अतिहलका ह्मणोन त्याचा भाव शून्य गणितात.

जसा पाण्याचा भाव० शून्य होतो, जेव्हां दुधांत मिश्रित आलें, तसा हीणाचा भाव० शून्य होतो, जेव्हां तें सोनें रुपें इत्यादिक उत्तम धातूंत मिश्रित आलें.

आठवें

आठवें, तीनजातींचें तूप मण ५, ९, १४ १/२ दरमणीं भाव रुपये १०, ९ १/४. ८ १/२ ऐसें एकत्र केलें त्यामिश्रास दरमणीं किती रुपये पडतील.

उत्तर ९ रुपये.

नववें, तीनजातींचें दूध शेर ४, ७, ९ ३/४ दरशेरीं पैसे ६, ५, ४ १/२ ऐसें एकत्र केलें त्यामिश्रास दरशेरीं किती पैसे पडतील.

पै. रें.
उत्तर ४ .. ७·६.

दाहावें, एकफडयानें तीन प्रकारचे गहुं मण १०, १८, २० दरमणीं रुपये ५, ३, २ याभावाचे एकत्र केले तर त्यामिश्रराशीस दरमणीं किती रुपये पडतील.

उत्तर ३ रुपये.

अकरावें, कोणी दुकानदारानें तीनजातींचें पीठ मण ३, ४, ५ दरमणीं रुपये ३ ३/४, ३, २ १/२ यादरानें एकत्र केलें तर त्यामिश्रास दरमणीं किती रुपये पडतील.

रु पा रें
उत्तर ३ .. २ .. ११·६.

बारावें, सोनें तोळे ७, १२ १/२, १७ त्याचे अनुक्रमें कस १८, १६, १४ १/२ ऐसें एकत्र आटिलें तर त्यामिश्रास कस कायलागेल.

उत्तर १५ ५०/७३ कस.

तेरावें, सोनें तोळे २१, ३२, ३९ १/२ त्याचे कस १८, १६, १५ ऐसें एकत्र आटिलें तर त्यामिश्रास कस काय लागेल.

उत्तर १६ २/३७ कस.

---

व्युत्क्रम

## व्युत्क्रम मिश्र गणित.

व्युत्क्रम मिश्रगणित ह्मणजे अनेक सांगीतल्ये भावाचे अनेक शुद्ध पदार्थ एकत्र मिश्र केले, तर त्या मिश्रास सांगीतला भाव व्हावा, तेव्हां मिश्र करायास कोणत्ये भावाचे पदार्थ किती किती परिमाणानें घ्यावे, तें काढायाची रीति आहे, हीरीति मध्यमिश्ररीतीचे उलट आहे, ह्मणोन याचा ताळा मध्यमिश्ररीतीनें निघतो.

### प्रथमरीति.*

शुद्ध पदार्थांचे भाव एकाखालीं एक येतील असे लिहावे — २ इछिल्ये मिश्रभावाहून जे शुद्धपदार्थांचे भाव उणे असतील त्यांस प्रत्येकीं मिश्रभावा

---

* सिद्धांत, उणाभाव अधिकभावास जोडून आणि त्याचा प्रत्येकीं इछिल्ये भावांशीं वजाबाक्या त्यात्या भावांसमोर व्युत्क्रमानें लिहून जें परिमाण निघतें, तें असें आहे कीं, उण्ये भावाचे परिमाणांवर जितका नफा येतो तितकाच अधिक भावांचे परिमाणांवर तोटा आहे, याजकरितां सर्वपरिमाणांवर नफा तोटा होईल, तो बरोबर, ह्याच इछिलाभाव आहे, याचप्रमाणें अनेक शुद्धपदार्थ मिश्र केले तरी ही आणावे.

यारीतीनें कितीही शुद्धपदार्थ कित्येक शुद्धपदार्थांशीं जोडिले असतील ह्मणंजे सर्वदा इष्टभावाहून उणे असतील ते अधिकांशीं जोडिले जातील, तरीं ही प्रत्येक युग्माचा नफा तोटा पूर्वप्रमाणें बराबर होईल, आणि याजकरितां सगळयाचा नफा तोटा बरोबर होईल हें सिद्ध.




यारीतीपासून कळतें कीं या जातीचे प्रश्नांस अनेक उत्तरें निघतील कारण, एक उत्तर काढिल्यानंतर इछेप्रमाणें ह्यावींतितकीं

हून

हून अधिक असतील त्यांशीं अखंड रेघांकरून जोडावे; आणि याचरीतीनें प्रत्येक अधिकास प्रत्येक उण्यांशीं मिळवावे, – ३ मिश्रभाव आणि प्रत्येक शुद्धभाव यांचा वजाबाक्या ह्मणजे अंतरें तीं शुद्धभाव ज्यांशीं जसे मिळविले आहेत, त्यांचे त्यांचे समोर लिहावीं, नंतर एकच वजाबाकी त्या भावाचे समोर आली तर तीच त्या राशीचें परिमाण होईल, आणि अनेक वजाबाक्या आल्यातर त्यांची बेरीज त्या राशींचें परिमाण होईल.

प्रत्येक उदाहरणाचा ताळा मध्यमिश्ररीतीनें निघतो.

## उदाहरणें.

प्रथम कोणीएक सावकार १६, १८, २२ रुपये खंडी ऐसे तीनजातींचे चणे एकत्रकरून मिश्रराशि २० रुपये खंडी याभावानें विकायास इछितो तर त्याणें तीनजातीचे चणे वेगळाले किती किती परिमाणानें घ्यावे ह्मणजे मिश्रराशीस इछिला भाव पडेल.

---

यारीतीनें निघतील, तीरीति, वेगळाल्ये काढिल्ये परिमाणांस २ किंवा ३ अथवा ४ इत्यादिकानें गुणून किंवा भागून, याचें कारण उघड आहे, जर दोन शुद्धपदार्थांचीं परिमाणें मध्य भावाशीं नफा तोटा बराबर करितील, तर त्यांचे दुपटीशीं किंवा तिपटीशीं ही, याप्रमाणें अनंतपट पर्यंत.

या जातीचे प्रश्नांस बीजगणित आणणारे अनंत कृत्य ह्मणतात, आणि आपासून जितकीं उत्तरें निघतील तितकीं काढायाचा सिद्धांत बीजगणितरीतीनें करितां येतो.

एथें

| | | | |
|---|---|---|---|
| रु २० | १६ | २ खंडी १६ चे भावाचे. | तर २ × १६ = ३२ |
| | १८ | २ खंडी १८ चे भावाचे. | २ × १८ = ३६ |
| | २२ | ४ + २ = ६ खंडी २२ चे भावाचे. | ६ × २२ = १३२ |
| | | | खं १० रु २०० |

याचा ताळा मध्यमिश्ररीतीनें.

२, २, ६ खंडी हीं परिमाणें.

१६, १८, २२ रुपये हे भाव.

दुसरें, कोणी दुकानदार ४ आणि ६ रुपये मण असें दोन भावांचें तेल मिश्रकरून ५ रुपये मण या भावानें विकायास इच्छितो, तर त्याणें मिश्रकरायास दोन जातींचें तेल प्रत्येकीं किती किती परिमाणानें घ्यावें.

उत्तर १ खंडी मण किंवा शेर.

तिसरें, कोणी दुकानदार ४, ६, ११ पैसे शेर अशी तीन भावांची साकर एकत्र मिश्रकरून ७ पैसे शेर याभावानें विकायास इच्छितो तर त्याणें मिश्रकरायास प्रत्येक भावांची साकर किती किती परिमाणानें घ्यावी.

उत्तर १ शेर किंवा मण किंवा खंडी.

चवथें, कोणी दुकानदार दरबुशिल २ शिलिंग ६ पेन्स, ३ शिलिंग ८ पेन्स, ४ शिलिंग, आणि ४ शिलिंग ८ पेन्स, असे चार भावांचे गहुं एकत्र मिश्रकरून दरबुशिल ३ शिलिंग १० पेन्स, याभावानें विकायास इच्छितो, तर त्याणें मिश्रकरायास कोणकोणते गहुं किती किती परिमाणानें घ्यावे.

उत्तर

उत्तर २ शि० ६ पे० यादराचे २ बु०, २ शिं० ८ पे० या०चे २ बु, ४ शि० या०चे ३ बु, आणि ४ शि० ८ पे० या०चे ३ बुशल.

पांचवें, कोणी सोनार १६, १८, २३, २४ क्यारेकूट चांगलें यादरांचें सोनें एकत्र आटून मिश्र सोनें २१ क्यारेकूट चांगलें करायास इछितो तर त्याणें कोणकोणतें सोनें किती किती परिमाणानें घ्यावें.

उत्तर १६ क्यारेकूटचें ३ भाग, १८चें २ भाग, २३चें ३ भाग, आणि २४चें ५ भाग.

साहावें, कोणी दुकानदार मध १२ रुपये मण, राब १० रुपये मण, काकवी १ रुपया मण आणि पाणीं ० रुपये मण, ऐशीं एकत्र मिश्र करून त्या मिश्रास दरमणीं ८ रुपयांचा भाव व्हावा असें इछितो तर त्याणें प्रत्येक काय काय परिमाणानें घ्यावीं.

उत्तर मध १५, राब १५, काकवी ६, आणि पाणीं ६ मण.

---

## दुसरी रीति.

जेव्हां मिश्राचें परिमाण सांगीतलें आहे, पूर्वी सांगीतल्ये जोडण्याचे रीतीकरून उत्तर काढावें, नंतर याप्रमाणें प्रमाणराशी कराव्या, जशी परिमाणांची बेरीज : सांगीतल्ये परिमाणास आहे : : तसे जोडण्याचे रीतीनें काढिलेले शुद्धपदार्थ : प्रत्येकांचे इछिल्ये परिमाणास होतील.

## उदाहरणें.

प्रथम, सोनें १५, १७, १८, २२ क्यारेकूट चांगलें एकत्र आटायाचें आहे

आहे, असेंकीं, तें मिश्र ४० तोळे २० क्यारेकुट चांगलें होईल, तर वेगळालें त्या त्या जातींचें किती तोळे घ्यावें.

आतां २० { १५, १७, १८, २२

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | . . . २ | जसे | १६ : ४० :: २ : ५ |
| १७ | . . . २ | | १६ : ४० :: २ : ५ |
| १८ | . . . २ | | १६ : ४० :: २ : ५ |
| २२ | ५ + ३ + २ = १० / १६ | | १६ : ४० :: १० : २५ |

उत्तर १५ चें ५, १७ चें ५, १८ चें ५, आणि २२ चें २५ तोळे.※

※ यास्थळीं धातूंचे स्वभारावर अनेक प्रश्न सांगतां येतील, परंतु त्यांतून बहुचमत्कारी एकच प्रश्न पुरे.

हैईरो यानामें सैराक्युसचा पाछाय होता, त्याणें, सगळा शुद्ध सोन्याचा मुकुट सोनारास करायास सांगीतला, नंतर, तो त्याणें करून आणिल्यावर त्यांत कांहीं रुपें किंवा तांबें मिश्र केलें असें नजरेस आलें, परंतु तें किती याचा निश्चय व्हावा ह्मणोन आर्किमीदीज यानामें एक चतुर पुरुष अतिप्रसिद्ध तोही तेथे होता, तेव्हां त्या मुकुटांतील हिणाचें परिमाण काढायास तो त्या चतुर पुरुषाजवळ दिल्हा, पुढें.

त्याणें एक शुद्ध सोन्याची एक तांबें किंवा रुपें याची अशा दोन भरींव आकृती करून त्या पाण्यानें तोंडपर्यंत भरलेल्या पात्रांत पर्यायानें बुडविल्या, नंतर त्या आकृतींचा योगें पात्रांतून बाहेर पडिल्ये पाण्याचीं तोलें केल्यापासून त्या भरींव आकृतीचे स्वभार त्यास विदित जाले, ह्मणजे यापासून आणि त्या प्रत्येकांचे सांगीतल्ये वजनापासून त्या मुकुटांत शुद्ध सोनें आणि हीण किती होतें त्याचें परिमाण काढितां आलें.

आतां कल्पना कर, कीं, त्या भरींव आकृति व मुकुट यांचें प्रत्येक वजन १० शेर आहे. आणि शुद्ध रुपें किंवा तांबें याचे भरींवाकृति मुकुटामुळें पात्रांतून बाहेर पडलें पाणी

दुसरें. ४, ५, ६, ८ रुपये मण या चार भावांचे तांदुळ एकत्र मिश्र करून ते २० मण ७ रुपयांचे भावानें विकायास इच्छितो, तर ते वेगळाले किती किती मण घ्यावे.

उत्तर ४ चे २ २/९, ५ चे २ २/९, ६ चे २ २/९, आणि ८ चे १३ १/३ मण.

## तिसरी रीति.*

जेव्हां एक शुद्ध पदार्थाचें परिमाण अमुक असावें ह्मणून सांगीतलें आहे, तर पूर्वरीती प्रमाणें प्रत्येक पदार्थाचे भावांचा इष्टभावाशीं वजा बाक्या कराव्या. नंतर याप्रमाणें राशी कराव्या, जसें सांगीतल्ये परिमाणाचे शुद्ध पदार्थाची वजा

---

९२ शेर आणि शुद्ध सोन्याचे भरींवाकृति मुकुटामुळें पात्रांतून बाहेर पडलें पाणी ५२ शेर, आणि त्या मिश्र सोन्याचे मुकुटामुळें पात्रांतून बाहेर पडलें पाणी ६४ शेर, तर त्या मुकुटांतील शुद्ध सानें आणि हीण याचें प्रत्येक परिमाण काय होईल.

आतां केवळ तांबें किंवा रुपें याचा भाव ९२ शुद्ध सोन्याचा ५२ आणि मिश्राचा ६४ आहे.

याजकरितां ६४ { ५२ ) २८ / ९२ ) १२ आणि यांची बेरीज ह्मणजे १२+२८=४० परंतु ही १० पाहिजे.

याजकरितां रीतीप्रमाणें ४० : १० : : १२ : ३ शेर तांबें. } हे उत्तर.
४० : १० : : २८ : ७ शेर शुद्ध सोनें. }

---

* अनेक पदार्थ अमुक अमुक परिमाणाचे असावे असें सांगीतलें असेल तरीं ही याच रीतीनें एकाचें परिमाण काढून मग दुसऱ्याचें काढावें, अशा अनुक्रमें सर्वांचीं परिमाणें निघतील, यांत दुसरी आणि तिसरी या रीतींचा आधार सांगायाचें अगत्य नाहीं कारण, या दोनही प्रथम रीतीपासूनच निघतात, तिचा आधार पूर्वी दाखविला गेला आहे.

बाकी

बाकी : दुसर्थे वेगळ्ये वेगळ्ये यजाबाक्यांस होत्ये : : तसें सांगीतलें परिमाण : वेगळ्ये वेगळ्ये इछिल्ये परिमाणास होईल.

## उदाहरणें.

प्रथम, दरग्यालन ४ शिल्लिंग, दरग्यालन ५ शिल्लिंग, दरग्यालन ५ शिल्लिंग ६ पेन्स, आणि दरग्यालन ६ शिल्लिंग, असे चार जातीचे पदार्थ मिश्रकरायाचे त्यांत प्रथम ४ शिल्लिंग दराचा पदार्थ ३ ग्यालन घालणें आहे, आणि मिश्रास दरग्यालनीं ५ शिल्लिंग ४ पेन्स असाभाव व्हावा तर प्रत्येकांचें परिमाण किती किती घ्यावें.

| | | | |
|---|---|---|---|
| आतां ६४ | ४८ | २ + ८ = १० | तरजसें १० : १० : : ३ : ३ ग्या॰. |
| | ६० | २ + ८ = १० | १० : १० : : ३ : ३ ग्या॰. |
| | ६६ | १६ + ४ = २० | १० : २० : : ३ : ६ ग्या॰. |
| | ७२ | १६ + ४ = २० | १० : २० : : ३ : ६ ग्या॰. |

उत्तर ५ शिल्लिंगचे ३ ग्यालन, ५ शि॰ ६ पे॰चे ६ ग्या॰, ६ शिल्लिंगचे ६ ग्या॰.

दुसरें, कोणी एकवाणी १२. १०. ६. ४ रुपये खंडी दराचे दाणें एकत्र मिश्रकरायास इछितो, परंतु त्यांत शेवटील ४ रुपये खंडी दराचे २० खंडी घालायाचे आहेत, आणि त्या मिश्रास ८ रुपये खंडी असा भाव व्हावातर त्याणें प्रत्येक भावांचे किती किती घ्यावे.

उत्तर { ४ रुपयांचे भावाचे २० खंडी, ६ रु॰चे १० खंडी, १० रु॰चे १० खंडी, १२ रु॰चें २० खं॰

तिसरें, १५. १७. १८. २२ क्यारेकुट चागलें सोनें आटून मिश्रकराया-

स इछितो, परंतु, त्यांत तिसर्‍ये १८ क्यारेकटचें ५ तोळे घालणें, आणि मिश्र २० क्यारेकूट चांगलें व्हावें, तर बाकीचें किती किती तोळे घ्यावें.

उत्तर १५ चें ५ तोळे, १७ चें ५ तोळे, २२ चें २५ तोळे.

---

## इष्टराशि.

इष्टराशि ह्मणजे कित्येक प्रश्नांचीं उत्तरें उघड करायाची एक रीति आहे, कीं जा प्रश्नाचीं उत्तरें साधारण पूर्वरीतींकरून उघड होत नाहींत, कोणे वेळेस या रीतीस मिथ्यामनोधृत ह्मणतात, कारण, सत्यसंख्येप्रमाणें मनःकल्पित मिथ्या संख्यांनीं काम केल्यापासून शेवटीं सत्यसंख्या उत्पन्न होत्ये, कोणी या रीतीस चुकशोध ह्मणतात, कारण, मिथ्यासंख्यांचे तपशिलानें शोध करितात, आणि चुक मिळविल्यापासून सत्यसंख्या उत्पन्न होत्ये.

ती एकेरी आणि दुहेरी या भेदेंकरून दोन प्रकारची आहे.

## एकेरी इष्टराशि.

एकेरी इष्टराशि तीच होय, कीं जीपासून एकच मिथ्या संख्येचे साहाय्यानें प्रश्नाचें उत्तर उघड निघतें, जें उत्तर त्याचे मिथ्या संख्येशीं प्रमाणांत आहे, ते प्रश्न एकेरी इष्टराशींतील होत, ह्मणजे असें, इछिल्ये संख्येस दुसर्‍ये सांगीतल्ये संख्येनें गुणायाचें किंवा भागायाचें आहे, अथवा, जेव्हां इछिली संख्या तिणें तीच अथवा तिचे हरकोणत्ये भागानें कित्येक सांगीतल्या वेळा अधिक किंवा उणी

कग

कराव्याची आहे.

## रीति.

इछिली संख्या काढायाकरितां कोणतीही संख्या घ्यावी, आणि प्रश्नांत सांगीतल्या प्रमाणें तिशीं काम करावें, नंतर या प्रमाणें प्रमाणराशी कराव्या. जसें मिथ्यासंख्येचें उत्पन्न : त्या मिथ्यासंख्येस आहे : : तसें प्रश्नांतील उत्पन्न : त्याचे इछिल्ये सत्यसंख्येस होईल.※

## उदाहरणें.

प्रथम, एकमनुष्यानें आपल्ये द्रव्याचा $\frac{१}{३}$ आणि $\frac{१}{४}$ खर्च केला नंतर पाहातो तों ६०० रुपये बाकी राहिले, तेव्हां त्याजवळ पहिलें द्रव्य किती होतें.

पहिलें द्रव्य १२०० रुपये अशी मिथ्या संख्या घे.

आतां १२०० चा $\frac{१}{३}$ = ४००

आणि १२०० चा $\frac{१}{४}$ = ३००

७००

१२००

५०० बाकी.

जसें ५०० : १२०० : : ६०० : १४४० ही इछिली राशि हें उत्तर.

---

※ यारीतीचें कारण उघड आहे, कीं, उत्पन्नें आपलाल्ये संख्यांशी प्रमाणांत आहेत.
जसें नअ : अ : : नज्ञ : ज्ञ, अथवा $\frac{अ}{न}$ : अ : : $\frac{ज्ञ}{न}$ : ज्ञ,
किंवा $\frac{अ}{न} \frac{+}{-} \frac{अ}{म}$ इत्यादि : अ : : $\frac{ज्ञ}{न} \frac{+}{-} \frac{ज्ञ}{म}$ : ज्ञ, आणि इत्यादि.

याचा

याचा ताळा.

१४४० चा $\frac{१}{३}$ = ४८०

१४४० चा $\frac{१}{४}$ = ३६०

८४०

१४४०

६०० ही बाकी प्रश्नाप्रमाणें आहे.

दुसरें, ती संख्या काय आहे, जी ७ याणीं गुणून तो गुणाकार ६ याणीं भागिला असतां भागाकार २१ येईल.

उत्तर १८.

तिसरें, ती संख्या काय आहे, कीं जी तिचे अर्धानें तृतीयांशानें आणि चतुर्थांशानें युक्त केली असतां ७५ बेरीज होईल.

उत्तर ३६.

चवथें, एक सर्दारानें आपल्ये फौजेचा $\frac{१}{२}$ आणि $\frac{१}{३}$ कहीस पाठविला असतां तळावर १००० मनुष्यें राहिलीं तेव्हां त्या फौजेंत सर्व मनुष्यें किती होतीं.

उत्तर ६००० मनुष्यें.

पांचवें, कोणी एक गृहस्थानें भिकार्यांस ५२ पैसे वांटिले, त्यांत प्रती केल्या, पुरुषास ६ बायकोस ४ आणि पोरास २ याप्रमाणें आणि त्यांत बायका पुरुषांचे दुपट, आणि पोरें बायकांचे तिपट अशीं होतीं, तेव्हां पुरुष बायका आणि पोरें अशीं त्या जमावांत किती किती होतीं.

उत्तर पुरुष २ बायका ४ आणि पोरें १२.

साहावें, दोघे भले मनुष्य मार्गांत गोष्टी करित चालिले होते, त्यांत एकानें

दुस

दुसर्यासि विचारिलें कीं, तुम्हास वय किती आहे, तेव्हां त्याणें उत्तर केलें कीं माझे वयाचे वर्षांचे $\frac{२}{३}$ सातानीं गुणिले, आणि त्या गुणाकारांत त्याच वर्षांचे $\frac{१}{५}$ मेळविले तर २१९ होतात, तेव्हां त्याचे वयाचीं किती वर्षें आहेत,

उत्तर ४५ वर्षें.

---

## दुहेरी इष्टराशि.

दुहेरी इष्टराशि म्हणजे किती एक प्रश्नांचीं उत्तरें दोन मिथ्या संख्यांचे साहाय्यानें उघड करायाची रीति.

दुहेरी इष्टराशींत असे प्रश्न येतात कीं, ज्यांचीं उत्तरें सत्यसंख्या इष्टराशींशीं प्रमाणांत नाहींत, जसें या प्रश्नांत, जोंत इच्छिली संख्या त्या संख्येचा भाग किंवा समगुणाकार यांतून एकप्रकारानें वाढविली, किंवा सांगीतल्ये संख्येनें उणी केली, जी सांगीतली संख्या इच्छिल्ये संख्येचा कोणता भाग आहे हें ठाऊक नाहीं.

## प्रथम रीति.*

सुमारानें कामाचे उपयोगी दोन मिथ्या संख्या घ्याव्या, आणि त्यांशीं प्रश्नाचे संकेताप्रमाणें वेगळालीं एकेरी रीतीप्रमाणें कामें करावीं, नंतर पाहावें कीं

---

* सिद्धांत, या रीतीस आश्रय हा आहे कीं, प्रथम अंतर दुसर्ये अंतरास आहे, अशी प्रथम मिथ्या संख्या आणि प्रथम सत्य संख्या यांची वजाबाकी. दुसरी मिथ्या संख्या आणि दुसरी सत्य संख्या यांचे वजाबाकीस आहे, जेव्हां अशा प्रमाणांत नाहीं, तेव्हां या रीतीनें उ-

या

या दोन संख्यांपासून जीं दोन उत्पन्नें होतील त्यांत आणि प्रश्नास किती भेद आहे, या भेदास अंतर ह्मणतात, तें अंतर अधिक किंवा उणें असेल त्याप्रमाणें त्यास धन (+) ऋण (−) चिन्हें करावीं.

नंतर तीं दोन अंतरें गुणावीं अशीं कीं, दुसर्‍यें अंतरानें प्रथम संख्या गुणिली जाईल, आणि प्रथम अंतरानें दुसरी संख्या, तेव्हां.

---

तर बरोबर काढितां येतनाहीं, हीरीति खरी आहे असें पूर्व आश्रयावरून दाखवितो.

अ आणि ब हीं दोन अक्षरचिन्हें घेतल्ये संख्यांचीं असतील, तसें आ आणि बा ही त्यांचीं प्रश्नाचे संकेताप्रमाणें उत्पन्नें असतील, तसें र आणि स हीं त्यांचीं अंतरें असतील, ह्मणजे न हें संकेताचें सत्य उत्पन्न, याशीं वेगळाल्या आ आणि बा यांचा वजाबाक्या र आणि स असतील, आणि इष्टसंख्या दाखवायास क्ष घेतला, ह्मणजे क्षचें उत्पन्न न होईल

तेव्हां न − आ = र आणि न − बा = स अथवा बा − आ = र − स आतां जास यारीतीचा आश्रय आहे, त्याप्रमाणा प्रमाणें र : स :: क्ष − अ : क्ष − ब, अंत्यपदें आणि मध्यपदें गुणून ह्मणजे रक्ष − रब = सक्ष − सअ नंतर स्थलांतरानें रक्ष − सक्ष = रब − सअ, भागाकारानें $क्ष = \frac{रब - सअ}{र - स}$ ही इछिली संख्या आहे, ह्मणजे हीरीति तेव्हां आहे कीं, जेव्हां दोनही अंतरें कमी पडतात.

जर दोनही उत्पन्नें सत्य उत्पन्ना हून अधिक असतील, ह्मणजे आ आणि बा हीं दोनही नहून अधिक असतील, तर न − आ = − र आणि न − बा = − स ह्मणजे र आणि स हीं दोनही (−) ऋण आहेत, याजकरितां − र : − स :: क्ष − अ : क्ष − ब, परंतु − र : − स :: + र : + स, याजकरितां र : स :: क्ष − अ : क्ष − ब, आणि सर्व बाकी पूर्वप्रकाराप्रमाणें बरोबर निघेल.

परंतु जर एक उत्पन्न आ कमी आणि दुसरें उत्पन्न बा अधिक असेल, अथवा एक अंतर र (+) धन आणि दुसरें अंतर स (−) ऋण असेल तर पूर्वप्रमाणें प्रमाणराशी करून समीकरणास हेरूप होईल. $क्ष = \frac{रब + सअ}{र + स}$ आणि हीरीति अंतरें विरूप आहेत तेव्हां उपयोगी होय.

जर

जर अंतरांचीं चिन्हें सरूप आहेत, तर वरचे गुणाकारांची वजाबाकी त्या अंतरांचे वजाबाकीनें भागावी, भागाकार येईल तो उत्तर होईल.

परंतु अंतरांचीं चिन्हें विरूप आहेत, तर, उत्तराकरितां वरचे गुणाकारांची बेरीज त्याच अंतरांचे बेरिजेनें भागावी.

**टीप,** दोन अंतरांचीं चिन्हें धन किंवा ऋण आहेत तर तीं सरूप होत, एक धन आणि एक ऋण अशीं आहेत तर तीं विरूप होत.

## उदाहरणें.

प्रथम, ती संख्या काय आहे, कीं, जी ६ याणीं गुणून त्या गुणाकारांत १८ मेळविले आणि ती बेरीज ९ याणीं भागिली, तर भागाकार २० होईल.

आतां १८ आणि ३० या दोन मिथ्या संख्या सत्य सारिख्या मानून घे.

| प्रथम संख्या. | | दुसरी संख्या. | ताळा. |
|---|---|---|---|
| १८ | | ३० | २७ |
| ६ | | ६ | ६ |
| १०८ | | १८० | १६२ |
| १८ | | १८ | १८ |
| ९) १२६ | | ९) १९८ | ९) १८० |
| १४ | उत्पन्नें. | २२ | २० |
| २० | सांगीतलें उत्पन्न. | २० | |
| −६ | अंतरें. | +२ | |
| ३० | | १८ | |
| १८० | | ३६ | |
| ३६ | | | |
| ८) २१६ | गुणाकारांची बेरीज. | | |
| २७ | इछिलेली संख्या, हें उत्तर. | | |

दुसरी.

## दुसरी रीति.

गणिताचा तपशील करून इछिल्ये संख्येचे अतिसंनिध दोन संख्या काढून त्यांशीं प्रश्नाचे संकेता प्रमाणें वेगळालीं कामें करावीं, नंतर जीं उत्पन्नें होतील, तीं अधिक उणीं पाहून त्यांस (+) धन (-) ऋण चिन्हें अनुक्रमें करावीं.

या अतिसंनिध संख्यांची वजाबाकी त्यांतील एक अंतरानें गुणावी, आणि तो गुणाकार त्या अंतरांचे वजाबाकीनें भागावा, जर तीं अंतरें सरूप आहेत, आणि विरूप आहेत, तर त्यांचे बेरिजेनें भागावा, अथवा याप्रमाणें प्रमाणराशी कराव्या, जशी दोन अंतरांची वजाबाकी : किंवा दोन उत्पन्नांची वजाबाकी : दोन घेतल्ये अतिसंनिध संख्यांचे वजाबाकीस आहे : : तसें कोणतेंही अंतर : तें आपल्ये संख्येचे शुद्धीस होईल.

नंतर तो भागाकार किंवा तें इछाफल आपली संख्या अधिक असल्यास त्यांतून वजा करावें, आणि आपली संख्या उणी असल्यास त्यांत मिळवावें, म्हणजे इछिली संख्या उत्पन्न होईल.*

---

* म्हणजे पूर्व आश्रय सांगीतला त्याप्रमाणें र : स : : क्ष - अ : क्ष - व, याजकरितां भागाकारानें र - स : स : : ब - अ : क्ष - ब, परंतु बा - आ = र - स याजकरितां बा - आ : स : : ब - अ : क्ष - ब, अथवा बा - आ : ब - अ : : स : क्ष - बं, म्हणजे ही दुसरी रीति आहे.

उदा

## उदाहरणें.

प्रथम, पूर्वउदाहरण आहे तेंच या रीतीनें करावें.

| प्रथम संख्या, | | दुसरी संख्या, |
| --- | --- | --- |
| १८ | | ३० याची वजाबाकी १२ |
| | | लाहान अंतर २ |
| -६ ·· अंतरें ·· +२ | | याची बेरीज ८) २४ |
| | | ३ भागाकार. |

३० या अधिक संख्येंतून.

२ वजा करून.

२७ बाकी इछिली संख्या हें उत्तर.

अथवा, २२-१४ : ३०-१८ : : किंवा ८ : १२ : : २ : ३. पूर्वप्रमाणें ३० या संख्येचे शुद्धीस होईल.

दुसरें, बाप आणि लेंक हे दोघे बोलत होते, तेथे लेंकानें बापास विचारिलें, बापा तुह्मांस वय काय आहे, बाप सांगतो, अरे बाळा आज तुझें वय माझे वयाचा $\frac{1}{3}$ आहे परंतु ५ वर्षांपूर्वी तुसें वय माझे वयाचा $\frac{1}{4}$ होता, तेव्हां त्या दोघांचीं वयें काय आहेत.

उत्तर १५ आणि ४५.

तिसरें, कोणी गृहस्थानें प्रतिदिवशीं रुपया १ $\frac{1}{2}$ प्रमाणें २० दिवसांचे करारानें एक कारागीर ठेविला, त्याची करारी येणेंप्रमाणें, तो कारागीर जादिवशीं खेळेल किंवा गैरहजीर होईल त्यादिवसाचा त्यापासून उलटा रुपया $\frac{1}{2}$ दंड घ्यावा, पुढें

पुढें करारीचे दिवस पुरे आल्यानंतर त्या गृहस्थाकडे त्या कारागिराचे रुपये २२ ठरले, तेव्हां त्याणें किती दिवस काम केलें.

उत्तर १६ दिवस.

चवथें, अ आणि ब हे दोघे बराबर समान रुपये घेउन जुगार खेळायास बसले, तों प्रथमच अ, रुपये २० जिंकिला, नंतर जवळचे सर्व पैक्याचे $\frac{२}{३}$ हारला, शेवटीं खेळ संपून उठले, ते समयीं बचे जवळ अचे चौपट पैका आला, तेव्हां प्रत्येका जवळ आरंभीं किती किती रुपये होते.

उत्तर १०० रुपये

पांचवें, अ आणि ब या दोघांचा आदाय बरोबर आहे, त्यांत अ आपल्ये आदायाचा $\frac{१}{५}$ संग्रह करितो, परंतु ब प्रतिवर्षी अपेक्षां ५०० रुपये अधिक खर्च करितो, आणि ४ वर्षांनंतर बला १००० रुपये कर्ज आलें, तेव्हां प्रतिवर्षी एकेकाचा आदाय व खर्च किती तो सांग.

उत्तर १२५० प्रत्येकाचा आदाय, आणि अचा खर्च प्रतिवर्षी १००० रुपये. बचा १५०० रुपये.

---

## गणितांतील कामाचे प्रश्न.

प्रथम, तोफेचे गोळ्याचा मोटा वेग काळमानाचे १ सेकंदांत २००० फुट आहे, तर त्या भावानें पृथ्वीपासून सुटलेला गोळा सूर्यमंडळीं पोंचण्यास किती

ती वेळ लागेल, सूर्य आणि पृथ्वी यांचे मध्यें अंतर १००००००००० मैल असें कल्पिलें, आणि एकवर्ष ह्मणजे ३६५ दिवस ६ अवर.

उत्तर ८ $\frac{४८०८}{१३१४९}$ वर्षें.

दुसरा, तोफेचा गोळा बाहेर पडतो तेसमयीं त्याचा वेग १ सेकंदांत १५०० फुट आण्याचा असतो आणि सूर्याचा प्रकाश सूर्यापासून पृथ्वीवर पोंचण्यास ७$\frac{१}{२}$ मिन्युटें लागतात, तेव्हां प्रकाशाचे वेगाचें त्या तोफेचे गोळ्याचे वेगाशीं गुणोत्तर काय आहे.

उत्तर जसें ७८२२२२ $\frac{२}{९}$ : १ एकाला.

तिसरा, एक मिन्युटांत ७० पावलें चालतो, पाउल ह्मणजे २८ इंच, तर या भावानें एक अवरांत किती चालेल.

उत्तर १ $\frac{११३}{१३२}$ मैल.

चवथा, एक सेकंदांत २ पावलें अथवा एक मिन्युटांत १२० पावलें चालतो, पाउल ह्मणजे २८ इंच, तर या भावानें कोणी शिपाई कुच करून चालते समयीं १ अवरांत किती चालेल, आणि एक ठाणें २० मैल दूर आहे, तेथें त्याच शिपायास पोंचण्यास या भावानें किती वेळ लागेल, मार्गीं विश्रांतीस एक अवर अवकाश दिला आहे.

उत्तर ३ $\frac{२}{११}$ मैल १ अवरांत चालेल.
आणि $३^{अ}$ . . $१३^{मि}$ $\frac{१}{३}$ वेळ लागेल.

पांचवा, ७०० यार्ड लांबीची एक भिंत २९ दिवसांत सिद्ध करायाचा संकेत, त्यांत १२ माणसांनीं ११ दिवस काम केलें, तों ती भिंत २२० यार्डमात्र सिद्ध आली.

आली. तेव्हां याभावानें कामचालविणें तर पूर्वसंकेताप्रमाणें भिंत पुरी होण्यास पूर्वसंख्येहून किती माणसें अधिक असावीं.

उत्तर ४ माणसें पूर्वसंख्येहून अधिक.

साहावा, ५,०००००००० रुपये एकाशीं एकलावून एकापुढें एक असे भूमीवर एक सरळरेषेंत ठेविले, मनांत आणकीं, एकेक रुपयाचा व्यास एकेक इंच आहे, तर तीरुपयांची ओळ किती लांब होईल.

मै. या. फु. इं.

उत्तर ७८९१ . . ७२८ . . २ . . ८

सातवा, एक शेताचे भोंवता बांध आहे, त्याची परिमिती ५३६ यार्ड आहे, आणि त्या शेताचे समोरासमोरचे बाजूंवर अ आणि ब हे दोघे मनुष्य उभे आहेत, त्यांत अ एक मिन्युटांत ११ यार्ड चालतो, आणि ब तीन मिन्युटांत ३४ यार्ड चालतो, ते दोघे शेतास सव्य प्रदक्षिणा करायास उभे होते तेथून एककाळींच निघाले, तर लवकर चालणाराच्या किती प्रदक्षिणा होतील, तेव्हां पुढील मंद चालणारास मिळवील.

उत्तर १७ प्रदक्षिणा.

आठवा, कोणी एकला मनुष्य अ १२ दिवसांत जें काम करितो, आणि तेंच काम दुसरा मनुष्य ब एकला १४ दिवसांत करितो, जर तेंच काम ते दोघे मिळून करितील तर किती दिवस लागतील.

उत्तर ६ $\frac{६}{१३}$ दिवस.

नववा, एक तांब्याचे खाणींत एकाचा भाग $\frac{३}{५}$ आहेत, त्याणें त्यांतून

$\frac{३}{४}$

२/३ एक मनुष्यास १८००० रुपयांस विकले, तेव्हां त्या सगळेच रवाणीचें मोल काय होईल.

उत्तर ४०००० रुपये.

दाहावा, कोणी एक मनुष्य आपल्ये प्राप्तीच्चे एक चतुर्थांशाहून २०० रुपये अधीक खर्च करितो, तथापि त्याचेजवळ प्राप्तीचे अर्धाहून ३०० रुपये अधिक संग्रह राहातो, तेव्हां त्याची सर्व प्राप्ती किती.

उत्तर २००० रुपये.

अकरावा, घड्याळांतील मिन्युट कांटा आणि अवर कांटा हे दोनही १२ अवरांचे स्थानीं एकत्र होते, ते पुनः पुढें केव्हां एकत्र होतील.

अ. मि. से.

उत्तर १ १/११ अवर, किंवा १ । ५ । २७ ३/११

बारावा, कोणी एक मनुष्याची प्राप्ति एक वर्षाची १५००० रुपये आहेत, आणि एक आठवड्यांत २१० रुपये खर्च करितो, तेव्हां वर्षातीं किती रुपये संग्रह किंवा कर्ज होईल, एथें वर्ष विलायती मानाचें.

उत्तर ४०८० रुपये संग्रह.

तेरावा, कोणी एक मनुष्यानें दर पैशास २ प्रमाणें १८० आंबे विकत घेतले, पुनः दर पैशास ३ प्रमाणें दुसरे १८० आंबे विकत घेतले, नंतर २ पैशांचे ५ प्रमाणें ते सर्व आंबे विकले, तेव्हां मुद्दलांत नफा किंवा तोटा किती आला तो सांग,

उत्तर ६ पैसे तोटा आला.

चवदा

चवदावा, दर आसामीस दर दिवशीं दोन शेर प्रमाणें १५०० मनुष्यांस १२ आठवडे पर्यंत पुरेल इतकें अन्न कोठींत आहे, तेंच अन्न दर आसामीस दर दिवशीं १ $\frac{१}{२}$ शेर प्रमाणें केल्यास २० आठवडे पर्यंत किती मनुष्यांस पुरेल.

उत्तर १२०० मनुष्यांस.

पंधरावा, लंडन शहराचे अक्षांशवृत्तांत पृथ्वीचे भोंवती त्यास्थळीं अक्षांशवृत्त परिघाची लांबी १५५५० मैल आहे, आणि पृथ्वी आपल्ये आंसावर २३ अवर ५६ मिनुटांत पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रदक्षिण एकवार फिरत्ये, तेव्हां या भावानें एक अवरांत फिरण्याचें गमन किती आहे तें सांग.

उत्तर ६४९ $\frac{२५९}{३५९}$ मैल.

सोळावा, कोणी मनुष्य अंतकाळीं आपलें सर्व द्रव्य पुत्रास देउन आपण मरण पावला, नंतर त्या पुत्रानें त्या द्रव्याचा $\frac{३}{७}$ आठ महिन्यांत खर्च केला, नंतर बाकी राहिल्ये द्रव्याचें $\frac{१}{४}$ बारा महिन्यांत उपजीविकेस खर्च करून हिसाब पाहातो, तों ८२०० रुपये बाकी राहिले, तेव्हां सर्व द्रव्य किती होतें तें सांग.

रु. पा. रें.

उत्तर १९१३३ · · १ · · ३२ सगळें द्रव्य.

सत्रावा, एके किल्यास शत्रूनें फौजेचा वेढा दिला होता त्या किल्यांत १००० मनुष्य होते, त्यांस भक्षायास प्रतिदिवशीं प्रतिमनुष्यास २ शेर प्रमाणें ५ आठवडे पर्यंत पुरेल इतकें अन्न संग्रहीं होतें, तेच समयीं त्यांचे कुमकेस ५०० मनुष्य किल्यांत आले, परंतु वेढा उठवाया जोगती कुमक येण्यास ८ आठवड्यांचा अवकाश आहे, तेव्हां तेंच अन्न त्या सर्वांस तेथपर्यंत पुरविणें प्राप्त. तेव्हां दर मनु

मनुष्यास दर दिवशीं किती शेर प्रमाणें द्यावें, तें सांग.

उत्तर २ $\frac{१}{३}$ पावशेर.

अठरावा, कोणी एक मनुष्यानें आपल्ये अंतकाळीं धाकट्ये पुत्रास ८४००० रुपये दिले, हे वडिल पुत्रास जें द्रव्य दिलें त्याचे $\frac{७}{९}$ होतात, तेव्हां त्या मनुष्याचें सर्व द्रव्य किती तें सांग.

उत्तर १९२००० सर्वद्रव्य.

एकुणिसावा, कोणी एक मनुष्य घड्याळाचे कांट्यावर दृष्टी ठेवून बसला होता, त्यास दुसऱ्यानें विचारिलें, किती अवर आले, तेव्हां तो ह्मणतो, पांचां पासून साहा इतक्यांत आहे, ते समयीं पुनः त्याणें विचारिलें कीं निश्चय सांग, त्यास त्याणें उत्तर केलें, जे या समयीं अवरकांटा आणि मिन्युट कांटा हे दोनी एकत्र आहेत, यावरून समज.

एक अवरांत अवरकांटा पूर्ण परिघाचा $\frac{१}{१२}$ चालतो, आणि मिन्युट कांटा एक अवरांत सगळा परिघ अथवा $\frac{१२}{१२}$ चालतो.

उत्तर २७ $\frac{३}{११}$ मिन्युटें.

विसावा, २० मनुष्यें १२ दिवसांत जें काम करितील त्याचे तिपट काम पूर्व वेळेचे $\frac{१}{५}$ न करणें तर किती मनुष्यें असावीं.

उत्तर ३०० मनुष्यें.

एकविसावा, कोणी एक मनुष्यानें मरण समयीं आपल्ये द्रव्याचे $\frac{७}{१८}$ एक पुत्रास देउन जें बाकी राहिलें त्याचे $\frac{७}{१८}$ दुसऱ्ये पुत्रास दिलें आणि जें बाकी राहिलें तें बायकोस दिलें, पुढें पाहातां त्या दोन पुत्रांचे वांट्यांची वजाबाकी

५१४३ रुपये १ पावला ३३ रेंस इतकी आहे, तेव्हां वायकोस किती पावलें तें सांग.

रु. पा. रें.

उत्तर १२७०० . . ३ . . ५३

बाविसावा, कोणी मनुष्यानें मरणसमयीं आपल्ये द्रव्याचे $\frac{१३}{२०}$ एक पुत्रास आणि बाकी राहिलें तें दुसर्ये पुत्रास असें लिहून मरण पावला, पुढें ते दोघे पुत्र द्रव्य वांटून घेउं लागले, तों एकास दुसर्यापेक्षां १२००० रुपये अधिक आले, तेव्हां सगळें द्रव्य किती तें सांग.

उत्तर ४०००० रुपये.

तेविसावा, मुंबई आणि पुणें यांचे मध्यें अंतर सुमारानें १०० मैल आहे, आतां अ, आणि ब, हे दोन सांडणीस्वार या दोन स्थळांहून एकदांच निघाले, ते असे कीं अ, मुंबईहून निघाला तो पुण्यास जाणारा, आणि ब, पुण्याहून निघाला तो मुंबईस जाणारा, पुढें ते निघाल्यापासून ७ अवरांनीं मार्गीं परस्पर भेटले, तेव्हां असें कळलें कीं ब पेक्षां अ दर अवरास १ $\frac{१}{२}$ मैल अधीक चालिला, तेव्हां यावरून ते उभयतां सांडणीस्वार दर अवरास किती किती मैल चालिले.

उत्तर ७ $\frac{२५}{२८}$ मैल, अ, आणि ६ $\frac{११}{२८}$ मैल, ब.

चौविसावा, पुणें आणि पंढरपूर यांचे मध्यें अंतर सुमारानें १२० मैल आहे, आतां प्रातःकाळीं आठ अवर वाजतांच पंढरपुराहून अ, जासूद निघाला पुण्यास जाणारा, तो दर अवरास ३ मैल चालतो, आणि त्याच दिवशीं सायंकाळीं चार अवर वाजतांच पुण्याहून ब, जासूद निघाला पंढरपुरीं जाणारा, तो

दर

दर अवरास ४ मैल चालतो, तेव्हां या दोघांची मार्गी पंढरपुरापासून किती मैलां वर भेट होईल तें सांग.

उत्तर पंढरपुरापासून ६९ $\frac{1}{3}$ मैलांवर.

पंचविसावा, १०० आंबे एकेक यार्डाचे अंतरानें सरळ रेषेंत ठेविले आहेत, आणि प्रथम आंब्यापासून एक यार्डाचे अंतरानें पांटी ठेविली आहे, तेसमयीं एकानें दुसऱ्यास सांगितलें कीं प्रतिखेपेस १ एक आंबा पांटींत ठेवावा, तर अशारीतीनें सर्व आंबे त्या पांटींत येतपर्यंत त्या मनुष्यास किती चालावें लागेल, तें सांग.

उत्तर ५ मै १३०० यार्ड.

सव्विसावा, बिलायतेकडेस इतालिया देशांत घड्याळें आहे, तेथे अहोरात्र मिळून एकापासून २४ अवरं वाजतात तेव्हां अवर कांट्यांची १ प्रदक्षिणा होत्ये त्या प्रदक्षिणेंत किती टोले वाजतात ते सांग.

उत्तर ३०० टोले.

सत्ताविसावा, शेष यानांवाचा एकमनुष्य होता, त्याणें आपल्ये बुद्धिबळानें अपूर्व बुद्धबळांचा खेळ उत्पन्नकरून आपल्ये राजास दाखविला, तेसमयीं तो खेळ पाहून राजा अतिसंतुष्ट आला, आणि त्याला माग ह्मणाला, तेव्हां त्याणें मागीतलें कीं या बुद्धबळांचे पटास ६४ कोष्टक आहेत, तर पहिल्ये कोष्टकास १ गहुं, दुसर्यास २ तिसर्यास ४ या प्रमाणें प्रतिकोष्टकास दुपटीनें वाढते असे ६४ पर्यंत जे गहुं होतील, त्यांचें द्रव्य मला द्यावें, तें राजानें मान्य केलें, तेव्हां जर २००७५ गहुं एक शेरांत राहातील, तर दर मणास दोन रुपये प्रमाणें

त्या

त्या सर्व गव्हांचे किती रुपये होतील.

रु पा रें
उत्तर ३८२८७१४००४५०५७ ... २ ... ३८

अठ्ठाविसावा, कोणी एक मनुष्यानें प्रतिवर्षी आपले द्रव्याचे $\frac{१}{४}$ पेक्षां १००० रुपये अधीक अशारीतीनें चार वर्षे पर्यंत द्रव्य वाढविलें, पाहातो तों १०३४२१ रुपये ३ पावले ५० रेंस इतकें आलें तेव्हां आरंभीं किती रुपये होते, तें सांग.

उत्तर ४०००० रुपये.

एकुणतिसावा, कोणी एक मनुष्यानें ७५०० रुपये कर्जी घेतले, नंतर ७ वर्षानीं १०१२५ रुपये दिले, इतक्यानें व्याजसुद्धां तें कर्ज फिटलें, तेव्हां दरसाल दरशेकडयास व्याजाचा दर काय तो सांग.

उत्तर ५ रुपये.

तिसावा, १०००० रुपये आहेत, ते अ, ब, क, या तिघांस वांटून द्यावें, ते असे कीं, अला कडून १२०० रुपये अधीक मिळतील, आणि बला कडून ९५० रुपये उणे मिळतील, तेव्हां त्या तिघांत कोणास किती रुपये येतील, सांग.

उत्तर अ ४४५० ब २३०० क ३२५० रुपये.

एकतिसावा. कोणी एक मनुष्याजवळ घडयाळ होतें, त्यास दुसऱ्यानें विचारिलें कीं, या वेळेस किती अवर वाजले आहेत, तेव्हां तो सांगतो तें दुपारचे बारा अवर वाजल्या पासून ही वेळपर्यंत जो काळ गेला तो या वेळेपासून रात्रीचे बारा वाजत पर्यंत जो काळ जाणार त्याचे $\frac{१}{२}$ आहेत. तेव्हां यावरून बारावर किती वाजले, सांग.

उत्तर

अ०

उत्तर ५ ०० २० मिन्युट.

बत्तिसावा, मनांत आण कीं कोणा एकाजवळ गलबताचे $\frac{३}{१६}$ होते त्या गलबताची किमत १२००० रुपये, पुढें त्याणें त्यांतून $\frac{१}{६}$ चे $\frac{२}{५}$ विकले, आ तां बाकी राहिल्ये भागाचे किती रुपये होतील.

उत्तर $\frac{३७}{२४०}$ यांची किमत १८५० रुपये.

तेतिसावा, १२०० बिघे जमीन अ, ब, क, या तिघांस वांटून देणें आहे, ती अशी कीं, बला अहून १०० बिघे अधिक, आणि कला बहून ६४ बिघे अधिक मिळेल, तेव्हां कोणास किती येईल, सांग.

उत्तर अला ३१२ बला ४१२ कला ४७६ बिघे.

चौतिसावा, ती संख्या काय आहे, कीं, जा संख्येंतून $\frac{२}{३}$ चे $\frac{३}{७}$ वजा करून बाकींत $\frac{५}{१६}$ चे $\frac{१८}{२५}$ मिळविले, तर बराबर १० होतील.

उत्तर ९ $\frac{७९}{८४}$.

पंसतिसावा, एक संख्या, अशी आहे कीं त्या संख्येस जर १ $\frac{१}{२}$ चे $\frac{४}{५}$ चे $\frac{२}{३}$ याणीं गुणिलें असतां गुणाकार बराबर १ होईल, त्या संख्येचा वर्ग काय आहे तो सांग.

उत्तर १ $\frac{९}{१६}$.

छत्तिसावा, ८ $\frac{१}{२}$ इंच रुंदीचा एक तकता आहे, आणि एक चौरस फुट म्हणजे १२ इंच लांब, आणि बारा इंच रुंद घेणें आहे, तर त्या तकत्यांतून किती इंच लांब घेतला तर बराबर १ चौरस फुट होईल.

उत्तर १६ $\frac{१६}{१७}$ इंच

सत

सतनिसावा, तें मुद्दल काय आहे, कीं ज्याचें व्याज दरसाल दरशें कडा ५ रुपये प्रमाणें आहे, आणि $१\frac{१}{४}$ वर्षांत रास १३८१ रुपये १ पावला होत्ये.

उत्तर १३०० रुपये.

अठतिसावा, कोणी गृहस्थानें मरणसमयीं आपलें द्रव्य अ, ब, क, या तीन पुत्रांस वांटून दिलें, तें असेंकिं, जेव्हां बला ३ तेव्हां अला ४ आणि जेव्हां बला ६ तेव्हां कला ५. याप्रमाणें, आतां अचा भाग ४०००१ रुपये निघाला, तेव्हां सगळें द्रव्य किती सांग.

उत्तर ९५००० रुपये.

एकुणचाळिसावा, एक कुत्रा आणि एक ससा ऐसे एके शेतांत ४० यार्डांचे अंतरानें होते, तो ससा कुत्र्यास पाहून भयानें पळूं लागला, त्यास आरंभीं कुत्र्यानें पाहिलें नव्हतें, परंतु ४० सेकंद गेल्यानंतर पाहिलें, आणि त्यास धरावें या बुद्धीनें त्याचे मागें धावूं लागला, याप्रमाणें दोघे धावूं लागले, त्यांत सशाचे धावण्याचा वेग १ अवरांत १० मैल आणि कुत्र्याचे धावण्याचा वेग १ अवरांत १८ मैल आहे, पुढें कुत्र्यानें त्या सशास धरिलें तेव्हां कुत्रा चालूं लागल्यापासून सशास धरीपर्यंत मध्यें काळ किती गेला, व कुत्रा किती चालिला, तें सांग.

उत्तर ६० $\frac{५}{२३}$ सेकंद आणि ५३० यार्ड

चाळिसावा, दोन भले मनुष्यांचे पुत्र द्रव्यहीन होते, त्या दोघांस एके सर्कारांत एकसमयींच दोन स्थळीं समान प्राप्तीचे उद्योग मिळाले तेव्हां त्यांचीं

वयें

वयें १८ अठरा वर्षांचीं होतीं, त्यांत एक अविवेकी तो आपल्ये प्राप्तीपेक्षां प्रतिवर्षी १०० रुपये अधीक खर्च करि, परंतु त्याचे मनांत लोकांचा पैका बुडवावा ही गोष्ट वाईट म्हणोन प्रतिवर्षी त्या अधीक खर्च केल्ये रुपयांचें दर शेंकडा दरवर्षास व्याज रुपये ५ प्रमाणें खत लिहून देउन आपल्ये जीवाचा विमा दर शेंकडा रुपये ६ प्रमाणें करित असे,

आणि दुसरा विवेकी होता, तो प्रतिवर्षी आपल्ये प्राप्तींतून १०० रुपये संग्रह करून ते दर शेंकडा दरसाल व्याज रुपये ५ प्रमाणें वाढवीत असे.

नंतर त्या दोघांचीं ५० पंनास वर्षांचीं वयें आलीं, तेव्हां परस्पर भेटले, ते समयीं सर्कारांतून प्रत्येकाची प्राप्ती प्रतिवर्षी ४००० रुपये होती, ते परस्पर गोष्टी करूं लागले, तेथें अविवेक्यानें प्राप्तीपेक्षां अधिक खर्च केला ही आपली चूक पदरीं घेउन निश्चय केला कीं, आजपासून जुन्ये कर्जाचें व्याज व जीवाचे विम्याचा ऐवज देउन जें प्राप्तींतून बाकी राहील तितक्यांत आपला खर्च चालवीन, आणि विवेक्यानें निश्चय केला कीं, आजपर्यंत संग्रह झाला आहे, तितकें मुद्दल राखून त्याचें व्याज व सर्कार संबंधी प्राप्ती हें सर्व खर्च करीन.

आतां पुढें अविवेकी यास प्रतिवर्षी खर्चास किती रुपये राहातात, आणि विवेकी याजवळ किती रुपये संग्रह आहे, व प्रतिवर्षी त्याचा खर्च किती होतो, तो सांग.

उत्तर

| | | रु. | पा. | रे. | |
|---|---|---|---|---|---|
| उत्तर | अविवेक्यास प्रतिवर्षी खर्चीयास | ६६९ | २ | १६ | राहातात. |
| | विवेक्यास प्रतिवर्षी खर्चीयास | ४३७६ | १ | ८३ | होतात. |
| | आणि याजवळ संग्रह . . . | ७५२९ | ३ | ५० | आहे. |

## वहिवाटवही अथवा जमाखर्च.

वहिवाटवही दोनप्रकारची आहे, एकेरी आणि दुहेरी.

### एकेरी वहिवाट वही.

या रीतींत दोन वह्या ठेवाव्या लागतात, त्यांत एकीस रोजकीर्द, आणि दुसरीस खतावणी ह्मणतात, या दोन वह्या पाहातांच वहिवाटीची रीति कळेल.— रोजकीर्द वहीमध्यें कोणी तुजपासून उधार सामान घेतो तो त्यासामानाबाबद रिणको होतो, तसें तूं कोणापासून सामान घेतोस त्या सामानाबाबद तो पुरुष धनको होतो, वेगळालें किरकोळ खतावणीचे कोणत्ये पृष्ठावर लिहिलें आहे तें रोजकीर्दीचे डाव्ये बाजूस समासावर त्या त्या नांवाचे समोर मिळेल,

रोजकीर्दींत दिवसादिवसाची एक एक पुरुषाचे सामानाचे किमतींची एकंदर बेरीज मात्र लिहिली आहे, एक एक सामानाची किमत वेगळाली लिहिली नाहीं, कारण कीं, शिकणारांनीं हिंशोब करून ती लिहावी, तेणेंकरून त्यांचा पूर्व अभ्यास दृढ होईल; आणि त्या वेगळाल्या किमतींची बेरीज त्या एकंदर बेरिजेस मिळाली ह्मणजे हिंशेबांत चूक राहिली नाहीं हेंही समजेल.

दुसऱ्या

दुसऱ्या कितीएक वह्या व्यापारी ठेवीत असतात; जसें रोकडवही, घरखर्चवही, टीपवही, या आदिकरून.

## शिकणारांस शिक्षामार्ग.

कोऱ्या वह्या आरंभीं किर्त्यांप्रमाणें आंकून सिद्ध कर, आणि रोजकीर्दींत एक महिन्याचा हिशोब उतार; नंतर दगडपाटीवर अथवा खडर्‍या कागदावर वेगळाल्या सामानाची दराप्रमाणें किंमत काढ, आणि पाहा कीं, एकंदरास मिळत्ये; नंतर दगडपाटीवर किंवा खडर्‍या कागदावर किर्त्यांप्रमाणें खतावणी आंक, मग प्रथम तारीख लाउन रोजकीर्दींतील रकमा त्यांत बाद कर, रोजकीर्दींत ज्या सामानाबाबद जो रिणको आहे त्याचे खातीं रिणकोबाजूस त्या सामानांचे किंमतींची बेरीज लिहि, ज्या सामानाबाबद जो धनको आहे त्याचे खातीं धनकोबाजूस त्या सामानाचे किंमतींची बेरीज लिहि, जर एकच पदार्थ आहे तर त्याचें नांव स्पष्ट लिहि; दर आणि त्याची किंमत पैशाचे कलमांत मांड, असे हिशेब पाटीवर किंवा खडर्‍यावर नीट झाल्यावर मग ते खतावणींत लिहि; प्रतिखात्यास प्रति मनुष्याचे नांवाखालीं आणखी हिंशेब आला असतां लिहावयाकरितां जागा ठेवीत जा, नंतर वर्णक्रमानें त्यात्या वर्णाखालीं त्या त्या खात्याचे धन्याचें नांव लिहि, तें खातें खतावणींत कोणत्ये पृष्ठावर आहे तें पृष्ठ मांड, आणि शेवटीं खतावणीचें पृष्ठ रोजकीर्दींत त्या त्या हिंशेबाचे जवळ लिहि, असेंच दुसर्‍ये तिसर्‍ये चवथ्ये महिन्याचे हिंशेबास करीत जा, जंवपर्यंत सगळा हिंशेब संपे. — पण लक्ष्यांत ठेव कीं, एकवेळ

जाचें

ज्याचें खातें पाडिलें आहे त्या खात्याची जागा भरल्यावांचून दुसरें नव्यें जागां पाडूं नये; जागा भरली ह्मणजे हरकोणत्ये ठिकाणीं खातें पाडावें, जसें गोविंदनारायण खेत्री याचें नांवें पाडून दाखविलें आहे.

जेव्हां पहिली खतावणीची वही जीजवर **अ** अक्षरखूण लिहिली आहे, ती खात्यांनीं भरून गेली, तेव्हां ज्या खात्यांत जी काहीं बाकी असेल ती खाते बाकी दुसरें नव्ये वहींत उतार, त्या वहीवर दुसरें **आ** अक्षरखूण लिहि. — जुन्ये खतावणीचे शेवटीं वेगळाल्ये खाते बाक्यांची यादि लिहि, अशीकीं, तुसें देणें आणि घेणें हीं वेगळाल्ये बाजूंवर होतील.

---

## वहिवाटवही एकेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | —जानेवारी १ सन१८१६— | | | |
| १ | **पुरुषोत्तम कानोबा, पैठणकर, रिणको.** | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास १५ यार्ड बनात · · · · · दर ६··३··२५ | | | |
| | ——२४ यार्ड बारीक बनात · · · दर ९··१··२५ | | | |
| | | ३२१ | ३ | ७५ |
| १ | **हरिकेशवजी, पुणेकर, रिणको.** | | | |
| | यास १२ मण तूप · · · · · दर ५··२··५० | | | |
| | ——१७ मण तेल · · · · · दर २··१··० | | | |
| | ——९ मण मध · · · · · दर ७··०··७५ | | | |
| | | १७० | १ | ७५ |
| | —— ४ —— | | | |
| १ | **महादाजी त्रिंबक, वाईकर, रिणको.** | | | |
| | यास १६ मण साकर · · · · · दर ५··१··२५ | | | |
| | ——५ मण खडीसाकर · · · · दर ८··०··५० | | | |
| | ——१८ मण गूळ · · · · · दर २··१··२५ | | | |
| | ——८ मण धुवासाकर · · · · दर १०··०··० | | | |
| | | २४७ | १ | ० |

# रोजकीर्द.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | जानेवारी ९ सन १८१६ | | | |
| २ | गोविंद नारायण, खेत्री, रिणको. | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास २२ तोळे किरमिजी रेशीम . . . दर ०..१..८५ | | | |
| | —— २३ तोळे पिंवळें रेशीम . . . . दर ०..१..० | | | |
| | | १५ | ३ | ७० |
| | २० | | | |
| २ | सुंदर विश्वनाथ, रिणको. | | | |
| | यास १ रेजीम पुर्न्तकाली कागद ........ | ९ | ० | ० |
| | २७ | | | |
| २ | आबाजी गोविंद पंतोजी, रिणको. | | | |
| | यास ६ प्रती गणिताच्या . . . . दर १३..२..० | | | |
| | —— ३६ कोर्या वह्या . . . . . दर २..०..७५ | | | |
| | —— २ दस्ते मोठे कागद . . . . दर २..१..२५ | | | |
| | —— १ दस्ता लाहान कागद . . . . दर ०..२..० | | | |
| | | १६६ | १ | ५० |

# रोजकीर्द.

| | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|
| | —— फेब्रूआरी ५ सन १८१६ —— | | | | |
| ३ | पाडुरंग हरि, रिणको. | | | | |
| | | रु पा रें | | | |
| | यास १ शिलकबंद वही कोरी आंकलेली दर | ५..१..२५ | | | |
| | —५०० तांटें काळे बोरु . . . . . दर | ०..०..८ | | | |
| | —३ रेजिम जाडे कागद . . . . दर | ७..१..२५ | | | |
| | —६ दस्ते स्वंबायती कागद . . . दर | १..२..० | | | |
| | —४० रेजीम जुनरी कागद . . . दर | ३..३..७५ | | | |
| | —२ चाकू आणि २ दौती . . दरनग | ५..०..२५ | | | |
| | | | २२४ | ० | ० |
| | —— १२ —— | | | | |
| ३ | शंकराजी केशव, रिणको. | | | | |
| | यास २० तोळे जायफळ . . . . . दर | ०..२..० | | | |
| | —१५½ तोळे जायपत्री . . . . . दर | ०..३..२५ | | | |
| | —१६¼ मण सुपारी . . . . . दर | ४..२..५० | | | |
| | —५० तोळे लवंगा . . . . . दर | ०..०..५० | | | |
| | | | १०४ | ० | ० |

# रोजकीर्द.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | फेब्रूआरी २० सन १८१६ | | | |
| ३ | शंकरराव अमृतराव, रिणको. | | | |
| | रु पा रें | | | |
| | यांस १२ मण तांदूळ . . . . . . दर ४··१··७५ | | | |
| | —— ३ मण चणे . . . . . . दर ३··२··२५ | | | |
| | —— २½ मण तुरीची डाळ . . . . दर ३··१··२५ | | | |
| | | ७२ | ० | ८७½ |
| | २७ | | | |
| २ | सुंदर विश्वनाथ, धनको, | | | |
| | याणें रोकड देउन हिसाब चुकविला . . . . . . . . | ९ | ० | ० |
| | मार्च ११ | | | |
| ४ | गोपाळराव देशमूख, रिणको. | | | |
| | तो. मा. गुं. | | | |
| | यांस १ रुप्याचीचा टीवजेन.. } २३··४··४ दर १··०··८ | | | |
| | —— १ रुप्याचा पेला, १०··३··७ दर १··०··१६ | | | |
| | —— १ —— कासांडी, ७५··५··० दर १··०··२५ | | | |
| | —— ६ —— तबकड्या, ७३··२··३ दर १··०··५० | | | |
| | —— १८ —— चमचे, ६०··१··० दर १··०··७५ | | | |
| | | २६८ | १ | ६२ 1/16 |

## वहिवाटवही एकेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | मार्च २२ सन १८१६ | | | |
| १ | हरीकेशवजी, पुणेकर, रिणको. | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास २७ यार्ड जंबुरदी बनात, . . . दर ३..२..२५ | | | |
| | — २२ — लाखी . . . दर २..३..० | | | |
| | — २५ — पांढरी पटु, . . . दर १..०..२५ | | | |
| | | १८३ | १ | ० |
| | एप्रील ८ | | | |
| ४ | चिंतो हरी मजमदार, रिणको. | | | |
| | यास ७½ यार्ड किरमिजी बनात . . . दर १५..२..२५ | | | |
| | — ४ — बारीक निळी बनात . . दर १३..२..७५ | | | |
| | — १ — मखमाल . . . . . दर ८..१..२५ | | | |
| | — ३० — जरी तुई . . . . . दर ०..३..० | | | |
| | | २२२ | १ | १२½ |
| | १२ | | | |
| २ | गोविंद नारायण खेत्री, रिणको. | | | |
| | यास ४ गुलाली लुगडीं . . . . . दर ११..३..२५ | | | |
| | — ४ यार्ड किनखाप तांबडा भरबुटी . दर २५..०..७५ | | | |
| | | १४८ | ० | ० |

# रोजकीर्द.

| | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|
| | एप्रील २४ सन १८१६ | | | | |
| १ | महादाजी त्रिंबक, वाईकर, धनको. | | | | |
| | याणें रोकड देउन हिंसाब चुकविला | | २४७ | १ | ० |
| | २५ | | | | |
| ५ | कृष्णाजी वासुदेव, रिणको. | रु पा रें | | | |
| | यास १२ मण गोडें तेल | दर ३..१..२५ | | | |
| | — १९ — एरंडेल | दर २..३..५० | | | |
| | — १७ — खोबरेल | दर २..२..२५ | | | |
| | | | ११७ | ३ | ७५ |
| | मे ३ | | | | |
| १ | पुरुषोत्तम कानोबा, पैठणकर, रिणको. | | | | |
| | यास २७ यार्ड मसरु | दर ४..२..४५ | | | |
| | — १६ — बारीक माजरपाट | दर ०..२..७५ | | | |
| | — १२ — किनखाप | दर १०..३..३५ | | | |
| | — ३२ — बुटीदार छीट | दर १..२..४० | | | |
| | | | ३१६ | ३ | १५ |

# वहिवाटवही एकेरी रीति.

| | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|
| | मे १० सन १८१६ | | | | |
| ४ | चिंतोहरी मजमदार, रिणको. | | | | |
| | | रु पा रें | | | |
| | यास ७ यार्ड बारीक लाल बनात . . . दर | १२..३..३५ | | | |
| | —— १२ —— रेशमी अस्तर . . . दर | २..२..७५ | | | |
| | —— ४२ —— रेशमी फीत . . . . दर | ०..३..५० | | | |
| | —— ३२ —— जरी फीत . . . . . दर | २..२..४५ | | | |
| | | | २४२ | १ | ८५ |
| | १४ | | | | |
| ५ | फत्तेखान पठाण, रिणको. | | | | |
| | यास १ पागोटें भरजरी किमत . . . रुपये | ५०..२..३५ | | | |
| | —— १ शेला आस्वली कांठी दुमजला . | ८००..३..१५ | | | |
| | —— १ थान किनखाप आंगरख्यास . | २१०..२..० | | | |
| | —— १ थान कच्ची बुटी इजारीस . . | १५०..०..० | | | |
| | —— १ शालजोडी . . . . . . | ५००..३..० | | | |
| | —— १ शालनाम्याचा रुमाल . . . | १००..२..० | | | |
| | —— १ हात रुमाल . . . . . | १०..३..३५ | | | |
| | | | १८१३ | ३ | ८५ |

# रोजकीर्द.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | मे २० सन १८१६ | | | |
| ४ | **चिंतो हरी, मजमदार, धनको.** | | | |
| | याणें गोपाळदास रेवादासावर चिटी दिल्ही··रुपये ··· ·· ··· | ४०० | ० | ० |
| ५ | **कृष्णाजी वासुदेव, रिणको.** | | | |
| | रु पा रे | | | |
| | यास १ मण बरफी · · · · · · दर ८··१··३५ | | | |
| | — २ मण पेढे · · · · · · दर ८··३··७५ | | | |
| | — १ मण मावा · · · · · · दर १०··३··७५ | | | |
| | | ३७ | ० | ० |
| | २७ | | | |
| ५ | **गुलामखान साहेब, रिणको.** | | | |
| | यास ५ मण आंबेमोहोर तांदुळ · · · दर ४··३··७५ | | | |
| | — १ मण डाळ तुरींची · · · · · दर ४··१··१५ | | | |
| | — १ मण तूप · · · · · · · दर ६··२··७५ | | | |
| | | ३५ | २ | ६५ |

## वहिवाटवही एकेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | जुन ३ सन १८१६ | | | |
| ६ | गोपाळदास तुळसीदास, रिणको. | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास २५ मण चणे · · · · · दर ३..२..७५ | | | |
| | — १० मण उडीद · · · · · दर २..३..२५ | | | |
| | — ५० मण गहूं · · · · · दर ३..१..२५ | | | |
| | | २८५ | ३ | ७५ |
| | १२ | | | |
| ४ | गोपाळराव देशमूख, धनको. | | | |
| | याणें चाकराचे हातें पाठविले रोकड रुपये ·· ··· ·· :: | २०० | ० | ० |
| | १७ | | | |
| १ | महादाजी त्रिंबक, वाईकर, रिणको. | | | |
| | यास २० शेर मेनबत्ती · · · · · दर १..१..१५ | | | |
| | — ८ शेर उदबत्ती · · · · · दर २..१..३५ | | | |
| | — १ शेर केशर · · · · · दर २४..२..१५ | | | |
| | — १ तोळा कस्तुरी · · · · · दर १८..३..४५ | | | |
| | — १ शेर कापुर · · · · · दर १..१..१५ | | | |
| | — ५ शेर गुलाब · · · · · दर १..२..३५ | | | |
| | | ९७ | ० | ३० |

# रोजकीर्द.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | जुन २१ सन १८१६ | | | |
| १ | महादाजी त्रिंबक, वाईकर, धनको. | | | |
| | रु पा रें | | | |
| | याणें ४० यार्ड बुटीदार बारीक छीट दिल्हें किमत दर यार्ड ३..२..२५ | | | |
| | | १४२ | २ | ० |
| | २८ | | | |
| ५ | कृष्णाजी वासुदेव, रिणको, | | | |
| | यास १३ खंडी जाडे तांदुळ · · · · · दर १६..२..७५ | | | |
| | — ३ खंडी गहुं पोटे · · · · · · दर ३२..१..२५ | | | |
| | — १ खंडी तुरींचीडाळ · · · · · · दर ३४..२..० | | | |
| | | ३४८ | १ | ५० |
| | जुलै ३ | | | |
| ६ | आत्माराम बाळाजी शिंपी, रिणको. | | | |
| | यास १४ यार्ड बनात काळी बारीक · · · दर १०..३..७५ | | | |
| | — २१ यार्ड रेशमी अस्तर · · · · · दर ४..२..२५ | | | |
| | — १२ $\frac{१}{२}$ यार्ड जरीफीत · · · · · · दर १..३..७५ | | | |
| | — ५ यार्ड साधी रेशमी फीत · · · · दर ०..२..७५ | | | |
| | | २७६ | २ | ३७ $\frac{१}{२}$ |

## वहिवाटवही एकेरीरीति.

| | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|
| | जुलै ८ सन १८१६ | | | | |
| २ | **आबाजीगोविंद, पंतोजी, धनको.** | | | | |
| | याणें रोकड देउन हिंसाब चुकविला · · · ·· ··· ·· ··· | | १६६ | १ | ५० |
| | — १० — | | | | |
| ६ | **पाडुरंगरामचंद्र, रिणको.** | | | | |
| | | रु पा रें | | | |
| | यास १५ साकरेच्या पेटया वजन ९० मण | दर ५··३··७५ | | | |
| | — ३५ मण तूप · · · · · | दर ६··२··१५ | | | |
| | — २५ मण गहूं · · · · · | दर ४··१··३५ | | | |
| | — १३ मण चण्याचीडाळ · · · | दर ४··२··१५ | | | |
| | — ३ मण तुरीचीडाळ · · · | दर ४··१··१५ | | | |
| | — ३५ मण तांदूळ · · · · | दर ४··३··३५ | | | |
| | | | ११९२ | ३ | १५ |
| | — १७ — | | | | |
| ७ | **नारोकृष्ण, रिणको.** | | | | |
| | यास ५ पलंग · · · · · · · | दर १०··२··२५ | | | |
| | — २ पाळणे · · · · · · · | दर ७··३··५० | | | |
| | — ५० पाट · · · · · · · | दर ०··३··७५ | | | |
| | | | ११५ | १ | ७५ |

# रोजकीर्द.

| | | | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|
| | जुलै २४ सन १८१६ | | | | | |
| ७ | नारोकृष्ण, रिणको. | | | | | |
| | | | रु पा रे | | | |
| | यास १ धोत्रजोडा | रुपये | ९..२..२५ | | | |
| | — १ रेजीम पुर्त्तकाली कागद | रुपये | ८..२..३५ | | | |
| | — १ शेला पागोटें | रुपये | ६५..२..१५ | | | |
| | — ८ मण तूप | दर | ५..३..३५ | | | |
| | | | | १३० | १ | ५५ |
| | २९ | | | | | |
| ६ | गोपाळदास तुळशीदास, रिणको. | | | | | |
| | यास १० मण तांदूळ | दर | ४..२..३५ | | | |
| | — १० मण चणे | दर | ३..३..१५ | | | |
| | — २ मण तूरींची डाळ | दर | ४..२..३५ | | | |
| | — ८ मण गहूं | दर | ४..१..० | | | |
| | | | | १२६ | ३ | ७० |

## वहिवाटवही, एकेरीरीति.

| | रु | पा | रे |
|---|---|---|---|
| ——— आगष्ट १ सन १८१६ ——— | | | |
| २ शंकराजी केशव, रिणको. | | | |
| रु पा रे | | | |
| यास ५ मण खडी साकर · · · · · दर ७··२··३५ | | | |
| ——१५ शेर हळद · · · · · · · · दर ०··०··४० | | | |
| —— १ शेर हिंग · · · · · · · · दर १··३··३५ | | | |
| —— ५ शेर मरींव मिरीं · · · · · दर ०··१··१० | | | |
| | ४२ | २ | ६० |
| ——— ७ ——— | | | |
| ३ पांडुरंग हरी, धनको. | | | |
| याणें तुळशीदास रणछोडदास याजवर चिटी दिली रु २०० | | | |
| आणि बाकी हिंसाबीं पुरे रोकड दिले · · · · · · · · २४ | | | |
| | २२४ | ० | ० |
| ——— १२ ——— | | | |
| ५ कृष्णाजी वासुदेव, धनको. | | | |
| याणें हिंसाबीं रोकड दिल्ले · · · · · · · · · · · · | ५०० | ० | ० |
| ——— १६ ——— | | | |
| ७ नारोकृष्ण, धनको. | | | |
| याणें चणे ८ खंडी दिल्ले · · · · · · दर ३२··१··२५ | २५८ | २ | ० |

# रोजकीर्द.

| | | | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|
| | आगष्ट १९ सन १८१६ | | | | | |
| ७ | नारोकृष्ण, रिणको. | | | | | |
| | | | रु पा रे | | | |
| | यास ५ मण गुळ . . . . . . . | दर | २..३..२५ | | | |
| | —— ४ मण तेल . . . . . . . | दर | २..२..३५ | | | |
| | —— ४ मण गहूं . . . . . . . | दर | ३..२..२५ | | | |
| | —— ४ मण चणे . . . . . . . | दर | २..३..७५ | | | |
| | | | | ५० | १ | ६५ |
| | २१ | | | | | |
| ७ | खंडोजी रंगारी, रिणको | | | | | |
| | यास ३ मण काळीगुळी . . . . | दर | ७०..३..२५ | | | |
| | —— २ खंडी पतंग . . . . . . | दर | ६१..२..३५ | | | |
| | —— ५ मण कुसुंब . . . . . . | दर | २५..३..३५ | | | |
| | —— २०० तोळे केशर . . . . . . | दर | ०..२..१५ | | | |
| | | | | ५७२ | १ | २० |

## वहिवाटवही, एकेरीरीति.

| | | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|
| | आगष्ट २६ सन १८१६ | | | | |
| ७ | खंडोजी तुकाजी मेस्तरी, रिणको. | रु पा रे | | | |
| | यास १८ मण लोखंड कांबी | दर ३..२..१५ | | | |
| | — ५ मण खिळे | दर ५..१..२५ | | | |
| | — ४ मण चुका | दर ८..१..३५ | | | |
| | — १० कुलपें | दर १..१..१५ | | | |
| | — ५ तासण्या | दर २..२..२५ | | | |
| | — २५ विंधणीं | दर ०..२..५ | | | |
| | | | १६२ | ० | ३५ |
| | सप्तेंबर ३ | | | | |
| ८ | गोविंदराव कुळकरणी, रिणको. | | | | |
| | यास १ आंगवस्त्र जोडी | रुपये | २ | ३ | २५ |
| | ४ | | | | |
| २ | आबाजी गोविंद पंतोजी, रिणको. | | | | |
| | यास १० प्रति कोशाच्या | दर ११..२..२५ | | | |
| | — ५ रेजीम पुर्तकाली कागद | दर ८..३..७५ | | | |
| | — १६ दौती | दर १..२..२५ | | | |
| | — १ भारा बोरु | दर १..३..७५ | | | |
| | — १२ चाकू | दर २..२..२५ | | | |
| | | | २१८ | ० | ० |

# रोजकीर्द.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | सप्तेंबर ६ सन १८१६ | | | |
| २ | **गोविंदनारायणखेत्री, रिणको.** | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास १२¼ यार्ड मखमाल ······· दर ५··२··० | ६७ | १ | ५० |
| | ९ | | | |
| ५ | **फत्तेखान पठाण, धनको.** | | | |
| | याणें रोकड दिले ················· रुपये | २०० | ० | ० |
| | १२ | | | |
| २ | **गोविंदनारायण खेत्री, रिणको.** | | | |
| | यास ११⅓ यार्ड मखमाल ······ दर ९··०··० | १०२ | ० | ० |
| २ | **आबाजी गोविंद पंतोजी, रिणको.** | | | |
| | यास १ बीजगणित पुस्तक ·········· रुपये | १० | २ | ५० |
| | १६ | | | |
| ८ | **गोविंदराव कुळकरणी, रिणको.** | | | |
| | यास १७ चिनई पंखे ········ दर १··२··३५ | २६ | ३ | ९५ |
| | १८ | | | |
| १ | **महादाजी त्रिंबक वांईकर, रिणको.** | | | |
| | यास रोकड देऊन हिंसाव चुकविला ········ रुपये | ४५ | १ | ७० |

## वहिवाट वही एकेरी रीति

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | सप्तेंबर २१ सन १८१६ | | | |
| २ | **गोविंद नारायण खेत्री, धनको.** | | | |
| | याणें रोकड चाकराचे हातीं पाठविले ........ रुपये | २०० | ० | ० |
| | २४ | | | |
| ७ | **नारो कृष्ण, धनको.** | | | |
| | याणें रोकड देऊन हिंसाब चुकविला ........ रुपये | ३७ | २ | १५ |
| | २७ | | | |
| ८ | **गोविंदराव कुळकरणी, रिणको.** | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास २१ यार्ड रुपेरी फीत ....... दर १..१..२५ | | | |
| | —— ११ ३/४ सोनेरी फीत ....... —— ५..१..७५ | | | |
| | | ९० | ० | ३७ १/२ |
| | अकटोबर २ | | | |
| ८ | **तुळशीराम कोष्टी, रिणको.** | | | |
| | यास १४ शेर कापूस ........ दर ०..१..२५ | ४ | १ | ५० |
| | ४ | | | |
| ८ | **मैनुदिन बोहोरी, धनको.** | | | |
| | याणें ३० रेजीम पुर्तकाली कागट ..... दर ७..३..२५ | २३४ | १ | ५० |

# रोजकीर्द

| | अकटोबर ७ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| ९ | **गोविंदनारायण खत्री, रिणको.** | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास २७½ यार्ड मशरु · · · · · · दर २··१··३० | ६३ | १ | ४२½ |
| ५ | **कृष्णाजीवासुदेव, धनको.** | | | |
| | याणें रोकड देऊन हिंसाब चुकविला · · · · · · · रुपये | २३ | १ | २५ |
| | — १० — | | | |
| ९ | **नबाबखानफत्तेखान, रिणको.** | | | |
| | यास १ पागोटें · · · · · · · · · · रुपये २५··२··० | | | |
| | — १ शेला · · · · · · · · · · · · · · १००··१··१५ | | | |
| | — १ तुमाण · · · · · · · · · · · · · २०··२··३५ | | | |
| | | १४६ | १ | ५० |
| | — १२ — | | | |
| ९ | **गोविंदनारायण खत्री, रिणको.** | | | |
| | यास ४० यार्ड बासता · · · · · · · · दर १··१··४० | ५४ | ० | ० |
| | — १५ — | | | |
| ९ | **तुकाजी कृष्णाजी लोहार, रिणको.** | | | |
| | यास २½ मण त्रिसें · · · · · · · · दर ९··३··७५ | २४ | ३ | ३७½ |

# बहिवाटवही एकेरी रीति.

| | | रु | पा | रें |
| --- | --- | --- | --- | --- |
| | ——— अकटोबर २१ सन १८१६ ——— | | | |
| ९ | मकाजी मुकुंदजी, धनको. | | | |
| | रु. पा रें | | | |
| | याणें ३ थान मशरु मिळून ८७ यार्ड दर १..१..५० | ११९ | २ | ५० |
| | ——— २३ ——— | | | |
| ७ | खंडोजी तुकाजी मेस्तरी, धनको. | | | |
| | याणें हिंसाबीं रोकड दिले . . . . . . . . . . . . . रुपये | १०० | ० | ० |
| ८ | गोविंदराव कुळकरणी, रिणको. | | | |
| | यास १ रेजिमें चिनई कागद . . . . . . . दर १..२..२५ | | | |
| | — ३ — पुर्तकाली कागद . . . . . . . दर ८..३..३५ | | | |
| | — १ चाकु . . . . . . . . . . . . . . दर १..२..१५ | | | |
| | | ४२ | ० | ४५ |
| | ——— २५ ——— | | | |
| ९ | गोविंदनारायण खेत्री, धनको. | | | |
| | याणें रोकड देऊन हिंसाब चुकविला . . . . . . . . . रुपये | २५० | २ | ६२ ३/४ |
| | ——— २७ ——— | | | |
| १ | हरीकेशवजी पुणेकर, धनको. | | | |
| | याणें रोकड देऊन हिंसाब चुकविला . . . . . . . रुपये | ३५३ | २ | ७५ |

# रोजकीर्द

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | अकटोबर ३० सन १८१६ | | | |
| ८ | तुळशीरामकोष्टी, रिणको : | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास १२ शेर कापूस . . . . . . . दर ०..१..७५ | | | |
| | —— १४ शेर कापूस . . . . . . . दर ०..१..५० | | | |
| | | १० | २ | ० |
| | नवेंबर ४ | | | |
| १ | नबाबखान फत्तेखान, धनको | | | |
| | याणें ३० धोत्रजोडे दिले . . . . . . . दर ४..१..२५ | | | |
| | बाकी रोकड देऊन हिंसाब चुकविला . . रु १७..०..० | | | |
| | | १४६ | १ | ५० |
| | ७ | | | |
| १० | मुरारकोंडाजी, मिठाईवाला, रिणको | | | |
| | यास ३ पेट्या साकर वजन १८½ मण दर ६..३..७५ | १२८ | १ | ३७½ |
| | १३ | | | |
| १ | पुरुषोत्तम कानोबा, धनको. | | | |
| | याणें तुळशीदास जगजीवनदास याजवर चिठी दिली रु | ५०० | ० | ० |

## वहिवाटवही एकेरीरीति.

| | नवेंबर १५ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| ६ | गोपाळदास तुळशीदास, धनको | | | |
| | रु पा रें | | | |
| | याणें ४ थान मशरु मिळून १४२ ३/४ यार्ड, दर ३..१..५० | ४८० | ३ | ७५ |
| ६ | गोपाळदास तुळशीदास, रिणको. | | | |
| | यास हिंसावीं पुरे दिले . . . . . . . . . . . रु | ६८ | ० | ३० |
| | —— २० —— | | | |
| १० | मुरारकोंडाजी, मिठाईवाला, रिणको. | | | |
| | यास १५ १/२ शेर खजूर दर ०..०..२० | ० | ३ | १० |
| | —— २२ —— | | | |
| १० | अंताजी कृष्ण, माहुलीकर, रिणको | | | |
| | यास २ हांडे वजन ३६ शेर . . . . दर ०..२..७५ | | | |
| | —— ३ तपेलीं वजन २१ शेर . . . . दर ०..२..५० | | | |
| | —— १ पराथ वजन ९ शेर . . . . दर ०..२..७५ | | | |
| | —— ६ किर्कोळ भांडीं वजन २७ शेर, दर ०..२..८५ | | | |
| | —— १० तांब्या पंचपात्री उपकरणें वजन | | | |
| | १२ शेर, दर ०..३..० | | | |
| | | ७२ | १ | २० |

# रोजकीर्द.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | नवेंबर २६ सन १८१६ | | | |
| १० | **अंताजी कृष्ण माहुलीकर, धनको.** | | | |
| | रु पा रें | | | |
| | याणें ४२ यार्ड बास्ता . . . . . . . दर २..१..५० | ९९ | ३ | ० |
| | २८ | | | |
| ४ | **गोपाळराव देशमुख, धनको** | | | |
| | याणें रोकड देऊन हिसाब चुकविला . . . . . . . रु. | ६८ | १ | ६२½ |
| | २९ | | | |
| १० | **मुरार कोंडाजी, मिठाईवाला, रिणको** | | | |
| | यास २ शेर लवंगा . . . . . . . . दर १..२..२५ | | | |
| | ——२ शेर एलचा . . . . . . . . दर १..२..७५ | | | |
| | ——२ शेर जायपत्री . . . . . . . दर ३..१..३५ | | | |
| | ——२ शेर जायफळ . . . . . . . . दर १..२..७५ | | | |
| | ——१२ तोळे केशर . . . . . . . . दर ०..२..३५ | | | |
| | | २३ | २ | ४० |
| | डिसेंबर २ | | | |
| २ | **आबाजी गोविंदपंतोजी, धनको** | | | |
| | याणें हिसाबीं पुरे रोकड दिले . . . . . . . . . रु. | २२८ | २ | ५० |

# वहियाटवही एकेरीरीति

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | डिसेंबर ३ सन १८१६ | | | |
| ३ | पांडुरंगहरी, रिणको. | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास १ शालजोडी किमत . . . . . . . . . रु | २५० | ० | ० |
| | ६ | | | |
| ३ | शंकराजीकेशव, धनको. | | | |
| | याणें ३० पागोटीं दिल्हीं . . . . . . दर ३..१..५० | १०१ | १ | ० |
| | हिंसाबीं रोकड पुरे दिले . . . . . . . . . रु | ४५ | १ | ६० |
| | ७ | | | |
| १० | शंभुरामशास्त्री, रिणको. | | | |
| | यास ३ पुस्तकप्रति . . . . . . . दर १५..२..५० | ४६ | ३ | ५० |
| | १० | | | |
| ३ | शंकररावअमृतराव, धनको. | | | |
| | याणें हिंसाचीं पुरे रोकड दिले . . . . . . . रु | ७२ | ० | ८७½ |
| | १२ | | | |
| ११ | नारोविठ्ठल सुभेदार, रिणको. | | | |
| | यास ३० बुधले तेल वजन ३०० मण त्यांत बारदान दरम-णीं ३½ शेर प्रमाणें वजादेऊन बाकी तेल २७३ मण ३० शेर ; दरमणी २..२..७५ | ७३५ | २ | ८१½ |

# रोजकीर्द.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | डिसेंबर १३ सन १८१६ | | | |
| ९ | तुकाजी कृष्णाजी लोहार, धनको. | | | |
| | रु पा रें | | | |
| | याणें हिंसाबीं पुरे रोकड दिले ... ... ... ... | २४ | ३ | ३७½ |
| | १६ | | | |
| ४ | चिंतो हरी मजमदार, धनको. | | | |
| | याणें ३ मण तंबाखू ... ... ... दर ४ ० ० | १२ | ० | ० |
| | १८ | | | |
| ५ | गुलामखान साहेब, रिणको. | | | |
| | यास १ पिशवी साकर वजन शेर २२¾ दर ० ० ७५ | ४ | १ | ६¼ |
| | २० | | | |
| १० | मुरार कोंडाजी, मिठाईवाला, धनको. | | | |
| | याणें हिंसाबीं पुरे रोकड दिले ... ... ... ... | १५२ | २ | ८७½ |
| | २१ | | | |
| ६ | आत्माराम बाळाजी शिंपी, धनको. | | | |
| | याणें हिंसाबीं पुरे रोकड दिले ... ... ... ... | २७६ | २ | ८७½ |

## वहिवाटवही एकेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | डिसेंबर २३ सन १८१६ | | | |
| ११ | **गंगाधरशास्त्री, रिणको.** | | | |
| | रु पा रें | | | |
| | यास ३ खंडी १ मण चणे · · · दरखंडीस रुपये १५··०··० | ४६ | ३ | ५० |
| | २४ | | | |
| ६ | **पांडुरंग रामचंद्र, धनको.** | | | |
| | याणें तुळशी गोपाळ याजवर चिटी दिल्ही · · · · · रुपये | ५०० | ० | ० |
| ५ | **गुलामखानसाहेब, धनको.** | | | |
| | याणें हिंसाबीं पुरे रोकड दिल्हे · · · · · · · · · · रुपये | ३९ | ३ | ७१[illegible] |
| | २८ | | | |
| ८ | **गोविंदराव कुळकर्णी, धनको.** | | | |
| | याणें हिंसाबीं पुरे रोकड दिल्हे · · · · · · · · · रुपये | १६२ | ० | २[illegible] |

# अनुक्रमणिका, रवनावणी, अ.

अनुक्रमणिका, रचनावणी, अ.

(१) रिणको. पुरुषोत्तमकानोबा, पैठणकर. धनको.

| १८१६ | | रु | पा | रें | १८१६ | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जाने १ | किर्कोळबाबद . . . | ३२१ | ३ | ७५ | नवेंबर १३ | चिटीबाबद | ५०० | ० | ० |
| मे ३ | किर्कोळबाबद . . . | ३१६ | ३ | १५ | | बाकीखतावणीबप्१ | १३८ | २ | ९० |
| | | ६३८ | २ | ९० | | | ६३८ | २ | ९० |

रिणको. हरीकेशव, पुणेकर. धनको.

| १८१६ | | रु | पा | रें | १८१६ | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जाने १ | किर्कोळबाबद . . . | १७० | १ | ७५ | अकटो २७ | हिंसाबींपुरेरोकडदिले | ३५३ | २ | ७५ |
| मार्च २२ | किर्कोळबाबद . . . | १८३ | १ | ० | | | | | |
| | | ३५३ | २ | ७५ | | | | | |

रिणको. महादाजीत्रिंबक, वांईकर. धनको.

| १८१६ | | रु | पा | रें | १८१६ | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जाने ४ | किर्कोळबाबद . . . | २४७ | १ | ० | एप्रील २४ | हिंसाबींपुरेरोकडदिले | २४७ | १ | ० |
| जुन १७ | किर्कोळबाबद . . . | ९७ | ० | ३० | जुन २१ | ४०याईछीटबाबद . | १४२ | २ | ० |
| सप्टें १८ | हिंसाबींपुरेरोकडदिले | ४५ | १ | ७० | | | | | |
| | | ३८९ | ३ | ० | | | ३८९ | ३ | ० |

(२) रिणको. गोविंदनारायण,खेडी. धनको.

| १८१६ | | रु | पा | रें | १८१६ | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जाने ९ | किर्कोळबाबद . . . | १५ | ३ | ७० | सप्टें २१ | रोकडचाकरहस्तेंपाठविले | २०० | ० | ० |
| एप्री १२ | किर्कोळबाबद . . . | १४८ | ० | ० | | बाकीए ९ पाहा | १३३ | १ | २० |
| सप्टें ६ | १४२/३ यार्डमखमालबाब | ६७ | १ | ५० | | | | | |
| सप्टें १२ | ११३/४ यार्डमखमालबाबद | १०२ | ० | ० | | | | | |
| | | ३३३ | १ | २० | | | ३३३ | १ | २० |

रिणको. सुंदरविश्वनाथ. धनको.

| १८१६ | | | | | १८१६ | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जाने २० | १रेजीमकागदबाबद . | ९ | ० | ० | फेब्रू २७ | हिंसाबींपुरेरोकडदिले | ९ | ० | ० |

रिणको. आबाजीगोविंद,पंतोजी. धनको.

| १८१६ | | | | | १८१६ | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जाने २७ | किर्कोळबाबद . . . | १६६ | १ | ५० | जुलै ८ | हिंसाबींपुरेरोकडदिले | १६६ | १ | ५० |
| सप्टें ४ | किर्कोळबाबद . . . | २१८ | ० | ० | डिसें २ | हिंसाबींपुरेरोकडदिले | २२८ | २ | ५० |
| सप्टें १२ | बीजगणितपुस्तकबाबद | १० | २ | ५० | | | | | |
| | | ३९५ | ० | ० | | | ३९५ | ० | ० |

(३) रिणको. पांडुरंगहरी. धनको.

| १८१६ | | रु | पा | रे | १८१६ | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| फेब्रू ५ | किर्कोळबाबद . . . | २२४ | ० | ० | आग ७ | चिटीवरोकडदेऊन | २२४ | ० | ० |
| डिसें ३ | १ शालजोडीबाबद . . | २५० | ० | ० | | बाकीखतावणीबपृ १ | २५० | ० | ० |
| | | ४७४ | ० | ० | | | ४७४ | ० | ० |

रिणको. शंकराजीकेशव. धनको.

| १८१६ | | | | | १८१६ | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| फेब्रू १२ | किर्कोळबाबद . . . | १०४ | ० | ० | डिसें ६ | ३० पागोटींबाबद | १०१ | १ | ० |
| आग १ | किर्कोळबाबद . . . | ४२ | २ | ६० | | वहिंसाबांपुरेरोकडदि· | ४५ | १ | ६० |
| | | १४६ | २ | ६० | | | १४६ | २ | ६० |

रिणको. शंकररावअमृतराव. धनको.

| १८१६ | | | | | १८१६ | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| फेब्रू २० | किर्कोळबाबद . . . | ७२ | ० | ८७३ | डिसें १० | हिंसाबांपुरेरोकडदिले | ७२ | ० | ८७३ |

(४)

| रिणको. | | गोपाळराव,देशमूख. | | | | | धनको. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१६ | | रु | पा | रे | १८१६ | | | रु | पा | रे |
| मार्च ११ | किर्कोळबाबद . . . | २६८ | १ | ६२$\frac{1}{6}$ | जुन | १२ | चाकरहस्तें पाठविले | २०० | ० | ० |
| | | | | | नवें | २८ | हिंसाबीं पुरेरोकड दिले | ६८ | १ | ६२$\frac{1}{6}$ |
| | | | | | | | | २६८ | १ | ६२$\frac{1}{6}$ |

| रिणको. | | चिंतोहरी,मजमदार. | | | | | धनको. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१६ | | | | | १८१६ | | | | | |
| एप्री ८ | किर्कोळबाबद . . . | २०२ | १ | १२$\frac{1}{2}$ | मे | २० | चिटीबाबद . . . | ४०० | ० | ० |
| मे १० | किर्कोळबाबद . . . | २४२ | १ | ८५ | डिसें | १६ | ३ मण तंबाखूबाबद | १२ | ० | ० |
| | | | | | | | बाकीखतावणीवपृ १ | ३२ | २ | ९७$\frac{1}{2}$ |
| | | ४४४ | २ | ९७$\frac{1}{2}$ | | | | ४४४ | २ | ९७$\frac{1}{2}$ |

(५) रिणको. कृष्णाजी वासुदेव. धनको.

| १८१६ | | | रु | पा | रें | १८१६ | | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| एप्री | २५ | किर्कोळ बाबद . . | १३७ | ३ | ७५ | आग | १२ | हिंसाबीं पुरे रोकड . . | ५०० | ० | ० |
| मे | २० | किर्कोळ बाबद . . . | ३७ | ० | ० | अक | ७ | हिंसाबीं पुरे रोकड . | २३ | १ | २५ |
| जुन | २८ | किर्कोळ बाबद . . . | ३४८ | १ | ५० | | | | ५२३ | १ | २५ |
| | | | ५२३ | १ | २५ | | | | | | |

रिणको. फतेखान, पठाण. धनको.

| १८१६ | | | | | | १८१६ | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मे | १४ | किर्कोळ बाबद . . . | १८१३ | ३ | ८५ | सप्टें | ८ | रोकड दिल्हे . . . . | २०० | ० | ० |
| | | | | | | | | बाकी खतावणी ब पृ० २ | १६१३ | ३ | ८५ |
| | | | | | | | | | १८१३ | ३ | ८५ |

रिणको. गुलामखान साहेब. धनको.

| १८१६ | | | | | | १८१६ | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मे | २७ | किर्कोळ बाबद . . . | ३५ | २ | ६५ | डिसें | २४ | हिंसाबीं पुरे रोकड दिले | ३९ | ३ | ७१⅔ |
| डिसें | १८ | २२⅔ शेर साकर बाबद | ४ | १ | ६⅔ | | | | | | |
| | | | ३९ | ३ | ७१⅔ | | | | | | |

८७

(६) रिणको. गोपाळदासतुळशीदास. धनको.

| १८१६ | | रु | पा | रें | १८१६ | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जुन ३ | किर्कोळ बाबद . . . | २८५ | ३ | ७५ | नवें १५ | ४ थान मसरु बाबद . . | ४८० | ३ | ७५ |
| जुलै २१ | किर्कोळ बाबद . . . | १२६ | ३ | ७० | | | | | |
| नवें १५ | हिसाबीं पुरे रोकड दिले | ६८ | ० | ३० | | | | | |
| | | ४८० | ३ | ७५ | | | | | |

रिणको. आत्मारामबाळाजी, शिंपी. धनको.

| १८१६ | | | | | १८१६ | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जुलै ३ | किर्कोळबाबद . . . | २७६ | २ | ८०¾ | डिसें २१ | हिसाबीं पुरे रोकड दिले | २७६ | २ | ८०¾ |

रिणको. पांडुरंगरामचंद्र. धनको.

| १८१६ | | | | | १८१६ | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जुलै १० | किर्कोळबाबद . . . | १११२ | ३ | १५ | डिसें २४ | चिर्दीबाबद . . . . | ५०० | ० | ० |
| | | | | | | बाकी रवता चणीव द्व<br>२ | ६१२ | ३ | १५ |
| | | | | | | | १११२ | ३ | १५ |

(७) रिणको. नारोकृष्ण. धनको.

| १८१६. | | रु | पा | रें | १८१६. | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जुलै १७ | किर्कोळबाबद . . . | ११५ | १ | ७५ | आग १६ | चणे ८ खंडी बाबद | २५८ | २ | ० |
| २४ | किर्कोळबाबद . . . | १३० | १ | ५५ | सप्टें २४ | हिसाबीं पुरे रोकड दिले | ३७ | २ | ९५ |
| आग १९ | किर्कोळबाबद . . . | ५० | १ | ६५ | | | | | |
| | | २९६ | ० | ९५ | | | २९६ | ० | ९५ |

रिणको. खंडोजी, रंगारी. धनको.

| १८१६ | | रु | पा | रें | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| आग २१ | किर्कोळबाबद . . . | ५७२ | १ | २० | | बाकी खतावणी ब पृ २ | ५७२ | १ | २० |

रिणको. खंडोजी तुकाजी, मेस्त्री. धनको.

| १८१६ | | रु | पा | रें | १८१६. | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| आग २६ | किर्कोळबाबद . . . | १६२ | ० | ३५ | अक्टो २३ | रोकडबाबद . . . | १०० | ० | ० |
| | | | | | | बाकी खतावणी ब पृ ३ | ६२ | ० | ३५ |
| | | | | | | | १६२ | ० | ३५ |

वहिवाटवही, एकेरी रिति.

(८) रिणको: गोविंदराव.कुळकरणी. धनको.

| | | रु | पा | रें | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१५ | | | | | १८१६ | | | | |
| सप्टें ३ | १ आंगवस्त्रजोडीबाबद | २ | ३ | २५ | डिसें २८ | हिंसाबीं पुरे रोकड दिले | १६२ | ० | २½ |
| १६ | १० चिनई परवे बाबद | २६ | ३ | ९५ | | | | | |
| २७ | फीतबाबद | ९० | ० | ३७½ | | | | | |
| अक २३ | किर्कोळबाबद | ४२ | ० | ४५ | | | | | |
| | | १६२ | ० | २½ | | | | | |

रिणको. तुळशीराम,कोष्टी. धनको.

| | | रु | पा | रें | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१६ | | | | | | | | | |
| अक २ | १४ शेर कापूसबाबद | ४ | १ | ५० | | बाकी रवतावणीवपृ३ | १४ | ३ | ५० |
| ३० | किर्कोळबाबद | १० | २ | ० | | | | | |
| | | १४ | ३ | ५० | | | | | |

रिणको. मैनुदिन,बोहोरी. धनको.

| | | रु | पा | रें | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | १८१६ | | | | |
| | यासदेणे रवतावणीवपृ३ | २३४ | १ | ५० | अकटो ४ | ३० रेजीमकागदबाबद | २३४ | १ | ५० |

(९) रिणको. गोविंदनारायणखेत्री. धनको.

| १८१६ | | रु | पा | रे | १८१६ | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | बाकी ए २ | १३३ | १ | २० | अक २५ | हिंसाबीं पुरेशेकडदि. | २५० | २ | ६२½ |
| अक ७ | २७½याईमशरूबाबद | ६३ | १ | ४२½ | | | | | |
| १२ | ४० याईबासताबाबद | ५४ | ० | ० | | | | | |
| | | २५० | २ | ६२½ | | | | | |

रिणको. नबाबखानफत्तेखान. धनको.

| १८१६ | | रु | पा | रे | १८१६ | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अक १० | किर्कोळबाबद . . . | १४६ | १ | ५० | नवें ४ | ३०धोत्रजोडेवरीकडदि. | १४६ | १ | ५० |

रिणको. तुकाजीकृष्णाजीलोहार. धनको.

| १८१६ | | रु | पा | रे | १८१६ | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अक १५ | २½मणशिंसेंबाबद | २४ | ३ | ३७½ | डिसें १३ | हिंसाबींपुरेशेकडदि. | २४ | ३ | ३७½ |

रिणको. मकाजीमुकुंदजी. धनको.

| | | रु | पा | रे | १८१६ | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | यासदेणेंखतावणीबपृ४ | ११९ | २ | ५० | अक २१ | ८७याईमशरूबाबद | ११९ | २ | ५० |

(१०) रिणको. मुरारकोंडाजी,मिठाईवाला. धनको.

| १८१६ | | रु | पा | रे | १८१६ | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नवें ७ | १८½ मणसाकरबाबद | १२८ | १ | ३७½ | | | | | |
| २० | १५½ शेर खजूरबाबद | ० | ३ | १० | | | | | |
| २९ | किर्कोळबाबद . . . | २३ | २ | ४० | डिसें २० | हिंसाबीं पुरे रोकड दिले | १५२ | २ | ८७½ |
| | | १५२ | २ | ८७½ | | | | | |

रिणको. अंताजीकृष्ण,माहुलीकर. धनको.

| १८१६ | | | | | १८१६ | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नवें २२ | किर्कोळसामानबाबद | ७२ | १ | २० | नवें २६ | ४२ यार्डबास्ताबाबद | ९९ | ३ | ० |
| | यासबाकीखताव·बपृ·४ | २७ | १ | ८० | | | | | |
| | | ९९ | ३ | ० | | | | | |

रिणको. शंभुरामशास्त्री. धनको.

| १८१६ | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| डिसें ७ | ३ पुस्तकप्रतिबाबद | ४६ | ३ | ५० | | बाकीखतावणीबपृ४ | ४६ | ३ | ५० |

## रिणको. नारोविठ्ठलसुभेदार. धनको.

| | | रु | पा | रे | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१६ | | | | | | | | |
| डिसें १२ | २७३मण३०शेरतेलबा· | ७३५ | २ | ८१$\frac{3}{4}$ | बाकीखतावणीबपृ५ | ७३५ | २ | ८१$\frac{3}{4}$ |

## रिणको. गंगाधरशास्त्री. धनको.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१६ | | | | | | | | |
| डिसें २३ | ३खंडी१मणचणेबाब· | ४६ | ३ | ५० | बाकीखतावणीबपृ५ | ४६ | ३ | ५० |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१६ | रिणको | | | बाकी | धनको. | | | |
| | पुरुषोत्तमकानोबाकडूनयणे | १३८ | २ | ९० | मैनुदिनबोहोरीसदेणें | २३४ | १ | ५० |
| | पांडुरंगहरी········ | २५० | ० | ० | मकाजीमुकुंदजीसदेणें | ११९ | २ | ५० |
| | चिंतोहरी········· | ३२ | २ | ९७$\frac{1}{2}$ | अंताजीहरूमाहुलीकर | २७ | १ | ८० |
| | फत्तेखानपठाण····· | १६१३ | ३ | ८५ | | | | |
| | पांडुरंगरामचंद्र····· | ६१२ | ३ | १५ | | | | |
| | खंडोजीरंगारी······ | ५७२ | १ | २० | | | | |
| | खंडोजीतुकोजीमेस्तरी· | ६२ | ० | ३५ | | | | |
| | तुळशीरामकोष्टी···· | १४ | ३ | ५० | | | | |
| | शंभुरामशास्त्री ···· | ४६ | ३ | ५० | | | | |
| | नारोविठ्ठलसुभेदार·· | ७३५ | २ | ८१$\frac{3}{4}$ | | | | |
| | गंगाधरशास्त्री····· | ४६ | ३ | ५० | | | | |
| | | ४१२६ | ३ | ७२$\frac{3}{4}$ | | ३८१ | १ | ८० |

## अनुक्रमणिका,खलावणी,ब.

# अनुक्रमणिका खतावणी. ब

## वहिवाटबही, एकेरी रीति.

(१) रिणको. पुरुषोत्तम कानोबा, पैठणकर. धनको.

| १८१७ | | रु | पा | रें | १८१७ | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | याजकडून येणें पृ१ खतावणी, अ | १३८ | २ | १० | | | | | |

रिणको. पांडुरंग हरी. धनको.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१७ | | | | | १८१७ | | | | |
| | याजकडून येणें पृ ३ खतावणी, अ | २५० | ० | ० | | | | | |

रिणको. चिंतो हरी. धनको.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१७ | | | | | १८१७ | | | | |
| | याजकडून येणें पृ४ खतावणी, अ | ३२ | २ | १७½ | | | | | |

## खतावणी, ब.

(२)

| | | रु | पा | रें | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | रिणको. फत्तेखान,पठाण. | | | | धनको. | | | | |
| १८१७ | याजकडून येणें पृ५खतावणी,अ | १६१३ | ३ | ८५ | १८१७ | | | | |
| | रिणको. पांडुरंगरामचंद्र. | | | | धनको. | | | | |
| १८१७ | याजकडून येणें पृ६खतावणी,अ | ६१२ | ३ | १५ | १८१७ | | | | |
| | रिणको. खंडोजी,रंगारी. | | | | धनको. | | | | |
| १८१७ | याजकडून येणें पृ७खतावणी,अ | ५०२ | १ | २० | १८१७ | | | | |

(३) रिणको. खंडोजीतुकोजी,मेस्तरी. धनको.

| | | रु | पा | रें | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१७ | | | | | १८१७ | | | | |
| | याजकडून येणें पृ७ खतावणी,अ | ६२ | ० | ३५ | | | | | |

रिणको. तुळशीराम,कोष्टी. धनको.

| | | रु | पा | रें | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१७ | | | | | १८१७ | | | | |
| | याजकडून येणें पृ८ खतावणी,अ | १४ | ३ | ५० | | | | | |

रिणको. मैनुदिन,बोहोरी. धनको.

| | | रु | पा | रें | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१७ | | | | | १८१७ | | | | |
| | | | | | | याला देणें पृ८ खतावणी,अ | २३४ | १ | ५० |

| | रिणको | | | | मकाजी मुकुंदजी | धनको | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (४) | | रु | पा | रें | १८१७ | | रु | पा | रें |
| | | | | | | याला देणें पृ९ खतावणी अ | ११९ | २ | ५० |

| | रिणको | | | | अंताजी कृष्णा माहुलीकर | धनको | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | १८१७ | याला देणें पृ१० खतावणी,अ | २७ | १ | ८० |

| | रिणको | | | | त्रांभुराम शास्त्री | धनको | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१७ | याजकडून येणें पृ१० खतावणी,अ | ४६ | २ | ५० | | | | | |

(५) रिणको — नारोविठ्ठल,रुभेदार — धनको

| | | रु | पा | रें | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१७ | याजकडूनयेणें पृ ११खतावणी,अ | ७३५ | २ | ८१¾ | | | | |

रिणको — गंगाधरशास्त्री — धनको

| | | रु | पा | रें | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८१७ | याजकडून येणें पृ ११खतावणी,अ | ४६ | ३ | ५० | | | | |

# दुहेरी वहिवाटवही.

यारीतीस दुहेरी ह्मणतात, कारण, खतावणीमध्यें प्रत्येक रकमा दोनवेळ लिहितात; ह्मणजे एकहिंसाबांत रिणकोखालीं, आणि दुसऱ्यें हिंसाबांत धनकोखालीं.

या रीतींत प्रायशः तीन पुस्तकें ठेवितात, ह्मणजे खर्डा, रोजकीर्द, आणि खतावणी; या प्रत्येकांची लाहान कथा सांगतो.

## प्रथम, खर्ड्याची.

खर्ड्यामध्यें पुरुषाची मालमत्ता आणि कर्जाची याद लिहितात; आणि याशिवाय त्याचे देण्याघेण्याच्या सर्व रकमा अनुक्रमें तारिखवार लिहितात.

पुरुषाची मालमत्ता आणि कर्ज हें खर्ड्याचे आरंभीं लिहितात, ह्मणजे जेव्हां पुरुष व्यापारांत शिरतो तेव्हां आरंभीं आपली मालमत्ता आणि कर्ज हें सर्व शोधून त्याची यथास्थित याद लिहितो; परंतु त्यानंतर वर्षोवर्ष ती याद जुन्ये पुस्तकांतून बाकींत नव्ये पुस्तकांत आणितो.

असें केल्यावर व्यापारांत सर्व देण्याघेण्याचे रकमांची केवळ याद लिहितात, आणि तीचे समागमें तारीख, पुरुषाचें नांव, देण्याघेण्याचा संकेत, मालाचा भाव, किरकोळाचा पैका, आणि दुसरेंही कांहीं लिहितात, कीं ज्यापासून प्रत्येक रकमा त्वरेनें समजांत येतील; या सर्व करण्याची रीति पुढील खर्ड्याचे नमुन्यावरून कळेल.

दुसरी

## दुसरी रोजकीर्दीची.

देण्याघेण्याच्या ज्या रकमा खड्यांत लिहिल्या आहेत, त्या धनको रिणको शोधून यथास्थित सिद्ध करून रोजकीर्दींत लिहितात, अशा कीं, त्यांतून खतावणींत नेतां येतील.

रोजकीर्दीची लिहिण्याची व आंकण्याची रीति खड्याप्रमाणेंच आहे; परंतु त्यांत विशेष इतकाच आहे, कीं, रकमा शोधून रिणको धनकोखालीं लिहितात.

खर्डा आणि रोजकीर्द यांचे पृष्ठांची उजवी बाजू रुपये, पावले, आणि रेस, लिहावयासाठीं तीन रेघांनीं आंकितात, आणि पुढील पुढील पुस्तकांत ती रकम कोणत्ये पृष्ठावर आहे तो पृष्ठप्रकाशक लिहावयाकरितां डावी बाजू एक रेघेनें आंकितात, म्हणजे खर्ड्याचे डाव्ये बाजूचा अंक जो आहे तो दाखवितो कीं हीसमोरची रकम रोजकीर्दींत कोणत्ये पृष्ठावर आहे; आणि रोजकीर्दीचे डाव्ये बाजूवरील अंक दाखवितो कीं ती रकम खतावणींत कोणत्ये पृष्ठार आहे.

## तिसरी खतावणीची.

हिंसाबाचा वेगळाल्या रकमा ज्या रोजकीर्दींत अनेक पृष्ठांवर पसरल्या आहेत त्या सर्व एकत्र जुळून खतावणींत नियमित एकस्थळीं लिहितात; रिणको भाग हिंसाबाचे पृष्ठाचे एकबाजूवर लिहितात, आणि धनको भाग त्याच पृष्ठाचे दुसर्ये बाजूवर समोर लिहितात. अशानें प्रत्येक हिंसाबाचा सर्व रकमा एकस्थळीं एकसमयींच लक्ष्यांत येतात.

तेंर खतावणी आणि दुसरीं दोन पुस्तकें यांचे रूपांत अंतर फार आहे; खतावणीचीं प्रत्येक पृष्ठें मध्यभागीं वरपासून खालींपर्यंत उभ्ये एकरेघेनें आंकिलीं आहेत, तेणेंकरून त्यांचे बरोबर दोन दोन भाग होतात, त्यांत डाव्येकडील भागांत हिसाबांचा रिणको रकमा लिहितात, आणि उजव्येकडील भागांत त्याच हिसाबांचा धनको रकमा लिहितात, ह्मणोन पृष्ठाचे डाव्येकडे शिरोभागीं रिणको शब्द लिहितात, आणि उजव्येकडे धनको शब्द; आणि या दोहोंचे मध्यें त्याच ओळींत हिसाबाचें नाम लिहितात. प्रत्येक भागाची उजवी बाजू पैस्याकरितां तीन रेघांनीं आंकितात, आणि तोच हिसाब दुसर्‍ये कोणत्ये पृष्ठावर आहे तें दाखवायाकरितां चौथी रेघ करितात; आणि डावी बाजू एकरेघेनें आंकितात, तेथें प्रतिरकमेचे समोर तारीख लिहितात.

जेजे पुरुष हिसाबांत येतात, त्यांचे नावांची अनुक्रमणिका खतावणीचे आरंभीं लिहितात; आणि ज्याचा हिसाब जा पृष्ठावर आहे त्या पृष्ठाचा अंक त्यानावाचे समोर लिहितात, तेणेंकरून लवकर समजांत येतें.

## शिकणारांस शिक्षामार्ग.

पुढील मेस्तकाप्रमाणें आपआपल्या वह्या आंकून त्यांतील खडर्यांत देण्याघेण्याचा रकमा लिहिल्या आहेत त्याप्रमाणें अनुक्रमें आपलाल्ये खर्डावहींत एक महिन्याचा रकमा लिहा; परंतु डाव्ये बाजूवर पृष्ठप्रकाशक अंक लिहिले आहेत ते लिहूं नका. त्यांचे लिहिण्याची रीति पुढें सांगेन; नंतर तुह्मीं हिसाबांत सिद्ध आणि चतुर व्हायासाठीं तुमचे वहींतील प्रत्येक पदार्थांचे किमतींचे दराप्रमाणें

एकंदर

एकंदर आंकडे करून ते मेस्तकाप्रमाणें आहेत असें पाहून लिहा.

नंतर या रकमा एक एक अनुक्रमें रोजकीर्दीचे मेस्तकाप्रमाणें तुह्मीं आपल्या-ल्ये रोजकीर्दीचे वहींत लिहा; आणि कोणतीही रकम खडर्यांतून रोजकीर्दीचे वहीं-त लिहिली ह्मणजे तत्काळ त्या रोजकीर्दवहीचे पृष्ठाचा अंक खडर्यांत त्याच रकमे-चे समोर डाव्ये बाजूस लिहावा. रोजकीर्दींत तारीख लिहिण्याची रीति खडर्याप्र-माणेंच आहे; आणि वेगळाल्ये रकमांचें लिहिणें पुढें सांगतो या दोन रीतीं प्रमाणें आहे.

१ केवळ एक रकम आहे, ह्मणजे जींत एकच रिणको आणि एकच धनको येतो, तेव्हां रिणको विस्तारानें लिहावा, नंतर धनको; आणि शेवटीं त्या पदार्था-चे किमतीचा आंकडा. या प्रमाणें हीं तीन एक ओळींत लिहावीं; त्याचे खालीं एक अथवा याहून अधिक ओळींत त्या व्यवहाराचें पूर्ण वर्तमान विशेष रीतीनें लिहावें, असें किं तें सर्व त्वरेनें समजांत येईल.

२ मिश्र रकमांत, वेगळाले रिणको आणि धनको किरकोळ या शब्दानें व-रचे एक ओळींत लिहावे, आणि राहिले शब्द त्याच ओळींत वर प्रमाणें लिहावे; नंतर त्याचे खालीं वेगळाले रिणको आणि धनको विशेषें करून अनुक्रमें वेगळा-ल्ये किमतींचे आंकड्यांसुद्धां एकाखालीं एक असें लिहिले पाहिजेत, नंतर त्या वेगळाल्ये आंकड्यांची बेरीज घेऊन, बेरजेचे स्थळीं लिहावी. या प्रकारांत ही चांगलें स्मरण ठेवावें. रिणको आणि धनको हे वेगळाले लिहित्येसमयीं धनको शब्दास या सह्या शब्द जोडितात. आणि रिणको हा केवळ शब्द लिहितात.

पुनः वेगळाल्या रकमा लिहित्येसमयीं रिणको काय आहे आणि धनको

काय

काय आहे हें समजायासाठीं, या पुढील रीती विचार करून पुर्तेपणें स्मरणांत ठेविल्या पाहिजेत.

१ जे पदार्थ आपल्यास पावले ते रिणकी आहेत, आणि जे पदार्थ आपण दिले ते धनकी आहेत याजकरितां, जो पदार्थ आपल्यास पावला त्याचे बदलींत जें दिलें त्यास तो पहिला पावलेला पदार्थ रिणकी आहे.

२ जो पदार्थ ठेव किंवा कर्ज ज्या पासून घेतला तो पदार्थ त्या पुरुषास रिणकी आहे.

३ ज्या पुरुषास जो पदार्थ ठेव किंवा कर्ज दिल्हा, तो पुरुष त्या दिल्हेल्ये पदार्थास रिणकी आहे.

४ वहींतील मागील आणि पुढील प्रकारांत जे भाग जातीनें अथवा स्वभावानें व्युत्क्रम आहेत ते रिणकी धनकी शब्दांनीं ही व्युत्क्रम होतात.

५ ज्या प्रकारांत रिणकी आणि धनकी दाखवायास पुरुष पदार्थादि वास्तवीक दिसत नाहीं, त्या प्रकारांत बुद्धीनें नवीं नांवें कल्पून लिहितात.

६ कठिण प्रकारांतील रिणकी, धनकी, पूर्व सांगीतल्ये रीतींचा एकत्र विचार केल्यापासून कळतील.

जेथे रिणकी आणि धनकी लिहायास वास्तवीक पुरुषपदार्थादि नांवें दिसत नाहींत तेथे बुद्धीनें नवीं कल्पितात, तीं प्रायशः हीं आहेत. १, मालमत्ता, ह्मणजे यादींत लिहिल्ये सर्व पदार्थाबाबद धनकी मालमत्ता हा शब्द आहे. आणि त्याच यादींत लिहिल्ये कर्जाबाबद रिणकी तोच शब्द आहे; २, लाभहानि, जी रोकड कोणास दिल्ही तीचे बदलींत कांहीं ही येण्याची आशा नाहीं;

अथवा

अथवा व्यवहारीं देण्या घेण्याचे संकेतांत किंवा मालावर कांहीं तोटा आला, तर या दोन कलमां बाबद तो लाभहानि शब्द रिणको आहे, आणि व्यवहारांत माल इत्यादिकांवर जो नफा होतो त्या बाबद हा लाभहानिशब्द धनको आहे. ३, अमुकस्थळाहून अमुकस्थळास गलबताची सफर, जे पदार्थ नौकामार्गें देशांतरीं अथवा स्थळांतरीं विकावयास पाठविले त्यांजवर जो खर्च होतो त्या बाबद रिणको ते शब्द आहेत, आणि त्या पदार्थांपासून जें फळ होतें त्या बाबद धनको ते शब्द आहेत, या शिवाय वेगळालीं नांवें आहेत तीं पुढील मेस्तक पहिल्यानें कळतील.

एक महिन्याचा रकमा रोजकीर्दींत लिहिल्यावर त्या या प्रमाणें खतावणींत लिहीत चलावें, प्रत्येक रकम दोन वेळा लिहावी, ह्मणजे एक वेळ रिणको बाजूस, आणि दुसर्‍यें वेळेस धनको बाजूस, ह्मणजे ती रकम जा हिंसाबांत रिणको आहे त्या हिंसाबांत रिणको बाजूस, आणि तीच रकम जा हिंसाबांत धनको आहे त्या हिंसाबांत धनको बाजूस, या वेगळाल्ये हिंसाबांत त्या त्या खात्यांतील सर्व रकमा लिहावयास पुरेल अशी जागा सुमारानें ठेवावी. आणि प्रत्येक रकम लिहित्ये समयीं तीचें नांव आणि खतावणीचे पृष्ठाचा अंक असें अनुक्रमणिकेंत लिहिलें पाहिजे. जेह्मां रिणको बाजूस लिहावयाची तेह्मां धनको नामास यास हें पद जोडून लिहावें; नंतर त्या रकमेंतील पदार्थांचे संकेत लिहावे. जसें, किमत, समुदाय, इत्यादि. तदनंतर त्या पदार्थांचा जो एकंदर पैका होतो तो पैक्याचे स्थळीं लिहावा; आणि तो हिंसाब धनको बाजूस कोणते पृष्ठावर येतो तो पृष्ठांक पृष्ठांकाचे स्थळीं लिहावा. जसें मेस्तकांत आ-

हे

हे. आणि प्रत्येक रकमेचे डाव्ये बाजूस त्याची वेगळाली तारीख लिहावी. जेव्हां धनको बाजूस लिहावयाची तेव्हां रिणको नामास याणें हें पद जोडून लिहावें, आणि ही रकम खतावणींत कोणत्ये पृष्ठावर रिणको बाजूस आहे तो पृष्ठांक पृष्ठांकस्थळीं लिहावा; नंतर तारीख, एकंदर पैका, इत्यादि सर्व पूर्वप्रमाणें लिहावें. असें झाल्यावर रोजकीर्दींत या रकमेचें स्थळ पाहावें, आणि ही रकम खतावणींत ज्या पृष्ठावर रिणको बाजूस आहे. त्या पृष्ठाचा अंक वर, आणि त्यांतच ज्या पृष्ठावर धनको बाजूस आहे त्या पृष्ठाचा अंक खालीं, असें व्यवहारी अपूर्णांकरीतीनें त्यास्थळीं डाव्ये बाजूस लिहावें; परंतु जेव्हां रोजकीर्दींत रिणको रकमा अनेक पृष्ठांवर आहेत तेव्हां धनको पृष्ठांक एकवेळ लिहावा, ह्मणजे सर्व रिणको पृष्ठांक एकाखालीं एक लिहून खालीं रेघ करून त्याचे खालीं तो एक धनको पृष्ठांक लिहावा; आणि जेव्हां धनको पृष्ठांक अनेक आहेत तेव्हां असेंच, एक रिणको पृष्ठांक असेल तो लिहून खालीं रेघ करून त्या खालीं ते अनेक धनको पृष्ठांक लिहावे,

यारीतीनें रोजकीर्दींतील एक महिन्याचा वेगळ्याल्या सर्व रकमा खतावणींत लिहून दुसर्ये एक महिन्याचा हिसाब पूर्व प्रमाणें तुह्मी आपआपल्ये खर्ड्यांत लिहावा. त्याजवरून रोजकीर्दींत, आणि रोजकीर्दीवरून खतावणींत; यानंतर असाच तिसर्ये महिन्याचा हिसाब लिहावा. या प्रमाणें पुढें ही वर्ष संपेपर्यंत. वेगळाल्ये खात्यांत खालीं दुसर्या रकमा लिहावयासाठीं सुमारानें जागा ठेविल्या आहां त्यांत दुसर्या रकमा लिहितां लिहितां कदाचित् ती जागा भरून रकमा लिहावयाच्या राहिल्या तर याच नमुन्याचे पुढील खतावणींत दोन उदाहरणें पैका, आणि लाभहानि, यांचीं खातीं लिहिलीं आहेत त्यां प्रमाणें खातें

तेथें

तेथें बंद करून दुसर्‍येस्थळीं पाडावें. आणि पूर्वी खातें बंद करितेसमयीं त्यांतील रिणकी आणि धनकी यांचे बेरिजांचें अंतर रिणकी असल्यास नव्ये खात्यांत धनकीकडे लिहावें. आणि तें धनकी असल्यास रिणकीकडे. असें दोन उदाहरणांत लिहिलें आहे.

वेगळालीं खातीं वर सांगीतल्या प्रमाणें खतावणींत लिहिल्यावर, तीं या प्रमाणें बराबर करावीं; सर्व खात्यांचे दोनदोन बाजूंचा वेगळाल्या बेरिजा घ्यावा. परंतु कोणत्येही खात्याचे दोन बाजूचा बेरिजा जर विषम येतील तर त्या लिहिल्याचे पूर्वीं जी बेरीज हलकी येणारी असेल ती त्यांतील अंतरानें वाढवून, दुसरीचे बराबर करून, मग दोनही बेरीजा लिहाव्या. या अंतरास प्रायशः बाकी आणि लाभहानि या शब्दांनीं लिहितात. त्यांत रिणकी बाजूस यास आणि धनकी बाजूस याणें हे शब्द त्या शब्दांस लावितात; कांकिं, या दोन खात्यांनीं सर्व हिंसाबाची बरोबरी होत्ये. जा खात्यांत लाभ किंवा हानि आली त्या खात्यास लाभहानि शब्दाचे रकमेनें बरोबर करितात. आणि जा खात्यांतील कांहींमालमत्ता किंवा दुसरा पदार्थ आपल्ये जवळ शेष राहिला किंवा आपण दुसर्‍याचें देणें किंवा दुसर्‍याकडून आपलें येणें असें असेल त्यास बाकी शब्दाचे रकमेनें बरोबर करितात. या रीतीनें केलें असतां सर्व लाभ आणि सर्व हानि लाभहानीचे खात्यांत एकत्र होतात. तसें सर्वमालमत्ता आणि कर्ज हीं दुसर्‍येस्थळीं बाकीचे खात्यांत एकत्र होतात. याजकरितां बाकी आणि लाभहानि या दोन खात्यांस मालमत्तेनें बरोबर करून तीं अंतरें मालमत्तेचे खात्यांत लिहून त्या खात्याचे दोन बाजूंचा बेरीजा घ्याव्या, त्या बरोबर आल्या ह्मणजे सर्व हिंसाब खरा; आणि त्या बरोबर

नआल्या

न आल्या ह्मणजे हिंसाबांत चूक आहे आणून त्या बेरीजा बरोबर येत पर्यंत तो हिंसाब पुनःपुनः तपासावा.

असें आल्यावर एक वर्षाचे हिंसाबाचा वह्या पुर्या आल्या, नंतर दुसर्थे वर्षाचा वह्या कर्त्यें समयीं आरंभीं खडर्यांत मालमत्तेची याद असावी ती पूर्व वर्षाचे खतावणीचे बाकी खातां तून घेऊन लिहावी. कांकिं, तीबाकी, पुरुषाची त्या समयींची संपत्ति दाखविल्ये.

कित्येक शिकवणारांचे मनांत येतें कीं खर्डा आणि खतावणी अशा दोनच वह्या कराव्या; तर त्यांहीं आपल्ये शिकणारांस खडर्यावरून खतावणी करण्याविषयींचा आज्ञा कराव्या, आतां हें काम सुगमरीतीनें समजायासाठीं काहीं रीति सांगतो.

१ हिंसाब लिहिल्ये समयीं आरंभीं मालमत्ता आणि दुसर्याचें देणें या दोन यादी खडर्यांतून घेऊन लिहाव्या: — याजकरितां जे पदार्थ तुह्मांजवळ आहेत ते प्रत्येक (त्यांचें तोल, माप, व त्याप्रमाणें त्याची किमत, आणि समुदाय, लिहून) ते, मालमत्तेस रिणको करावे; आणि नंतर मालमत्ता किर्कोळानें (त्यासर्वांचीबेरीजलिहून) धनको करावी, अथवा वेगळाल्ये पदार्थांनें. (त्याची त्याची वेगळाली किमत लिहून) पुनःतुह्मीं जें लोकाचें देणें आहे त्याबाबद मालमत्ता किर्कोळास रिणको करावी; आणि ते प्रत्येक पदार्थ जांचा ऐवज तुह्मीं देणें (किमत, समुदा, आणि पुरुष लिहून) मालमत्तेनें धनको करावे.

२ जेव्हां तुह्मीं रोकड देऊन माल घेतां. — तो माल (किमत, आणि समुदाय, लिहून) पैक्यास रिणको करावा; आणि (किमत, समुदाय, न लिहून) मालानें पैका धनको करावा.

३जेव्हां

३ जेव्हां तुह्मी माल उधार घेतां — माल (किमत, आणि समुदाय, लिहून) जो ज्या-पासून घेतला त्या पुरुषास रिणको करावा; आणि तो पुरुष त्या मालानें धनको करावा.

४ जेव्हां तुह्मीं माल घेऊन त्याचे ऐवजांत कांहीं रोकड देऊन, कांहीं उधार ठेवितां — माल (किमत आणि समुदाय लिहून) रिणको किर्कोळास; आणि जितक्ये मालाचा पैका रोकड दिला तितक्ये मालानें पैका धनको; आणि ज्या पासून माल घेतला तो पुरुष धनको, जो पैका उधार राहिला तितक्या बाकीनें; — जर त्यांतून कांहीं चिटी दिलीत स्वतांची किंवा दुसर्‍ये कोणाची. तर जाणें त्या चिटीचा ऐवज भरायाचा तो पुरुष धनको त्या चिटीनें. (त्या चिटीची किमत आणि कोणास पैका यावयाचा हीं दोनही लिहिलीं पाहिजेत).

५ जेव्हां तुह्मीं माल घेतां आणि त्याचे ऐवजाची दुसर्‍यावर चिटी देता — माल (किमत आणि समुदाय लिहून) रिणको ज्याजवर चिटी दिली त्या पुरुषास; आणि त्या चिटीचा पैका घेणारा धनको त्याजवर चिटीनें, आणि त्या चिटीचा ऐवज ज्या पासून माल घेतला त्यास मिळायाचा.

६ जेव्हां तुह्मीं गलबताचा भाग मोलें घेतां. — गलबत (त्याचें नांव लिहून) रिणको पैक्यास. (आपला भाग लिहून); आणि पैका धनको गलबतानें, (आपला भाग आणि त्या भागास पडलेलें मोल ऐशीं दोन ही लिहून).

७ जेव्हां तुह्मी दूर देशींचा माल कोणापासून आपल्ये माथीं जोखम कबूल करून घेतां. — माल (किमत आणि समुदाय लिहून) रिणको सफरेस. (कोण स्थळाहून सफर तें लिहिलें पाहिजे); आणि सफर धनको मालानें.

८ जेव्हां दुसर्‍याचा विकाउ माल तुह्मांवर येतो आणि त्याचा नीर इत्यादि

खर्च

खर्च तुह्मीं देतां.—त्या पुरुषाचा माल रिणको पैक्यास, (काय बाबदनें लिहावें); आणि पैका धनको नोर इत्यादिकानें, (त्या पुरुषाचे मालावर).

९ जेह्वां तुह्मीं माल विकून त्याचा ऐवज रोकड घेतां.—पैका रिणको मालास, (किमत आणि समुदाय न लिहून); आणि माल (किमत आणि समुदाय लिहून) धनको पैक्यानें.

१० जेह्वां तुह्मीं माल उधार विकितां.—ज्या पुरुषास विकत दिला तो पुरुष रिणको मालास, (किमत आणि समुदाय यांचे लिहिणें ऐछिक); आणि माल धनको त्या पुरुषानें.

११ जेह्वां तुह्मीं माल विकितां त्यांत कांहीं ऐवज रोकड येऊन कांहीं उधार राहातो.—पैका रिणको मालास, जितक्याचा पैका पावला; आणि माल घेणारा रिणको मालास, बाकी विषयीं, आणि माल (किमत आणि समुदाय लिहून) धनको किर्कोळानें.

१२ जेव्हां तुह्मीं एक जातीचा माल घेऊन त्याचे बरोबर किमतीचा दुसर्या जातीचा माल विनिमयानें देतां.—घेतलेला माल रिणको दिलेल्ये मालास, (किमत आणि समुदाय लिहून); आणि दिलेला माल धनको घेतलेल्ये मालानें, (किमत आणि समुदाय लिहून).

१३ जेव्हां तुह्मीं माल विकत देऊन त्याचे ऐवजांत कांहीं माल विनिमयानें घेऊन बाकी रोकड घेतां.—घेतलेला माल रिणको तितक्याच किमतीचे दिलेल्ये मालास; आणि पैकाही रिणको तितक्याच किमतीचे दिलेल्ये मालास; आणि दिलेला माल धनको किर्कोळानें.

१४ जेव्हां तुह्मीं माल विकत देऊन त्या ऐवजाची दुसर्यावर चिठी घेतां.—जाज-

वर

वर चिटी घेतली तो पुरुष रिणको चिटीस, (चिटी ज्यापासून मिळाली); आणि माल (किमत, समुदाय, लिहून) धनको चिटीनें, (कोणावर चिटी आहे तें लिहावें).— अथवा भरणा चिटी रिणको करावी.

१५ जेव्हां तुह्मीं माल विकत देऊन त्या ऐवजांत कांहीं रोकड घेऊन बाकीची चिटी घेतां.— पैका रिणको मालास, जितक्याचा पैका पावला; आणि भरणा चिटी रिणको बाकीस; आणि माल (किमत, समुदाय, लिहून) धनको किर्कोळानें.

१६ जेव्हां तुह्मीं जोखम आपल्येमाथीं ठेवून माल परदेशीं आडतीकडे पाठवितां.— सफर रिणको मालास, एथें माल किर्कोळ शब्दानें लिहावा, अथवा वेगळाल्या रकमा लिहाव्या; आणि माल (किमत समुदाय सुद्धां वेगळाल्या रकमा लिहून) धनको सफरेनें; आणि पैका धनको जकात इत्यादि खर्चानें.

१७ जेव्हां तुह्मीं दुसर्‍याकडे माल पाठवितां तो त्याणें विकावा अथवा माघारां पाठवावा या संकेतानें.— आंगड खातें रिणको मालास; आणि माल (किमत आणि समुदाय लिहून) धनको आंगड खात्यानें.

१८ जेव्हां तुह्मांकडे विकाउ आलेला दुसर्‍याचा माल तुह्मीं विकून रोकड ऐवज घेतां.— पैका रिणको त्या पुरुषाचे मालास; आणि त्या पुरुषाचा माल धनको पैक्यानें.

१९ जेव्हां तुह्मांकडे आलेला दुसर्‍याचा विकाउ माल सर्व तुह्मीं विकून आपली दलाली लिहितां.— पुरुषाच्या माल रिणको लाभहानीस, दलाली बाबद; आणि लाभहानी धनको पुरुषाचे मालानें.

२० जेव्हां तुह्मीं माल आपल्ये खातीं परदेशीं विकायास कोणाकडे पाठवितां:— ज्या ज्या गांवीं माल पाठविला ती सफर रिणको किर्कोळास; आणि माल, प्रत्येक रकम.

(किमत

(किमत आणि समुदाय लिहून) धनको त्या आगेचे सफरेनें; आणि पैका धनको जकात इत्यादि खर्चानें.

२१ जेव्हां तुह्मीं कोणा पुरुषाचा माल आपल्याशीं सर्कतींत विकायास पाठवितां.— पुरुषाचें सर्कतखातें रिणको मालास, स्वतांचे भागाबाबद; आणि तो पुरुष स्वतां रिणको मालास, त्याचे भाग बाबद; (या दोनही स्थळीं किमत आणि समुदाय हें लिहावें); आणि माल (किमत आणि समुदाय लिहून) धनको किर्कोळानें.

२२ जेव्हां सर्कतींतील माल तुह्मीं विकत देतां.— पैका रिणको सर्कतींतील मालास, (सर्कतींचीं नावें लिहावीं); आणि माल (किमत आणि समुदाय लिहून) धनको पैक्यानें.

२३ जेव्हां तुह्मीं सर्कतींतील माल उधार विकितां.— जास विकत दिला तो पुरुष रिणको सर्कतींतील मालास; आणि माल (किमत आणि समुदाय लिहून) धनको जास विकत दिला त्या पुरुषानें, जर त्यापैकीं कांहीं ऐवज रोकड पावला आणि कांहीं बाकी राहिला, तर पुरुष आणि पैका हे अनुक्रमें रिणको सर्कतींतील मालास; आणि माल धनको किर्कोळानें.

२४ जेव्हां सर्कतींतील उधार विकल्से मालाचा ऐवज पावला.— पैका रिणको जापासून पैका पावला त्या पुरुषास; आणि तो पुरुष धनको पैक्यानें.

२५ जेव्हां तुह्मीं दुसर्यास पैका देतां.— जास पैका दिला तो पुरुष रिणको पैक्यास, (पूर्ण किंवा पैकीं हें लिहिलें पाहिजे); आणि पैका धनको त्या पुरुषानें.

२६ जेव्हां तुह्मीं दुसर्यावर चिटी करून, पैका देतां, किंवा कर्ज चुकवितां.— ज्याचे हातांत ऐवजांत चिटी दिली तो पुरुष रिणको चिटीस, (कोणावर आणि किती पैका हें लिहिलें पाहिजे); आणि ज्याजवर केली तो पुरुष धनको चिटीनें, जी चिटी

त्याणें

त्याणें भरायाची, आते ह्यानीं दिली त्यास, (किती पैका तें लिहून).

२७ जेव्हां तुह्मीं खत घेऊन आंगावर अथवा आमीन घेऊन पैका देतां. — आसपैका उधार दिला तो (खतांतील संकेत आणि उधाराचें एकंदर लिहून) पुरुष रिणको पैक्यास; आणि पैका धनको उधार घेणारानें, (आमीनाच्या संकेत लिहावा).

२८ जेव्हां तुह्मीं चाकरांचें वेतन, घरखर्च, इत्यादि चुकवून देतां. — लाभहानि रिणको चाकरांचें वेतन, घरखर्च, इत्यादिकास; आणि पैका धनको चाकरांचें वेतन, घरखर्च इत्यादिकानें.

२९ जेव्हां कोणाकडून ऐवज येणें होता तो तुह्मांस पावला. — पैका रिणको पुरुषास, पैका जाणें भरिला; आणि तो पुरुष धनको पैक्यानें, (पूर्ण किंवा पैकीं हें लिहावें).

३० जेव्हां तुह्मीं गलबताचे भागाच्या लाभ घेतां. — पैका रिणको गलबतास; आणि गलबत धनको पैक्यानें, (लाभाचे भागाबाबद).

३१ जेव्हां तुह्मीं उधार पैक्याचें व्याज घेतां. — पैका रिणको (कायबाबद तें लिहिलें पाहिजे) लाभहानीस; आणि लाभहानि (कायबाबद तें लिहावें) धनको पैक्यानें.

३२ जेव्हां तुह्मीं चिटीची मुदत पिकल्याचे पूर्वीं चिटीचा ऐवज घेतां. — पैका रिणको भरणा चिटीस, (कोणापासून भरणा आला तें लिहावें); आणि भरणा चिटी धनको पैक्यानें, (तसें कोणापासून भरणा तें लिहावें).

३३ जेव्हां मृतपत्रांतील दत्त तुह्मांस यावयाचें आहे. — कैलासवासी फलाण्याचा कारभारी रिणको लाभहानीस; आणि लाभहानी धनको कैलासवासी

फलाण्याचे कारभार्यानें.

३४ जेव्हां तुह्मीं कोणात्ये आगेचे अथवा आगेपासूनचे सफरेचा खर्च चुकवून देतां.—सफर रिणको पैक्यास (काय बाबदनें लिहावें), आणि पैका धनको सफरेनें.

३५ जेव्हां तुह्मीं गलबताचा नोर घेतां.—पैका रिणको गलबतास; आणि गलबत धनको पैक्यानें, (नोर बाबद लिहावें).

३६ जेव्हां तुह्मीं गलबताचा विमा करितां.—गलबत रिणको पैक्यास; (विमा बाबद); आणि पैका धनको गलबतानें, (विमा बाबद).

३७ जेव्हां तुह्मीं गलबताचे डागडुजीचा पैका चुकवून देतां.—गलबत रिणको पैक्यास, (डागडुजी बाबद); आणि पैका धनको गलबतानें, (डागडुजी बाबद).

३८ जेव्हां तुह्मीं सर्कतींतील मालबाबद खर्चाचा पैका देतां.—सर्कतींतील माल रिणको पैक्यास; आणि पैका धनको सर्कतींतील मालानें.

३९ जेव्हां तुह्मीं सर्कतींतील कांहीं माल विकिला आणि त्याचे उत्पन्नाचे भाग त्या सर्कतींस तुह्मीं वांटून देतां.—दलाली आणि खर्च वजा करून, तो पुरुष रिणको पैक्यास (बाबद मालावरील लाभाचा त्याचा भाग); आणि पैका धनको त्या पुरुषानें, (बाबद मालावरील लाभाचा त्याचा भाग); आणि सर्वबाबद पैका रिणको मालास; आणि माल धनको पैक्यानें.

४० जेव्हां तुह्मीं चिठीचें रवतानें किंवा दुसर्‍यें आमीन इत्यादिकाचें मुद्दल आणि व्याज पावतां.—पैका रिणको पैका भरणार्‍ये पुरुषास, (कायआतीचा आमीन असेल तें लिहावें); आणि पुरुष धनको पैक्यानें, (पूर्ण मुद्दलबाबद) आणि लाभहानि: (व्याजबाबद).

४१ जेव्हां कोणी कर्जदार दिवाळें काढून दामाशाई करितो.— पैका रिणको नि-तक्ये पैक्यास, जितका तुह्मांस पावला, आणि लाभहानी रिणको नितक्ये पैक्यास, जितकी खूट आली; आणि कर्जदार स्वतां धनको किर्कोळानें पूर्ण.

४२ जेव्हां तुह्मीं कोणावर पैक्याची चिटी देतां.— पैका रिणको भरणा चिटीस; आणि भरणा चिटी धनको पैक्यानें.

४३ जेव्हां तुह्मीं वेगळाल्ये जातींचा माल देऊन विनिमयांत वेगळाल्ये जातींचा माल घेतां.— ज्यांशीं विनिमय केला ते पुरुष रिणको किर्कोळास; आणि प्रत्येक जा-तींचा दिलेला माल (किमत आणि समुदाय लिहून) धनको त्या पुरुषानें; पुनः प्रत्येक जातींचा घेतलेला माल (किमत आणि समुदाय लिहून) रिणको ज्या पा-सून घेतला त्या पुरुषास; आणि तो पुरुष धनको किर्कोळानें.

४४ जेव्हां कोणतेही माल देऊन विनिमयांत त्यांचे बरोबर किमतींचे दुसरे मा-ल घेतां.— घेतलेले माल (किमत, समुदाय, लिहून) रिणको दिलेल्ये मालांस, (किमत, समुदाय लिहिणें ऐच्छिक); आणि दिलेले माल (किमत, समुदाय, लि-हून) धनको घेतलेल्ये मालांनीं, (किमत, समुदाय, लिहिणें ऐच्छिक).

४५ जेव्हां आंगडख्यात्यांतील माल माघारे येतात.— माघारे आलेले माल, (किमत, समुदाय, लिहून) रिणको आंगडख्यात्यास; आणि आंगडख्यातें धनको परत आलेल्ये मालांनीं, (किमत, समुदाय, न लिहून).

४६ जेव्हां सफरेस पाठविल्ये मालाचे विक्रीची सूचना आली.— माल ज्याजवर विकायास पाठविला तो पुरुष रिणको सफरेस; आणि सफर धनको त्या पुरुषानें.

४७ जेव्हां तुह्मीं माल विकायास कोणावर पाठविला त्याणें त्या ऐवजांत तुह्मां-

कडे

कडे माल पाठविला.— त्या स्थळापासूनची सफर रिणको त्या पुरुषास, चालुखातें; आणि तो पुरुष धनको जेथून माल आला त्या स्थळापासूनचे सफरेनें; परंतु जर तो पुरुष त्या ऐवजांत भरणा चिटी पाठविती तर त्या पुरुषाचें चालुखातें रिणको भरणा चिटीस; आणि भरणा चिटी (कोणाचे नांवावर तें लिहून) धनको त्या पुरुषाचे चालुखात्यानें.

४८ जेव्हां तुह्मांकडे कोणी माल पाठविला आणि तो येऊन पावला.— माल (प्रत्येक समुदाय किमत लिहून) रिणको सफरेस, इत्यादि; आणि सफर धनको किर्कोळानें.

४९ जेव्हां तुह्मीं दुसऱ्याशीं सर्कतींत गलबत विकत घेतां.— गलबत (त्याचें नांव लिहून) रिणको तुमचे भागास, जो तुह्मीं दिला; आणि पैका धनको गलबतानें.

५० जेव्हां सर्कतींतील कांहीं माल विकावयासाठीं तुह्मीं कोणाचे हवालीं केला, आणि तो त्याणें विकून ऐवज तुह्मांकडे पाठविला.— पैका अथवा घेतलेला माल रिणको त्या पुरुषास; आणि पुरुष धनको पैक्यानें अथवा मालानें.

५१ जेव्हां तुह्मीं कोणा पुरुषाकडे त्याणें मागीतल्याप्रमाणें माल पाठवितां.— ज्याजकडे पाठविला तो पुरुष रिणको मालास, (किमत समुदाय लिहून); आणि माल (किमत समुदाय लिहून) धनको त्या पुरुषानें.— जर वेगळाल्ये जातींचा माल त्याणें मागीतला आणि तो आपल्ये वखारींत नाहीं, परंतु त्याचे आज्ञेप्रमाणें विकत घेऊन पाठवितां तर त्या पुरुषाचें चालुखातें रिणको किरकोळास; आणि प्रत्येक वेगळाले पदार्थ धनको त्या पुरुषाचे मालखात्यानें.

# वहिवाटवही. दुहेरीरीति.

## खर्डावही.

मुंबई, १ जानेवारी, सन १८१६.

| | | रु | पा | रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | गोविंद आत्माराम शेट, आमची मालमत्ता व देणें घेणें याची याद. | | | | | | |
| | आत्माजवळ रोकड . . . . . . . . . . . . | ५०००० | ० | ० | | | |
| | . . . . ३०० यार्ड बारीक बनात, दर यार्ड ७ रु २ पा. | २२५० | ० | ० | | | |
| | . . . १२०० यार्ड बारीक बास्ता, दर यार्ड १ रु १ पा. | १५०० | ० | ० | | | |
| | . . . . ८०० तुकडे शिंसें, सर्व मिळून वजन १७६ खंडी, दर खंडी ४० रुपये प्रा॥ | ७०४० | ० | ० | | | |
| | . . . . . ५० खंडी तूप, दर खंडी १९० रुपये प्रमाणें | ९५०० | ० | ० | | | |
| | . . . . . ९६ पेट्या साकर, सर्व मिळून वजन २८ खंडी, दर खंडी १०८ रु २ पा ७१ ३/४ रेस. | ३०४३ | ० | ० | | | |
| | वारुणगलबनाचे ३/४ . . . . . . . . . . . . | ३००० | ० | ० | | | |
| | शिवाजी कृष्ण याचा वायदे रोखा, त्याजकडोन येणें ता॥ १ मार्च मुदत पिकेल . . . | २००० | ० | ० | | | |
| | जेराम गिरधर याचें खत नवें बरता॥ १ पासून व्याज दर शेंकडा दर साल रु ५ प्रा॥ व्याजसुद्धां | ५००० | ० | ० | | | |
| | | | | | ८३३३३ | ० | ० |

# खर्डावही

| | जानेवारी १ सन १८१६ | रु | पा | रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | **आलींदेणें** | | | | | | |
| २ | एशवंतहरी यास तो मागेल ते समयीं · · | १२०० | ० | ० | | | |
| २ | चिमणलाल यास १२ तारिखेस · · · · | ८७२ | ० | ० | | | |
| २ | विसाजीकृष्ण यास हिंसाबबाबद · · · · | ६५५ | १ | ० | | | |
| | | | | | २७२७ | १ | ० |
| | ४ | | | | | | |
| २ | ४०० यार्ड बारीक दिमेटी विकत घेतली, दर यार्ड २ पावले ५० रेंस प्रमाणें रुपये · · · · · · · · · · · · | | | | २५० | ० | ० |
| | ८ | | | | | | |
| २ | एशवंतहरी यास रोकड देऊन हिंसाब चुकविला · · · · | | | | १२०० | ० | ० |
| | १२ | | | | | | |
| २ | इसाकइसुबजी यापासून गोडें तेल १८ खंडी विकत घेतलें, दर खंडी ९० रुपये प्रमाणें रुपये | | | | १६२० | ० | ० |
| | १७ | | | | | | |
| २ | चिमणलाल यास रोकड देऊन हिंसाब चुकविला · · · · | | | | ८७२ | ० | ० |

## वहिवाटवही दुहेरी रीति·

| | जानेवारी १७ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| ३ | १५० यार्ड बारीक बास्ता विकला, दर यार्ड १ रुपया २ पावले ३३ १/३ रेंस प्रमाणें रुपये· . . . . . . . . . . | २३७ | २ | ० |
| | २४ | | | |
| ३ | तिर्कमधंजी याजपासून २४० कपातें खाजूर विकत घेतला, सर्व मिळून वजन ४० १/२ खंडी, दर खंडी २३ रुपये प्रमाणें देण्याची मुदत मास २ . . . . . . . . . . | ९३१ | २ | ० |
| | ३० | | | |
| ३ | १० खंडी तूप, दर खंडी २०० रुपये प्रमाणें देऊन, त्याचे विनिमयांत, विनिमय, म्हणजे अदलाबदल, २० खं. सुपारी, दर खंडी १०० रुपये प्रमाणें घेतली · . . . . . . | २००० | ० | ० |
| | फेब्रुआरी २ | | | |
| ३ | लिंमजी भिकजी यास विकत दिल्ही १०० यार्ड बनात, दर यार्ड ९ रुपये प्रमाणें · . . . . . . . . . . | ९०० | ० | ० |

# खर्डावही

| | फेब्रूआरी ६ सन १८१६ | रु | पा | रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | श्रीमक गलबत, तांडेल धर्मसारंग, बसरास जाणार, त्याजवर सामान पुढें लिहिलें या प्रमाणें चढवून आपल्या करितां आपल्या हिंशेवीं इसमालभाईचे नावांवर पाठविलें . . . . . . . . . . . . . . | | | | | | |
| | ८०० यार्ड बारीक बास्ता, दर यार्ड १ रुपया १ पावला प्रमाणें . . . . . . | १००० | ० | ० | | | |
| | २०० यार्ड बारीक बनात, दर यार्ड ७ रुपये २ पावले प्रमाणें . . . . . | १५०० | ० | ० | | | |
| | ८ थानें किनखाप, जीं लिंमजी भिकाजी याजपासून विकत घेतलीं. दर थान १९० रुपये प्रमाणें . . . . | १५२० | ० | ० | | | |
| | जकात इत्यादि बंदर खर्च दिल्हा . . . . | २१२ | ० | ३३⅓ | | | |
| | हरीभाई व त्यांचे भागी यांणीं विमा ४००० रुपयांचा केला, दर शेंकडा ५ रु. प्रमाणें ते रुपये दिल्हे . . . | २०० | ० | ० | | | |
| | | | | | ४४३२ | ० | ३३⅓ |

## वहिवाटवही दुहेरी रीति.

| | | रु | पा | रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | फेब्रूआरी ८ सन १८१६ | | | | | | |
| ४ | चिमणलाल याजपासून विकत घेतली, १५०० यार्ड शिंधीदोटी, दर यार्ड १ रुपया ० पावले ६६ $\frac{२}{३}$ रेंस प्रमाणें · · · | | | | | | |
| | त्याचे पोटीं रोकड त्यास दिले रुपये · · | ५०० | ० | ० | | | |
| | लिंमजी भिकाजी याजवर चिटी दिल्ही रु· | ५०० | ० | ० | | | |
| | बाकीस मुदत मास १ रुपये · · · · | ७५० | ० | ० | | | |
| | | | | | १७५० | ० | ० |
| | १२ | | | | | | |
| ५ | इसाक इसुबजी यास विकत दिल्हें, ४४ खंडी तूप, दर खंडी २०० रुपये प्रमाणें · · · · · · | | | | ८८०० | ० | ० |
| | १९ | | | | | | |
| ५ | विसाजी कृष्ण यास इसाक इसुबजी याजवर चिटी दिल्ही रुपये · · · · · · · · · | | | | ५०० | ० | ० |
| | २३ | | | | | | |
| ५ | लिंमजी भिकाजी याजपासून विकत घेतला २० थान किनखाप, दर थान १८० रुपये प्रमाणें · · · · | | | | ३६०० | ० | ० |

# खर्डावही.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | फेब्रूआरी २७ सन १८१६ | | | |
| | रु पा रें | | | |
| ५ | लिंमजी भिकजी यास रोकड देउन हिंसाब चुकविला, रु० | ४७२० | ० | ० |
| | मार्च ४ | | | |
| ५ | शिवाजी कृष्ण यापासून रोकड घेउन हिंसाब चुकविला, रु० | २००० | ० | ० |
| | ७ | | | |
| ६ | जगजीवन जेठा यास कर्ज दिलें त्याचें दर शेंकडा दरसाल ५ रुपये प्रो व्याज असें खत लिहून घेतलें · · · · | १०००० | ० | ० |
| | ९ | | | |
| ६ | चिमणलाल यास विकत दिलें ८० खंडी शिसें, दर खंडी ४७ रुपये २ पावले प्रमाणें · · · · · · · · · · | ३८०० | ० | ० |
| | १४ | | | |
| ६ | देवजी दयाळ यास विकत दिली १० खंडी १६ मण साकर दर खंडी १४० रुपये प्रो · · · · · · · · · | | | |
| | याचे पोटीं त्यापासून आले रोकड रुपये · · १००० ० ० | | | |
| | बाकी येण्यास मुदत मास २ रुपये · · · ५१२ ० ० | | | |
| | | १५१२ | ० | ० |

## वहिवाटवही दुहेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | मार्च १४ सन १८१६ | | | |
| ६ | मुकुंद केशवजी यास विकत दिल्हा २३ खंडी १० मण खाजूर, दर खंडी २५ रुपये प्रमाणें, हे रुपये आदा करितां त्याणें तिर्कम धंजीवर दिली दर्शनी चिटी रुपये . . . . . . . . . | ५८७ | २ | ० |
| | २२ | | | |
| ७ | जेरामदयाळ याज पासून विकत घेतली ५०० यार्ड बनात, दर यार्ड ६ रुपये १ पावला प्रमाणें हे रु० आदा करितां इसाक इस्कबजी याजवर चिटी दिली रुपये . . . . . . . . . | ३१२५ | ० | ० |
| | २७ | | | |
| ७ | विसाजी कृष्ण यास रोकड देउन हिंसाब चुकविला रु० . . . | १५५ | १ | ० |
| | ३० | | | |
| ७ | चाकरांचीं वेतनें व घर खर्च गेल्ये तीन महिन्यांचा हिंशेब रोकड देउन चुकविला . . . . . . . . . . . . . | ९३२ | १ | ६६ २/३ |
| | एप्रील २ | | | |
| ७ | ३०० यार्ड बनात, दर यार्ड ७ रुपये प्रमाणें देउन विनिमयानें बरोबर किमतीन हिंदुस्थानी छिट १० थानें, दर थान रुपये २१० प्रमाणें . . . . . . . . . . . . . . | २१०० | ० | ० |

# खर्डावही.

| | एप्रील ५ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| ८ | वारुण गलबताचे वेगळाल्ये धन्यांनीं खर्चवेंच करूं त्या गलबताचा हिंसाब करून मार्गशीर्ष शुद्ध ५ पासून वैशाख वद्य ५ पर्यंत आमचे भागाचा नफा आल्यास दिला रुपये · · · · · · · · · · · · · · | ९४६ | ३ | ६६ २/३ |
| | ९ | | | |
| ८ | इसाक इसूबजी याजपासून रोकड घेउन हिंसाब चुकविला रुपये · · · · · · · · · · · · · · · · · | ३५५५ | ० | ० |
| ८ | ६० खंडी शिंसें, दर खंडी ४५ रुपये प्रमाणें पुढील बराबर किमतीचा माल घेउन विनिमयांत दिलें · · · · · · | | | |
| | २०० रतल चाहा, दर रतल ६ रु० प्रों · · · १२०० ० ० | | | |
| | १२ दिंडें खाद्या, दर दिंड १२५ रु० प्रो · · · १५०० ० ० | | | |
| | | २७०० | ० | ० |
| | १५ | | | |
| ८ | तिर्कम धंजी यास रोकड देउन हिंसाब चुकविला रुपये · · | ३४४ | ० | ० |

## वहिवाटवही दुहेरी रीति.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | एप्रील २४ सन १८१६ | | | | रु | पा | रें |
| ९ | १५ खंडी सुपारी, दरखंडी ११५ रुपये प्रमाणें देउन विनिमयानें पुढील प्रमाणें घेतलें · · · · · · · · | | | | | | |
| | | रु | पां | रे | | | |
| | ४ मण किरमीज त्याची किमत रुपये · · · | १२०० | ० | ० | | | |
| | बाकी रोकड घेतली रुपये · · · · · · · · | ५२५ | ० | ० | | | |
| | | | | | १७२५ | ० | ० |
| | मे १ | | | | | | |
| | **लिंमजी छोटा याशीं विनिमय.** | | | | | | |
| ९ | दिल्हा २५० यार्ड बारीक बास्ता, दर यार्ड १ रुपया २ पावले · · · · · · · · | ३७५ | ० | ० | | | |
| | आणि ३६ खंडी शिंसें, दरखंडी ४५ रु० प्रो० | १६२० | ० | ० | | | |
| | | | | | १९९५ | ० | ० |
| ९ | घेतली १२० रतल दालचिनी, दर ४ रुपये ० पावले ६६ $\frac{२}{३}$ रेंस · · · · · · · · | ५०० | ० | ० | | | |
| | आणि १२ गांठल्या कापूस, त्यांत ३०१ मण ३५ शेर, दरमण ४ रुपये प्रमाणें | १२०७ | २ | ० | | | |
| | | | | | १७०७ | २ | ० |

## खर्डावही.

| | मे ३ सन १८१६ | रु | पा | रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १० | साकर विकली ८ खं॰ दर खं॰ १७५ रु॰ प्रों त्याचा आदा शामजी गोकूळ याजवर १ मासाचे मुदतीची चिटी घेतली रु॰ | ५०० | ० | ० | | | |
| | बाकी रोकड घेतले रुपये · · · · · · · | ६६० | ० | ० | ११६० | ० | ० |
| | ८ | | | | | | |
| इ॰ या॰ १० | जवीगलबत, तांडेल जानसारंग, शिंधजाणार, त्याजवर, इभ्रम याकूब तेथील सावकार, याणें मागीतल्या प्रों त्याचे खातीं सामान चढविलें, पुढील प्रों त्याजवर निशाणी या बाजूवर लिहिल्या प्रो-केली आहे. | | | | | | |
| | २०० यार्ड बनात खतांची, दर यार्ड ७ रु॰ प्रो · · · | १४०० | ० | ० | | | |
| | ४० खंडी शिंसें. आतां रोकड देउन, विकत घेतलें, दर खं॰ ४० रुपये २ पावले प्रो · · · · · · | १६२० | ० | ० | | | |
| | १६ तुकडे सचंजी कापड, दर तुकडा ७३ रु॰ २ पा॰ प्रो अमनादास हरीदास यापासून विकत घेतलें · · | ११७६ | ० | ० | | | |
| | जकात इ॰ गलबतावर चढविल्या पर्यंत खर्च आली दिला· | १२४ | १ | १६$\frac{२}{३}$ | | | |
| | हरीभाई व त्याचे भागीदार यांस ४००० रुपयांचा विमा सर्वमालावर दिला रुपये · · · · · · · | १०५ | ० | ० | | | |
| | सर्वमालावर आमची दलाली दर शेंकडा २$\frac{१}{२}$ टके प्रमाणें · · · · · · · · · · · | ११० | २ | ५० | ४५३५ | ३ | ६६$\frac{२}{३}$ |

## वहिवाटवहीदुहेरीरीति.

| | मे १३ सन १८०६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| १३ | वीरचंदलक्ष्मीचंद, पुणें येथें त्यास माल पाठविला<br>रु पा रें<br>१००० यार्ड शिंधी दोटी, दर यार्ड १ रुपया १ पावला प्रमाणें . . . . . . . . . } १२५० ० ०<br>आणि ४०० यार्ड बारीक दिमेटी, दर यार्ड २ पावले ८३ १/३ रेंस प्रो . . . . . . . } २८३ १ ३३ १/३<br>त्या मालाचा संकेत कीं, वरलिहिल्ये किमतीं प्रमाणें त्याणीं घ्यावा, तसें नहोईतर हामाल त्याणें माघारा पाठवावा, त्यास जो खर्च पडेल तो आह्मीं देउं . . . . . . . . . . . . | १५३३ | १ | ३३ १/३ |
| | — १७ — | | | |
| १७ | जेराम गिरधर याजकडोन कर्ज येणें रुपये ५०० त्याचें साहा महिन्यांचें व्याज या महिन्याचे १ तारिखेस पिकलें तें घेतलें . | १२५ | ० | ० |
| | — २५ — | | | |
| ११ | इब्राम याकूब शिंधदेशींचा सावकार, त्याजवर आमची हुंडी १२०० प्यास्तरची, दर प्यास्तर ५० पेन्स, हा ऐवज जेमिलखान यास अथवा त्याचे आज्ञेवर भरावाची, त्याचे बदलीं एथें आह्मास पावले रुपये . . . . . . . . . . . . | २५०० | ० | ० |

# खर्डावही.

| | जुन ३ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| १२ | देवजी दयाळ याजपासून हिंसाबीं संपूर्ण रुपये घेतले · · | ५१२ | ० | ० |
| | ७ | | | |
| १२ | शामजी गोकुळ याजपासून घेतले चिटीचे रुपये · · · · | ५०० | ० | ० |
| १२ | शिवाजी कृष्ण यास विकत दिला किनखाप थान १२ दर थान २०० रुपये प्रमाणें · · · · · · · · · · · · | २४०० | ० | ० |
| | १९ | | | |
| १२ | वीरचंद लक्ष्मीचंद याणें ५०० यार्ड सिंधी दोटी माघारी परत पाठविली ती पावली त्याणें ५०० यार्ड ठेविली आणि बारीक दिमेटी पाठविली होती तीही ठेविली एकूण रुपये · · · · · · · · · · · · · · · · | ६२५ | ० | ० |

# वहिवाटवही दुहेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | जुन २८ सन १८१६ | | | |
| १२ | इसमालभाई बसराच्या राहाणार याणें श्रामकगलबतावर तांडेल धर्मसारंग याचे बरोबर हा पुढील आमचा माल विकून ऐवज पाठविला तो आह्मी घेतला त्याचा तपशील, ८०० यार्ड बारीक बास्ता, २०० यार्ड बारीक बनात, आणि ८ थानें किनखाप, त्याचे विकरीचें एकंदर उत्पन्न बसराचलनी रुपये ७९४६..२पावले ७९ रेंस, हुंडीभाव दरशेंकडा रुपये ४० बाहेरबटा हुंडणावळ ह्मणजे १४० सांचे १०० . . . . . . . . . . . . . . . . . . | ५६७६ | ० | ७५ |
| १२ | इसमालभाई बसराचा याणें आमचे खातीं आह्मावर जो खमचा माल या पुढील यादीप्रमाणें श्रामक गलबतावर भरून, त्याची सूचना याद आह्मांकडे पाठविली, त्याचा तपशील, २० खंडी सुपारी, १५ मण गुळी, २८ खंडी साकर, बसराचलनी रुपयांत याची एकंदर किमत रु० ४८७८..१..६६ २/३ हुंडीभाव दरशेंकडा रुपये ४० प्रमाणें एकूण रुपये बाहेर बट्टा हुंडणावळ; ह्मणजे १४० साचे १०० . . . . . | ३४८४ | २ | ३३ १/३ |

## खर्डावही

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | जुलै ४ सन १८१६ | | | |
| १४ | आमच्या चुलता हिराजी अमरशेट मरण पावला, त्याणें त्याचें मृतपत्रांत मला देण्याविषयीं लिहिले, सांप्रत त्याच्या अधिकारी जेराम गिरधर याज पासून घ्यावयाचे रुपये . . . . . . . . . . . . . . | ३००० | ० | ० |
| | ८ | | | |
| १४ | घर आणि दुकान याचें भाडें, चाकरांचें वेतन, आणि घरखर्च इत्यादि, जुलै १ तारीख पावेतों आम्हीं संपूर्ण भरून दिले रुपये | १३०० | ० | ० |
| | १३ | | | |
| १४ | इसमाल भाई, बसराच्या सावकार , याजवर आम्हीं हुंडी केली, त्याणीं एशवंत हरीस अथवा त्याचे आज्ञेनें ऐवज द्यावयाची; आणि एशवंत हरी याणें त्या हुंडीचे किमतीचे रुपये १४ दिवसांत द्यावे हा त्यांत करार . . . | २१९१ | २ | ४१$\frac{२}{३}$ |
| | २३ | | | |
| १५ | श्रामक गलबत, बसराहून माल घेऊन, बिन जोखम येऊन पावलें, या मालाच्या नोर, जकात, इत्यादि संपूर्ण खर्च एथें चुकविला रु . . . . . . . . | ८३२ | १ | ३३$\frac{२}{३}$ |

## वहिवाटवही दुहेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | जुलै २३ सन १८१६ | | | |
| | रु पा रें | | | |
| १५ | देवजीदयाळ यास विकत दिली उतरायाचे समयीं बंदरांतच २८ खंडी साकर, पैकीं रोकड घेतले रुपये . . . . . . . ७०० ० ० | | | |
| | बाकीस मुदत महिने ६ रुपये . . . . ७०० ० ० | १४०० | ० | ० |
| | २५ | | | |
| १५ | आपले वखारींत आणिलें. | | | |
| | २० खंडी तूप, दरखंडी ८० रु. २ पा. प्र॥. १६१० ० ० | | | |
| | १५ मण, गुळी, दरमण ७५ रु. प्रमाणें. ११२५ ० ० | २७३५ | ० | ० |
| | ३० | | | |
| १६ | एशवंतहरी याज पासून इसमालभाई बसरावाला याजवर दिल्ये हुंडीचा ऐवज संपूर्ण आला रु. | २१९१ | २ | ४१$\frac{3}{4}$ |
| | आगष्ट २ | | | |
| १६ | दौलत गुराब, तांडेल जेराम सारंग, याजवर, फत्तुभाई, शिंधदेशा आमस बंदरचा सावकार, याचे खातीं माल आला तो आह्मास पावला येणें प्रमाणें ५ पिंप रिवसमिस, १२ पिंप पिस्तें . . . . . . . . . | | | |
| | याचा जकात, नोर, हेल, इत्यादि खर्च विषयीं आह्मीं दिल्हे रुपये . . . . . . . . . . | १२७ | १ | ० |

## खडीवही

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | ——— आगष्ट ७ सन १८१६ ——— | | | |
| १६ | वीरचंद लक्ष्मीचंद यापैकीं पावले रुपये . . . . . | ५०० | ० | ० |
| | ——— १० ——— | | | |
| १७ | फत्तुभाई यान्वें ५ पिंप खिसमीस विकलें, वजन १६ खंडी १६ मण, दरखंडी ८० रुपये प्रमाणें . . . . . . | १३४४ | ० | ० |
| | ——— १४ ——— | | | |
| १७ | जगजीवन जेठा यास, फत्तुभाईबाबद १२ पिंप पिस्तें विकत दिलीं, वजन १५ खंडी ४ मण, दरखंडी १०० रुपये प्रमाणें रुपये . . . . . . . . . . . . | १५२० | ० | ० |
| | ——— १७ ——— | | | |
| १७ | फत्तुभाई याचे मालाचें कोठारभाडें. दलाली. इत्यादि विषयीं आम्हीं दिले रुपये . . . . . . . . . . | २० | १ | ० |
| १७ | आमची दलाली ३०१० रुपयांवर दर शेंकडा २½ रुपये प्रमाणें रुपये . . . . . . . . . . . . | ७५ | १ | ० |

## वहिवाटवही दुहेरी रीति.

| | | रु | पा | रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | आगष्ट २६ सन १८१६ | | | | | | |
| १८ | दोळात गुराब, तांडेल जेराम सांरग, याजवर फत्तुभाईचे आज्ञेवरून चढविला हा पुढील माल . . . . . | | | | | | |
| | आमची साकर ९ खंडी ४ मण. दर खंडी १४० रुपये प्रमाण . . . . . . . | १२८८ | ० | ० | | | |
| | १२ खंडी १२ मण तंबाखू. आह्मीं त्याजकरितां विकत घेतला दर खंडी ३१ रुपये ३ पावले ९९ रेंस प्रमाणें रुपये . . . . . . | ४०३ | ० | ६६ २/३ | | | |
| | जकात इत्यादि खर्च बाबद आह्मीं दिले रु. | ८६ | ० | ५० | | | |
| | आमची दलाली दर शेंकडा २½ रु. प्र॥. | ४४ | १ | ६६ २/३ | | | |
| | | | | | १८२१ | २ | ८३ १/३ |
| | सप्तेंबर २ | | | | | | |
| १८ | ८६६ गिलडर याची हुंडी लिमजी छोटा याणें, जगा जेराम आमसदाम शाहरचा सावकार, याजवर केली ती आह्मीं फत्तुभाईकडे पाठविली, हुंडीची किंमत एथें आह्मीं दिली, दर शेंकडा ९३ रुपये ३ पावले ५८ १/३ रेंस प्रमाणें याचे १०० गिलडर . . . . . . . . . . | | | | ८१३ | ० | ५८ १/३ |

# रवडी वही

| | सप्तेंबर ९ सन १८१६ | रु पा रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|
| १९ | जगजीवन जेठा याजपासून १०००० रुपयाचें साहा महिन्यांचें व्याज आलें रुपये | | २५०० | ० | ० |
| | २० | | | | |
| १९ | सारलाभ गलबत, तांडेल बहीर सारंग, हेंबर बंदरीं आणार, त्याजवर हा पुढील माल आमचे खातीं जगन्नाथ कानजी याजकडे पाठविला | | | | |
| | आमचा कापूस १५ खंडी १ मण ३५ शेर, दर खंडी ८० रु. प्रो। | १२०७ २ ० | | | |
| | आमचें हिंदुस्थानीं छिट १० थान, दर थान २१० रुपये प्रमाणें | २१०० ० ० | | | |
| | जकात इत्यादि खर्च बाबत आम्हीं दिले रुपये | २४३ ३ ३३ | | | |
| | | | ३५५१ | १ | ३३ |
| | २४ | | | | |
| १९ | जगजीवन जेठा यास १२ खंडी गोडें तेल विकत दिलें, दर खंडी १०० रु. प्रमाणें, त्याचे ऐवजांत त्याणें वेंका पा नाईक याजवर तीन दिवसांचे मुदतीची चिठी दिली रुपये | | १२०० | ० | ० |

## वहियाट वही दुहेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | सप्तेंबर ३० सन १८१६ | | | |
| २० | वारुण गलबताचे $\frac{३}{८}$ आपला भाग त्याचा नफा मार्च २५ तारिखेपासून आजपर्यंत भरून पावलों रुपये . . . . | ५८६ | २ | ३३$\frac{१}{३}$ |
| | अकटोबर ४ | | | |
| २० | वेंकापा नाईक यापासून जगजीवन जेठाचे चिटीचा पूर्ण पैका पावला . . . . . . . . . . . . . . . | १२०० | ० | ० |
| | ८ | | | |
| २० | वस्ता गोवा याचे स्वाधीन केलीं विकावयासाठीं १२ दिंडें रवादी, दर दिंड १२५ रुपये प्रमाणें, यांत त्याचा व आमचा अर्धो अर्ध भाग रुपये . . . . . . . . . . . . . | १५०० | ० | ० |
| २० | आपलें घर, दुकान, चाकर, इत्यादिकांचा सप्तेंबर २९ तारिखेपर्यंत खर्च रुपये . . . . . . . . . . . | ११०१ | २ | ६६$\frac{२}{३}$ |
| | १२ | | | |
| २१ | वस्ता गोवा याजपासून खादी १२ दिंडांचे अर्धभागाचा पैका पावला रुपये . . . . . . . . . . . . . | ७५० | ० | ० |
| | १४ | | | |
| २१ | वस्ता गोवा याणें २४ खंडी तंबाकू त्याचे आमचे सर्कतींत विकत घेतला, त्यांत आमचे अर्धभागाचा पैका आह्मीं त्यास दिला रुपये . . . . . . . . . . . . | ७२० | ० | ० |

## खर्डावही

| | अकटोबर १४ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| २१ | आदम महमद वाजे यापासून तंबाखू १४ खंडी, शामजी गोकुळ व आमचे सर्कतींत विकत घेतला, दर खंडी ५५ रु· प्रमाणें हे रुपये मागीत त्यावर द्यावयाचे · · · · · | ७७० | ० | ० |
| | १६ | | | |
| २१ | समशेर गलबत, त्याचे धन्यापासून शामजी गोकुळ याचे आमचे सर्कतींत प्रत्येक अर्धोअर्ध प्रमाणें विकत घेतलें, त्या बाबद त्यास दिले रुपये · · · · · · · · · | १२०० | ० | ० |
| | २१ | | | |
| २२ | वस्ता गोवा याणें सर्कतींतील खाद्या आणि तंबाखू विकून त्या विक्रीचा ऐवज आह्मास भरला येणें प्रमाणें<br>१५ थान खरची बनात, दर थान रु· ६० प्रें॥ रु· ९०० ० ०<br>आरबोजी देवळ्ये याजवर चिटी रु· · · · · ५०० ० ०<br>बाकी रोकड दिले रु· · · · · · · · · · · ५३३ २ ६६$\frac{2}{3}$ | १९३३ | २ | ६६$\frac{2}{3}$ |
| | २४ | | | |
| २२ | नानजी ठकर आणि त्याचे सर्कती याणीं आमचें समशेर गलबत लिजबन बंदरीं जावयास नोरी केलें, त्याचा एक महिन्याचा नोर आगाव घेतला रु· · · · · · · · · | २५० | ० | ० |

## वहिवाट वही दुहेरी रीति.

| | तपशील | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|
| | अकटोबर २४ सन १८१६ | | | |
| २२ | समशेर गलबताची किमत सुमारें रुपये ९००० त्याचा विमा दर शेंकडा रुपया १$\frac{1}{2}$ लिजबन बंदरीं आऊन याचयाचा केला ते रुपये दिले रु. . . . . . . . . . . . . | १३५ | ० | ० |
| | २५ | | | |
| २३ | हिरा अंताजी यास समशेर गलबताची डागडुजी करायास सांगीतली त्याचे यादी प्रमाणें त्यास दिले रुपये . . . . | १४३ | ० | ६६$\frac{2}{3}$ |
| २३ | आपल्या सर्कतींतून १४ खंडी तंबाखू विकला, दर खंडी ७० रुपयां प्रमाणें रुपये . . . . . . . . . . . . | ९८० | ० | ० |
| | २६ | | | |
| २३ | आपल्या तंबाखू बाबत गाडी भाडें इत्यादि खर्च आलीं दिला रुपये . . . . . . . . . . . . . . . . . . | २३ | २ | ५० |
| | २८ | | | |
| २४ | आदम महमद वाजा यास तंबाखू बाबद पूर्ण दिले रुपये | ७७० | ० | ० |
| | ३० | | | |
| २४ | तंबाखू विकत घेतला आणि विकला व त्याबाबद खर्च याजवर आमची दलाली दर शेंकडा २ रुपयां प्रमाणें रु. | ३५ | १ | ८३$\frac{1}{3}$ |
| २४ | शामजी गोकुळ यास तंबाखूचे विकरी बाबद त्याचा अर्ध भाग त्यास दिला रुपये . . . . . . . . . . . . | ७५ | १ | ८३$\frac{1}{3}$ |

# खर्डावही

नवेंबर २ सन १८१६

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| २५ | आनंद गलबत, तांडेल बेंड सारंग, याजवर हा पुढील माल आशाराम हिरजी, नथुभाई, आणि आम्हीं, ऐशी त्रिवर्गांची प्रत्येकीं ⅓ सर्कत त्या सर्कत खातीं चढविला, लिसबन शहरीं पमाजी तापटे यांचे नांवावर पाठवावयाकरितां, येणें प्रमाणें . . . . . . . . . . . | | | |
| | **आशाराम हिरजी याणें दिलें.** | | | |
| | ६५० यार्ड बनात, दर यार्ड ७½ रु. प्र॥ रु. | ४८७५ | ० | ० |
| | **नथुभाई, याणें दिलें.** | | | |
| | १२० थान फ्लानिल, दर थान १८ रुपये प्र॥ | २१६० | ० | ० |
| | **आम्हीं दिलें.** | | | |
| | १५ थान खरची बनात, दर थान ६० रु. प्र॥ | ९०० | ० | ० |
| | ८ थान किनखाप, दर थान १८० रु. प्र॥ | १४४० | ० | ० |
| | जकात इत्यादि आम्हीं दिले रुपये . | २८५ | ० | ० |
| | या मालाच्या विमा सुमार ९००० रुपयांचा दर शेंकडा २ रुपये प्रमाणें रुपये हरीभाई आणि त्याचे विभागी यांस दिले रुपये . . . . . . . . | १८० | ० | ० |
| | | ९८४० | ० | ० |

# वहिवाटवही दुहेरी रीति.

| | नवेंबर ४ सन १९१६ | रु पा रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|
| २६ | वस्त्रे मालाचे खातीं नथुभाई, आणि आसीं याणीं आपलाले भाग समान होण्या करितां, आशाराम हिरजीस दिले रोकड रुपये येणें प्रमाणें | | | | |
| | नथुभाईनीं दिले रुपये | ११२० ० ० | | | |
| | आसीं दिले रुपये | ४७५ ० ० | १५९५ | ० | ० |
| २६ | जेराम गिरधर याचे खतान्वा ऐवज व्याज सुद्धां तारीख १ पावतों त्यापासून पूर्ण पावला येणें प्रमाणें | | | | |
| | मुद्दल रुपये | ५००० ० ० | | | |
| | व्याज रुपये | १२५ ० ० | ५१२५ | ० | ० |
| | ६ | | | | |
| २६ | जगजीवन जेठा, याचें दिवाळें निघालें, तेव्हां दामाशाई १० रुपयांस ७॥ रुपये प्र॥ करितां आले रु. येणें प्रमाणें | | | | |
| | खतांचे खातीं आले रुपये | ७५०० ० ० | | | |
| | फत्तुभाईचे खातीं पावले रु. | ११४० ० ० | | | |
| | खतांचे खातीं मुद्दलांत खूट रुपये | २५०० ० ० | | | |
| | फत्तुभाईचे खातीं खूट रुपये | ३८० ० ० | ११५२० | ० | ० |

# खर्डावही

| | नवेंबर ८ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| २७ | जनार्दन अंबाजी याजपासून आशाराम हिरजी, नथुभाई, आणि आह्मीं, या सर्कतींत घेतली, खडीसाकर ३६ खंडी, दर खंडी १२५ रुपये प्रमाणें . . . . . . . | ४५०० | ० | ० |
| | ९ | | | |
| २७ | वीरचंद लक्ष्मीचंद, याजपासून हिंसाबीं पूर्ण पैका पावला रुपये . . . . . . . . . | ४०८ | ९ | ३३⅓ |
| | ११ | | | |
| २७ | जनार्दन अंबाजी यास खडीसाकर बाबद आह्मीं सर्कतीनीं हिंसाबीं पूर्ण ऐवज दिला, येणें प्रमाणें . . . . . | | | |
| | आशाराम हिरजी याणें त्यास माल दिला, किमत रुपये . . . . . } ९४० ० ० | | | |
| | नथुभाई याणें स्वतांचे खातीं अमारवर्च करविला रुपये . . . . . } १७०० ० ० | | | |
| | आह्मीं त्यास रोकड दिले रुपये . . . १८६० ० ० | | | |
| | | ४५०० | ० | ० |

## वहिवाटवही दुहेरी रीति.

| | नवेंबर ११ सन १८१६ | रु पा रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|
| २८ | आत्माराम हिरजी याणें पैका देऊन, आपलें खातें बरोबर केलें, येणें प्रमाणें . . . . . . . . | | | | |
| | नथुभाई यास दिले रुपये . . . . . . | २०० ० ० | | | |
| | आह्मांस दिले रुपये . . . . . | ३६० ० ० | ५६० | ० | ० |
| | — १२ — | | | | |
| २८ | वसन रघुनाथजी यास ८ खंडी खडी साकर आत्माराम हिरजी, आणि नथुभाई, यांशीं सर्कतींतील विकत दिली, दर खंडी १३५ रुपये प्रमाणें . . . . . . . | | १०८० | | |
| | — १३ — | | | | |
| २८ | जगातिर्कस यास त्रिवर्गांचे सर्कतींतील, खडी साकर ६ खंडी विकत दिली, दर खंडी १४० रुपये प्रमाणें . . . | | | | |
| | पैकीं रोकड पावले रुपये . . . . . . | ३४० ० ० | | | |
| | बाकी येण्यास मुदत दिवस २ रुपये . . . | ५०० ० ० | ८४० | ० | ० |
| | — १५ — | | | | |
| २९ | त्रिवर्गांचे सर्कतींतील २२ खंडी खडी साकर, दर खंडी १४० रुपये प्र॥ देऊन विनिमयांत २८ खंडी चिनी साकर दर खंडी ११० रुपये प्रमाणें घेतली . . . . . . | | ३०८० | ० | ० |

# खर्डावही.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | नोवेंबर १६ सन १८७६ | | | |
| | रु पा रें | | | |
| २९ | वसनरघुनाथजी यापासून खडीसाकर बाबद पूर्ण ऐवज पावला . . . . . . . . . . . . . . | १०८० | ० | ० |
| | १९ | | | |
| २९ | जमनादास हरीदास यास इभ्राम याकूब याचे सतरंजी बाबद पूर्ण पैका दिला . . . . . . . . . . . . . | ११७६ | ० | ० |
| | २३ | | | |
| २९ | जगातिर्कम याचें दिवाळें निघालें, त्याचे दामाशाईंत आले रुपये . . . . . . . . } ३०० ० ० | | | |
| | आणि मुद्दलांत खूट आली रुपये . . . . २०० ० ० | | | |
| | | ५०० | ० | ० |
| | २७ | | | |
| ३० | लिमजी छोटा यास विकत दिला खतांचा किरमीज ४ मण, दर मण ३२५ रुपये प्रमाणें . . . . . . . . . . . . | १३०० | ० | ० |
| | २९ | | | |
| ३० | बिवर्गीचे सर्कतींतील ४ खंडी चिनीसाकर विकली, दर खंडी १२५ रुपये प्रमाणें रु० . . . . . . . . . . . . . | ५०० | ० | ० |

# वहिवाटवही दुहेरी रीति.

| | डिसेंबर ५ सन् १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| ३० | आशाराम हिरजी, नथुभाई, आणि आह्मीं, यासर्कतींतील २४ खंडी राहिली चिनी साकर वांटून घेतली, दर खंडी ११० रुपये प्रमाणें . . . . . . . . . . . . . . | २६४० | ० | ० |
| | ६ | | | |
| ३१ | जगन्नाथ कानजी, हेंबरबंदरचा राहाणार, याजकडून वर्त्तमान आलेंकीं आपला माल त्यास पावला, तो त्याणें विकून विक्रीचा पैका प्रेमिशशिका ६७६ पौंड १५ शिल्लिंग ६ पेंन्स, आला, त्याची हुंडणावळ बट्टा मिळून ३४ शिल्लिंग ६ पेन्स देउन बाकी रुपये . . . . . . . . . . . . . . . | ३९२३ | १ | ३३ $\frac{१}{३}$ |
| | १४ | | | |
| ३१ | तिर्कम धंजी यास विकत दिली ५०० यार्ड शिंधी दोटी, दर यार्ड १ रुपया १ पावला ६६ $\frac{२}{३}$ रें प्रो रु० . . . . . . . . . | ७०८ | १ | ३३ $\frac{१}{३}$ |

# खर्डावही.

| | डिसेंबर १८ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| ३१ | जगन्नाथ कानजी याणें हिंसाबीं पूर्ण पैक्याची हुंडी करून पाठविली येणें प्रमाणें · · · · · · · · · | | | |
| | एक हुंडी, चिंतोकृष्ण यांचे नांवावर, रुपये · ३००० ० ० | | | |
| | दुसरी, विठ्ठलदास गोविंददास यांचे नांवावर रुपये · · · · · · · · · · · · · ९६१ २ ४१ ३/४ | | | |
| | | ३९६१ | २ | ४१ ३/४ |
| | — २४ — | | | |
| ३२ | नानजी ठकर आणि त्याचे सर्कती यांजपासून समशेर गलबताचा लिजबन बंदरीं जाण्या येण्याचा नोर पूर्ण पावला · | २५० | ० | ० |
| | — २६ — | | | |
| ३२ | नानजी ठकर आणि त्याचे सर्कती यांस सर्कतींतील समशेर गलबत विकत दिलें, त्याचे ऐवजास मुदत मास ३ ते रु° | १०००० | ० | ० |

## वहिवाटवही दुहेरीरीति.

| | डिसेंबर २८ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| ३२ | घरच्याचाकर, दुकान, इत्यादिकांचा तारीख २५ पर्यंत खर्च रुपये . . . . . . . . . . . . . . . . . | ९११ | १ | ६६ $\frac{२}{५}$ |

# वहिवाटवही दुहेरी रीति.

## रोजकीर्द.

| | | रु | पा | रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | मुंबई, जानेवारी १ सन १८१६ | | | | | | |
| | **किरकोळ रिणको मालमत्तेला, रुपये ८३३३३ ०..०** | | | | | | |
| | | रु | पा | रें | | | |
| १ | पैका, रोकड बाबद . . . . . . . . . . . . . | ५०००० | ० | ० | | | |
| २ | बारीक बनात, ३०० यार्ड बाबद दर यार्ड ७ रुपये २ पावले . . . . . . . . . . | २२५० | ० | ० | | | |
| २ | बारीक बास्ता, १२०० यार्ड बाबद दरयार्ड १ रुपया १ पावला . . . . . . . . . | १५०० | ० | ० | | | |
| ३ | शिसें, ८०० तुकडे सर्व मिळून वजन १७६ खंडी बाबद, दरखंडी ४० रुपये . . . . . | ७०४० | ० | ० | | | |
| ३ | तूप, ५० खंडी बाबद, दरखंडी १९० रुपये . . . | ९५०० | ० | ० | | | |
| ४ | साकर, ९६ पेट्या, सर्व मिळून वजन २८ खंडी बाबद, दर खंडी १०८ रु० २ पा० ७१ ३/७ रेंस . . | ३०४३ | ० | ० | | | |
| ४ | वारुण गलबताचे ३/८ किमत बाबद . . . . . | ३००० | ० | ० | | | |
| ५ | शिवाजी कृष्ण बाबद, वायदे रोखा, त्याची तारीख १ मार्च . . . . . . . . | २००० | ० | ० | | | |
| ५/१ | जेराम गिरधर बाबद, खत, नवेंबर तारीख १ पासून व्याज दर शेंकडा दरसाल रु ५ प्रमाणें व्याजसुद्धां रुपये . . . . . . . | ५००० | ० | ० | | | |
| | | | | | ८३३३३ | ० | ० |

# वहिवाटवही दुहेरी रीति.

| | जानेवारी १ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| | **मालमत्ता रिणको किरकोळास रु. २७२७ १ ०** | | | |
| १/५ | एशवंत हरी यास तो मागेल ते समयीं · · · · १२०० ० ० | | | |
| ६ | चिमणलाल यास १२ व्ये तारिखेस · · · · · ८७२ ० ० | | | |
| ६ | विसाजी कृष्ण यास हिंसाब बाबद · · · · · ६५५ १ ० | | | |
| | | २७२७ | १ | ० |
| | ४ | | | |
| | **दिमेटी, रिणको पैक्यास, रु २५०** | | | |
| ६/१ | बाबद ४०० यार्ड, दर यार्ड २ पा ५० रेंस प्रमाणें · · · · · · · | २५० | ० | ० |
| | ८ | | | |
| | **एशवंत हरी, रिणको, पैक्यास, रु १२००** | | | |
| ५/१ | यास हिंसाबीं रोकड पुरे दिले · · · · · · · · · · · · | १२०० | ० | ० |
| | १२ | | | |
| | **गोडें तेल, रिणको, इसाक इसुबजीस, रु १६२०** | | | |
| ७/७ | बाबद १८ खंडी, दर खंडी ९० रुपये प्रमाणें · · · · · · · | १६२० | ० | ० |
| | १७ | | | |
| | **चिमणलाल, रिणको, पैक्यास, रु ८७२** | | | |
| ६/१ | यास हिंसाबीं रोकड पुरे दिले · · · · · · · · · · · · | ८७२ | ० | ० |

# रोजकीर्द.

| | जानेवारी १७ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| | पैकारिणको, बारीकबारस्त्यास, रु २३७..२..० | | | |
| १/२ | बाबद १५० यार्ड, दरयार्ड १ रु २ पा ३३ १/३ रेंस प्रमाणें . . . . | २३७ | २ | ० |
| | २४ | | | |
| | खाजूर, रिणको, तिर्कम धंजीस, रु ९३१..२..० | | | |
| ७/८ | बाबदकपातें, १२ मिळून वजन ४० १/२ खंडी दरखंडी २३ रु पैकादेण्य | | | |
| | ची मुदत मास २ . . . . . . . . . . . . . . . . | ९३१ | २ | ० |
| | ३० | | | |
| | स्कपारी, रिणको, तुपास, रु २००० | | | |
| ८/३ | बाबद खंडी २० दर खंडी १०० रुपये प्रमाणें, विनिमयांत बा- | | | |
| | बद खंडी १० दरखंडी २०० रुपये प्रमाणें . . . . . . . . . | २००० | ० | ० |
| | फेब्रूआरी २ | | | |
| | लिंमजी भिकजी, रिणको, बनातीस, रु ९०० | | | |
| ८/३ | बाबत १०० यार्ड, दर यार्ड रुपये ९ प्रमाणें रुपये . . . . . . | ९०० | ० | ० |

# वहिवाटवही दुहेरी रीति.

| | | रु | पा | रें | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | फेब्रूआरी ६ सन १८१६ | | | | | | |
| | सफरबसरची, रिणको, किरकोळ सामानास, रुपये ४४३२..०..३३⅓ रेंस. | | | | | | |
| ९/२ | बारीकबास्ता ८०० यार्ड, दरयार्ड १ रुपया १ पावला प्रमाणें . . . . . . . . . | १००० | ० | ० | | | |
| २ | बारीकबनात २०० यार्ड, दरयार्ड ७ रुपये २ पावले प्रमाणें . . . . . . . . . | १५०० | ० | ० | | | |
| ८ | लिंमजी भिकजीपासून विकत घेतला किनखापथानें ८ दरथान १९० रुपये प्रमाणें . . . | १५२० | ० | ० | | | |
| १ | रोकड दिल्हे जकात, बंदरखर्च, इत्यादि . . . | ४१२ | ० | ३३⅓ | | | |
| | | | | | ४४३२ | ० | ३३⅓ |
| | ८ | | | | | | |
| | सिंधी दोटी, रिणको, किरकोळास, रु १७५०..०..० | | | | | | |
| ९/१ | बाबद यार्ड १५०० दरयार्ड १ रुपया ० पाओं पैकीं रोकड दिले . . . . . . . . . | ५०० | ० | ० | | | |
| ८ | लिमजी भिकजीवर चिटी रु . . . . . . | ५०० | ० | ० | | | |
| ६ | चिमणलालयाची बाकी रु . . . . . . | ७५० | ० | ० | | | |
| | | | | | १७५० | ० | ० |

# रोजकीर्द.

| | फेब्रुआरी १२ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| | **इसाक इस्रुबजी, रिणको, तुपास रु ८८००** | | | |
| ७/३ | बाब्रद खंडी ४४ दर खंडी २०० रुपये प्रमाणें · · · · · · | ८८०० | ० | ० |
| | १९ | | | |
| | **विसाजी कृष्णा, रिणको, इसाक इस्रुबजीस, रु ५००** | | | |
| ६/७ | बाबत चिटी दिली त्याजवर रु · · · · · · · · · · · | ५०० | ० | ० |
| | २३ | | | |
| | **किनखाप, रिणको, लिमजी भिकजीस, रु ३६००** | | | |
| १०/८ | बाबद थानें २० दर थान १८० रुपये प्रमाणें · · · · · · | ३६०० | ० | ० |
| | २७ | | | |
| | **लिमजी भिकजी, रिणको, पैक्यास, रु ४७२०** | | | |
| ८/१ | त्यास हिंसाबीं रोकड पुरे दिले · · · · · · · · · · | ४७२० | ० | ० |
| | मार्च ४ | | | |
| | **पैका, रिणको, शिवाजी कृष्णास, रु २०००** | | | |
| १/५ | त्यापासून घेउन हिंसाब चुकविला · · · · · · · · | २००० | ० | ० |

## वहिवाटवही दुहेरी रीति.

| | मार्च ७ सन १८१६ | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | रु पा रें | | | |
| | जगजीवन जेठा, रिण को, पैक्यास, रु १०००० | | | |
| १०/१ | कर्ज दिलें त्यास खतावर, व्याज दरसाल दरशेंकडा ५ रु प्रों · · | १०००० | ० | ० |
| | ९ | | | |
| | चिमणलाल, रिण को, शिंशास, रु ३८०० | | | |
| ६/२ | बाबद ८० खंडी, दरखंडी ४७ रु २ पा प्रों · · · · · · · · | ३८०० | ० | ० |
| | १४ | | | |
| | किरकोळ, रिण को, साकरेस, रु १५१२ | | | |
| | रोकड आली, १० खंडी १६ मण दरखंडी } १००० ० ० | | | |
| १ | १४० रुपये पैकीं रु · · · · · · · · | | | |
| १०/२ | देवजी दयाळकडे बाकी मुदत मास २ रु ५१२ ० ० | | | |
| | | १५१२ | ० | ० |
| | मुकुंद केशवजी, रिण को, खाजुरास, ५८७··२ | | | |
| | बाबद २३ खंडी १० मण, दरखंडी २५ रुपये प्रों हे रुपये आदा | | | |
| ८/७ | करितां त्याणें निर्कम धंजीवर दर्शनी चिटी दिली रुपये · · · | ५८७ | २ | ० |

# रोजकीर्द.

| | | रु | पा | रे |
|---|---|---|---|---|
| | मार्च २२ सन १८१६ | | | |
| | रु पा रे | | | |
| | **बनात, रिणको, इसाक इसुबजीस, रु ३१२५** | | | |
| | बाबद ५०० यार्ड, दरयार्ड ६ रु १ पा प्रों जेराम दयाळ पा- | | | |
| | सून विकत घेतली, त्या बाबद इसाक इसुबजी वर चिटी | | | |
| 2/7 | दिली रुपये . . . . . . . . . . . . . . | ३१२५ | ० | ० |
| | २७ | | | |
| | **भिसाजी कृष्णा, रिणको, पैक्यास, रु १५५ .. १** | | | |
| 6/7 | त्यास पुरे रोकड दिले . . . . . . . . . . . . | १५५ | १ | ० |
| | ३० | | | |
| | **लाभहानि, रिणको, पैक्यास, रु ९३२ .. १ .. ६६ 2/3** | | | |
| | बाबद चाकरांचा पगार व घरखर्च गेल्ये तीन महिन्याचा हिं- | | | |
| 11/2 | शेब रोकड देउन चुकविला . . . . . . . . . . | ९३२ | १ | ६६ |
| | एप्रील २ | | | |
| | **हिंदुस्थानी छिट, रिणको, बनातीस, रु २१००** | | | |
| | विनिमय केला, ३०० यार्ड दरयार्ड रु ७ याचा १० थानाशी दरथा- | | | |
| 12/2 | न २१० प्रों . . . . . . . . . . . . . . | २१०० | ० | ० |

## वहिवाटवही दुहेरी रीति.

| | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|
| | एप्रील ५ सन १८१६ | | | |
| | रु पा रें | | | |
| | **पैका, रिणको, वारुणगलबतास, रु ९४६··३··३३ १/२** | | | |
| | बाबद आमचा भाग मार्गशीर्ष शुद्ध ५ पासून वैशाखवद्य ५ | | | |
| १/४ | पर्यंत नफ्याचा दिला रुपये · · · · · · · · · · · · · | ९४६ | ३ | ३३ १/२ |
| | ९ | | | |
| | **पैका, रिणको, इसाक इसुबजीस, रु ३५५५** | | | |
| १/७ | त्यापासून घेउन हिंसाब चुकविला · · · · · · · · · · · | ३५५५ | ० | ० |
| | **किरकोळ, रिणको, शिंशास, रु २७००** | | | |
| १२ | चाहा २०० रतल, दररतल ६ रुपये प्रों · · · · १२०० ० ० | | | |
| १२/३ | म्हाथा १२ दिंडें, दर दिंड १२५ रु· प्रों · · · · १५०० ० ० | | | |
| | घेतलें विनिमयांत, बाबद खंडी ६० दरखंडी | | | |
| | ४५ रुपये प्रों देउन रु· · · · · · · · · · · · · · · · | २७०० | ० | ० |
| | १५ | | | |
| | **तिर्कमधंजी, रिणको, पेक्यास, रु ३४४** | | | |
| ८/१ | त्यास देउन हिंसाब चुकविला · · · · · · · · · · · · · | ३४४ | ० | ० |

# रोजकीर्द

| | | | रु | पा | रें |
|---|---|---|---|---|---|
| | एप्रील २४ सन १८१६ | | | | |
| | | रु पा रे | | | |
| | किरकोळ, रिणको, सुपारीस रु. १७२५ | | | | |
| १२ | किरमीज ४ मण, किमत रुपये . . . . . | १२०० ० ० | | | |
| १/८ | बाकी रोकड रुपये . . . . . . . . . | ५२५ ० ० | | | |
| | घेतली विनिमयांत १५ खंडी सुपारी, दर खंडी ११५ रु. प्रमाणें देऊन रुपये | | १७२५ | ० | ० |
| | मे १ | | | | |
| | लिंमजी, छोटारिणको, किरकोळास रुपये १९९५ | | | | |
| १३/२ | बारीक बास्ता २५० यार्ड, दर यार्ड १ रु. २ पा. प्र. रु. | ३७५ ० ० | | | |
| ३ | शिंसें ३६ खंडी, दर खंडी ४५ रु. प्रमाणें रु. | १६२० ० ० | | | |
| | दिलें विनिमयांत . . . . . . . | | १९९५ | ० | ० |
| | किरकोळ, रिणको, लिंमजी छोटायास | | | | |
| • | रुपये . . . . . . . . . . . . | १७०७ २ ० | | | |
| १३ | दालचिनी १२० रतल, दर रतल ४ रु. ० पावले ६६ 3/6 रेंस प्रमाणें रुपये | ५०० ० ० | | | |
| १३/१२ | कापूस १२ गांठळ्या मिळून ३०१ मण ३५ शेर दर मण ४ रु. प्रें॥ रुपये | १२०७ २ ० | | | |
| | घेतलें विनिमयांत . . . . . . . | | १७०७ | २ | ० |

